जीवशिवाचें पार्थक्य[1] । ऐक्यासी येतसे ॥ ४ ॥ असो ऐसें जें अखंड स्मरण[2] । ते चि मूळमाया महाकारण । स्मरणानंतरें विस्मरण । ते चि कारण अव्याकृत ॥ ५ ॥ तें अव्याकृत पूर्वीं निरोपिलें । जें निजरूप ह्मणौनि दाविलें । तें तुवां अव्हेरूनि सोडिलें । हें गुणभूतात्मक ह्मणौनि ॥ ६ ॥ तरि तें असो आतां प्रस्तुत । आमचें निजरूप जें हें सतंत । मूळमायेचा जो ईश्वर आधिर्त[3] । तें चि आमुचें निजरूप ॥ ७ ॥ ऐसें श्रीगुरूचें ऐकोनि वचन । शिष्याआंगीं सात्विकादि भाव निर्माण । जालें महावाक्यश्रवणविवरण । यथान्वयें साकल्य[4] ॥ ८ ॥ स्वकीय संप्रदायप्रमाण[5] । केलियां महावाक्यविवरण । येथें शिष्यप्रज्ञा पाहिजे कारण । ते फळेल स्वानुभवेंसीं ॥ ९ ॥ तेथें अज्ञानतमासी नाश जाला । ज्ञानसूर्य अखंडैक प्रकाशला । ब्रह्मानुभवाश्रियें विकाशला । भावाष्टकळिकासमूह[6] ॥ १० ॥ स्वानंदाश्रु नेत्रकमळीं । पांडुरता उत्पन्न गंडस्थळीं । कंठीं बाष्प हृदयकमळीं । दाटलें स्वेद ॥ ११ ॥ जंघाद्वई प्रकंप थरथरा । रोमांकुर उभारले सर्व शरीरा । निःसंज्ञता बाणली अंतरा । स्वानंदउभवणी होतसे ॥ १२ ॥ तेथें शरीरासी कोण सावरी । तथापि अवस्था[7] जिरऊनि अंतरीं । येऊनि प्रत्यगावृत्तीवरी[8] । श्रीगुरुमूर्ति अवलोकिलें ॥ १३ ॥ अत्यंत भावाथिलेनि[9] विमळ । देवदर्शनालागीं उतावेळ । तवं देवत्व चि पावलें केवळ । आपणाचिपासीं ॥ १४ ॥ या सुखासी कैंची समता । कोठें जीवत्व कोठें निजात्मता । पूर्व संसारश्रमीं कृतार्थता[10] । मानिता जाला ॥ १५ ॥ मिथ्यामय मायापटळ । सत्य चि भासलें होतें केवळ । जैसें नाथिलें[11] चि मृगजळ । दाटलें दिसे ॥ १६ ॥ विचारितां तें कांहीं च नाहीं । शुद्ध सुप्रकाश चि पाहीं । तैसें मिथ्या प्रपंचभान सर्व हि । सत्य ब्रह्म चि असे ॥ १७ ॥

---

१ पृथकत्व. २ दास० १५-७-३५ वरील टीप पहा. ३ अधिष्ठाता. ४ पूर्णपणें, विस्तृतपणानें. ५ सांप्रदायास अनुसरून. ६ कंप रोमांचादि सात्विक भाव, ह्या च कोणी कला, त्यांच्या समूह. ७ देहातीत अवस्था. ८ स्वस्वरूपाकार वृत्तीवर. ९ प्रेमयुक्त होऊन. १० पूर्वी केलेल्या संसाराच्या श्रमांचें सार्थक झालें असें. ११ खोटें, लटकें.

ऐसा अवस्थात्रयांचा पावोनि प्रांत । चतुर्थीसी[1] जाला सुविश्रांत । असंत[2] चि विश्व मिथ्याभूत । सस्वरूप प्रकाशलें ॥ १८ ॥ निराकार निराभास निर्गुण । निर्मळ निश्चळ नित्य संपूर्ण । अनंताकाश व्यापूनि पूर्ण । अपरांपर[3] ॥ १९ ॥ आकार उत्पत्ति स्थिति नाशिवंत । आत्मा निर्विकार सत्य शाश्वत । जेवि कां विराटनाशीं असेंत[4] । आकाश अविकंप[5] ॥२०॥ नव्हे स्वेत पीत हरित नीळ । परि स्वप्रकाशवंत अति तेजाळ । स्पर्शासी न कळे परि अविचंळ । चित्तातीत निसंग जें ॥ २१ ॥ ऐसिया स्वरूपानंतसागरीं । तन्मयत्वें चढली चित्तलहरी । निशेष संसारिक सपरिवारीं । बुडोनि गेले ॥ २२ ॥ करितां निरावलंबीं अवलंबन । अर्द्धोन्मीळित जाले नयन । अंतःकर्णचतुष्टयेंसीं मन । उन्मन[6] जालें ॥ २३ ॥ ऐसे स्वानंदाचा सुकाळ । जाला जेथें नाहीं काळवेळ । त्यासी उपमावया केवळ । विषयसुख आडळे ॥ २४ ॥ परंतु आब्रह्मादि विषयानंद । न घडे तयासी वियोगदुखाचा प्रमाद[7] । आणि सेवित असतांचि होय मंद । विकृति वाटे ॥ २५ ॥ ऐसिया सुखाची समता । केवि घडे स्वानंदा शाश्वता । तें निजानंदसुख स्वता । अनुभवैकवेद्य ॥ २६ ॥ स्वानंद तुकावया काटाळें । सर्व जीवानंद तुकितां तुळे । परि पाळडें गेलें अंतराळें । स्वानंद तुकेना ॥ २७ ॥ ऐसिये स्वानंदसुरेवाडीं । आपेआप अनुभवितां गोडी । प्रत्यगावृत्तीनें आवडीं । शरीर सावरिलें ॥ २८ ॥ जैसें भ्रंष्टा भूपासी राज्य आलें । तेणें दुर्बळ सख्यांसी सांभाळिलें । तत्काळ आपणाऐसें समर्थ केलें । आपुलिया सामर्थ्यें ॥ २९ ॥ सावध जालें अंतःकर्णपंचक । तेणें चेतवला इंद्रियदशक । परंतु स्वानुभवाचें बीक । चढलें चि असे ॥ ३० ॥ तो जागा ना निदसुरा ।

---

१ तुर्यावस्थेस आल्यावर. २ अशाश्वत. ३ अपरंपार. ४ असतें. ५ स्थिर. ६ मनाचें भान नाहींसें झालें इतकें स्वरूपीं लीन झालें. ७ अतिशय मोह. ८ बाधक होतो. ९ पारडें. १० सुखांत निमग्न असतां. ११ सहज. १२ पदच्युत झालेल्या. १३ गरीब मित्रांना. १३ तेज, सौंदर्य.

येकायेकी ना दुसरा । अद्वैतें द्वैतप्रचारा । देखत असे ॥ ३१ ॥ जैसें स्वप्नीं सत्यत्वें देखिलें जग । आणि जागा होऊनि पाहे मग । तें स्मरत असे परि दृश्य भाग । मिथ्यामय सकळ ॥ ३२ ॥ तैसें प्रपंचत्व जें होतें किडोळ[1] । तें निरशलें जैसें नभींचें सुनीळ[3] । केवळ भासे अंतराळ । तैसें ब्रह्म अनुभवलें ॥ ३३ ॥ कृतकृत्यता ब्रह्मसाक्षात्कारें । निःशेष फिटलें भवभुरेरें[4] । दाटला सद्गुरुचेनि उपकारें । लोटला चरणावरी ॥ ३४ ॥ सप्रेम साष्टांग नमस्कार घाली । प्रदक्षिणा करी मंद पाउलीं । नाचे वाजवी करताळी । जय सद्गुरु ह्मणोनियां ॥ ३५ ॥ उभा राहोनि कृतांजुळी । स्तुति कारितसे मंजुळी । जी जी सद्गुरु तूं परब्रह्ममंडळीं । अमूर्त्त मूर्त्तिमंत ॥ ३६ ॥ तूं केवळ निर्गुण निर्विकार । परि भक्तोद्धरणार्थ धरिला आकार । शरणागतांचा करूनि अंगिकार । निजकृपां उद्धरिसी ॥ ३७ ॥ असो निजरूपदर्शनालागून । स्वामी बोलिले येक वचन । तयाचें विचारितां विंदान । ब्रह्मादि हरिहरां सुसेव्य ॥ ३८ ॥ तरि ब्रह्मीं अहं ब्रह्म ऐसें जें स्मरण । तें चि प्रकृतिपुरुषाचें लक्षण । तेथ अष्टधा सूक्ष्म स्वरूपें आत्मज्ञान । अव्यक्तरूप बोलिजे ॥ ३९ ॥ तरि जी देवा हें तैसें जालें । नाम सुवर्ण परि वंगा[5]ऐसें देखिलें । किं तें अमृत चवीसी उत्तम आलें । कांजीसारिखें चि ॥ ४० ॥ तैसें देवा तुमचें स्वरूप । निर्गुण निराकार अमूप । तेथ मिथ्या मायामय आरोप । प्रकृतिपुरुषात्मक हा ॥ ४१ ॥ तरि जी निर्गुणीं हें सकळ माईक । तेथ अर्द्धनारीनटेश्वर हें किमात्मक । आणि अहं ब्रह्म हें स्मरणाचें कौतुक । कवण स्मरे जी ॥ ४२ ॥ जेथ स्फुरणत्वें स्मरणाभास जाला । तेथ मूळमायेसीं ईश्वर अधिष्ठिला । तरि तो गुणभूतीं अवश्य सांपडला । येथ संदेह काय जी ॥ ४३ ॥ जैसें पूर्वीं निजरूप ह्मणौनि दाविलें । तें गुणभूतत्वें दिसे आकारलें । ऐसे चि देहत्रय यथान्वयें[6] निरशले । अन्यथाज्ञान अज्ञानेंसीं ॥ ४४ ॥

---

१ निःसंग. २ खोटें, लटिकें. ३ नीलिमा. ४ भुरेरें=चेडें, चेटुक. ५ वर्मी लक्ष्य, लक्षण. ६ कथिलाप्रमाणें.

विराट हिरण्यगर्भ अव्याकृत । तैसें चि मूळमायामय हें चतुर्थ । ईश्वराचें देह भासत । ब्रह्मांडात्मक ज्ञानजन्य ॥ ४५ ॥ जेथ देहत्व यासी उभारलें । तेथ अवस्थेस हि सर्वसाक्षित्व आलें । मग सहज चि अभिमानी होणें लागलें । सर्वेश्वरासी च पैं ॥ ४६ ॥ सर्वेश्वराचें स्थान निळांरंभ । आनंदावभास भोग स्वयंभ । मग तेथें शुद्धसत्वगुणाचा अवष्टंभ । इछाशक्तिसमवेत ॥ ४७ ॥ तेथ देखिली सहजें अर्द्धमात्रा । जे कां साक्षात्प्रणवजन्य स्वतंत्रा । एवं अष्टकोशेंसीं मूळमायेचिया यंत्रा । ईश्वरसहित देखिलें ॥ ४८ ॥ ऐसियासी ह्मणतसां आपुलें निजरूप । तरि फळलें आमचें भाग्य अमूप । ईश्वरतनुचतुष्टयासी सत्स्वरूप । आमचेनि ह्मणवेल कैसें ॥ ४९ ॥ पूर्वीं येकादश कळापामाझारीं । निरोपिली जीवचतुष्टयकुसरी । ते पिंडात्मक पंचीकृत साजिरी । हे ब्रह्मांडात्मक अपंचीकृत ॥ ५० ॥ ब्रह्मांडीं देहचतुष्टय ईश्वराचें । तदंश पिंडीं देहचतुष्टय जीवाचें । उभयतां परस्परें करितां ऐक्य यांचें । जीवेश्वरीं सहजें ऐक्यतां ॥ ५१ ॥ आतां ब्रह्मांडीं प्रथम देह ईश्वराचें । विराट जाणिजे विश्वरूपेंसीं साचें । तदंश पिंडीं स्थूळ देह जीवाचें । पंचवीसां तत्वेंसीं ॥ ५२ ॥ ब्रह्मांडीं अवस्था विराटदेहाची । उत्पत्ति तदंश जागृति पिंडींची । ब्रह्मांडीं ब्रह्मा अभिमानी तैसा चि । तदंश पिंडीं विश्व बोलिजे ॥ ५३ ॥ ब्रह्मांडीं सत्यलोक निवासस्थान । पिंडीं स्थान बोलिजे नयन । ब्रह्मांडीं क्रियाशक्तीसीं रजोगुण । तो चि पिंडीं बोलिजे ॥ ५४ ॥ ब्रह्मांडीं सुखदुःखात्मक स्थूळभोग निफजे । तो चि भोग पिंडींहि बोलिजे । उभयता अकारमात्रेचिया व्याजें । अष्टकोशेंसीं ऐक्यत्व ॥ ५५ ॥ आतां देवतामय अपंचीकृत । ब्रह्मांडीं हिरण्यगर्भ विलसत । ईश्वराचें द्वितीय देह तदंश पंचीकृत । सूक्ष्म पंचवीसेंसीं ॥ ५६ ॥ ब्रह्मांडीं हिरण्यगर्भ देहाची । स्थिती पाळनअवस्था साची । तदंश पिंडीं सूक्ष्म देहाची । स्वप्नावस्था बोलिजे ॥ ५७ ॥

१ (?) २ अहंकार, प्रपंच. ३ चातुर्य. ४ दृश्य, स्थूल पंचतत्वें. ५ सूक्ष्म. ६ मिषानें, निमित्तानें.

ब्रह्मांडीं स्थिति अवस्था विष्णु अभिमानी । पिंडीं तदंश तैजसाभिमानी । विष्णूचें स्थान वैकुंठभुवनीं । तदंश पिंडीं कंठगत ॥ ५८ ॥ सत्वगुण विलसे ज्ञानशक्तीसीं । प्रविविक्तभोग अर्द्धमात्रेसीं । पिंडब्रह्मांडऐक्यता अष्टकोशेंसीं । जीवेश्वरऐक्य विलसे ॥ ५९ ॥ देहद्वयेंसीं संपलें अन्यथाज्ञान । आतां सांगिजेल तृतीय देह अज्ञान । पिंडब्रह्मांडाचा निराश करून । जीवेश्वरऐक्य सहजें ॥ ६० ॥ ब्रह्मांडीं तृतीय देह अव्याकृत । तदंश पिंडीं कारणदेह विलसत । अव्याकृतीं प्रळयावस्था बोलिजत । तदंश सुषुप्ति पिंडीं ॥ ६१ ॥ ब्रह्मांडीं अभिमानी सदाशिव । पिंडीं तदंश प्राज्ञ स्वयमेव । कैळासस्थान तदंश सुषुप्तिठाव । हृदयभुवनीं ॥ ६२ ॥ द्रव्यशक्तिसहित तमोगुण । मकार मात्रा आनंदभोगायतन । पिंडब्रह्मांडीं ऐक्यत्व येकून । अष्टकोशेंसीं जीवेश्वर ॥ ६३ ॥ एवं अन्यथाज्ञानेंसीं अज्ञान । निरसूनि देहत्रय अभिन्न । आतां मूळमायेसीं महाकारण । जीवेश्वरांचें विलसे ॥ ६४ ॥ ब्रह्मांडीं चतुर्थ देह ईश्वराचें । मूळमायात्मक जाणिजे साचें । तदंश पिंडीं महाकारण जीवाचें । अनुसंधानात्मक[2] ॥ ६५ ॥ जेथ अनुसंधान परमात्मयाचें । जीवासी अखंडित असे साचें । अनुसंधानें निर्शन देहचतुष्टयाचें । मी आणि माझेंपण सारूनि ॥ ६६ ॥ येवं जेथ देह चि मिथ्यारूप जालें । तेथ तुर्यावस्थेसी पक्कपण आलें । पक्कता येऊनि सहजें मुरालें । सर्वसाक्षित्व हि ॥ ६७ ॥ महाकारणदेहनिराशें । स्मरणांचा[3] चि ठाव पुसे । तेणें मूळमायेस हि आपैसें । नाहींपण सहजें ॥ ६८ ॥ मूळमायेची अवस्था सर्वसाक्षिणी । तिची हि सहज चि जाली आटैणी[4] । तेथ प्रत्यगात्मयासगट आभिमानी । सर्वेश्वरेंसीं लयस्थ[5] ॥ ६९ ॥ मग ब्रह्मांडींचें स्थान निळारंभ । पिंडींचें मूर्ध्निस्थान स्वयंभ । यांचा वेगळेपणाचा अवष्टंभ । ऐक्यासी आला सहजें ॥ ७० ॥ जेथ स्थान मान अवघें राहिलें । तेथ शुद्धसत्व इछाशक्तीसीं

---

१ स्वप्नदेहाचा अभिमान धरणारा जीव. २ ध्यानात्मक. ३ मुळींचे अहंब्रह्म असें जें स्मरण त्याचा. ४ मूस. ५ निद्रिस्त, लीन.

हारपलें । मग आनंदावभासासी वहिलें । कोण लेखी तेथ ॥ ७१ ॥ जेथें आनंदाचा अवभास जिराला । तेथ अर्द्धमात्रेंसीं प्रणव मुराला । एवं अष्टकोशेंसीं लय जाला । महाकारण मूळमायेसी ॥ ७२ ॥ एवं पिंडब्रह्मांडऐक्येंसीं । ऐक्यता जाली जीवेश्वरासी । जेवि घटमठभंगीं महदाकाशीं । समरसिजे आकाशें ॥ ७३ ॥ यां सकळ पदार्थांचें जाणणेपण । तया नांव बोलिजे केवळ ज्ञान । पिंडब्रह्मांडींचें करूनि शोधन । आत्मज्ञानविचारें ॥ ७४ ॥ त्या आत्मज्ञाना हि सगट । अवघें जालें सरसेंपाट । तेथ मूळमाया चि तुमची येकट । कोठें राहील जी ॥ ७५ ॥ अन्यथाज्ञान अज्ञानेंसीं । आत्मज्ञानीं गेलें विलयासी । तें ज्ञान हि आलें विज्ञानस्थितीसी । स्वानुभवदिनकरीं ॥ ७६ ॥ जालयां स्वानुभव दिनकराऐसा । सहज चि न देखिजे दृश्याभासा । ईश्वर चि ब्रह्मीं सुलीन सहसा । विज्ञानस्थितीसीं ॥ ७७ ॥ ऐसें असोनि जी गुरुराया । आपुलें निजरूप ह्मणतसा मूळमाया । तरि जी समर्था झकवणीं इया । आह्मां झकवीतसां कां जी ॥ ७८ ॥ आह्मी तुमचीं ह्मणियेंागतें । जें सांगतसां तें मानूनि हितें । काया वाचा मनसा तुमतें । अनन्यभावें शरण जी ॥ ७९ ॥ इतुकीं शिष्य बोलिला करुणावचनें । अंतरीं सगद्गद सजळनयनें । तें देखोनि श्रीगुरु करुणाघनें । कृपामृतें सिंचिजे ॥ ८० ॥ बारे सखया शिष्यटिळका । आपण तुझा पाहिला बहुत आवांका । परि तूं निधडा देखिलासि निका । कळिकाळा नांगवसी ॥ ८१ ॥ ज्ञानी जालासी असाधारण । तुझिये बुद्धीची नेणवे आंगवणें । गुरुकृपा तुज फळली संपूर्ण । विज्ञानस्थितीसीं ॥ ८२ ॥ इतुकेनि आह्मां जाला भरवसा । निश्चयें स्वानुभवदिनकराऐसा । जे जे तूं इछा धरिसील सहसा । ते आरंभीं चि फळेल ॥ ८३ ॥ इतुकें श्रीगुरुवाक्य ऐकोन । शिष्य शकुनग्रंथी बांधे सुखावोन । ह्मणे स्वामीचया

१ पुसेल, गणना करील. २ जिरला. ३ घटाकाश व मठाकाश हीं दोन्ही. ४ एकसारखें, एकरूप. ५ फसवणुकीनें. ६ वाक्यें, ह्मणणें. ह्मणगत=भाषण. ७ धैर्यपरीक्षा. ८ शूर, पराक्रमी, धैर्यवान. ९ नाटोपसी. १० विशेषपणानें. ११ इच्छा. १२ तत्काल, प्रयत्न न करितां.

स्वरूपाची वोळखण । सांगितली पाहिजे ॥ ८४ ॥ ऐसें शिष्य बोलत-क्षणीं । सद्गुरु सुखावोनि पूर्णपणीं । आपुलिया स्वरूपाची कुढावणी[1] । करिते जाले स्वानंदें ॥ ८५ ॥ बारे माझें स्वरूप तुवां विचारिलें । तरि तें न जाय माझेनि बोलिलें । मुकियानें साखरेसी भक्षिलें । तरि गोडी[2] न सांगवे जैसी ॥ ८६ ॥ माझया स्वरूपाचें पूर्णपण । तें येक स्वरूप चि जाणे संपूर्ण । जेवि कां परब्रह्माची ऊर्णखूण[3] । परब्रह्माचिऐसी ॥ ८७ ॥ सूर्यासी प्रकाश करणार । सूर्य चि कां जेवि साचार । चंद्राचे अति सुरस अमृतकर । चंद्रा चि सारिखे ॥ ८८ ॥ या गगनाच्या वाडपणा[4] । गगनेविण दृष्टांत साना[5] । समुद्राचिया गंभीरपणा । समुद्र चि योग्य ॥ ८९ ॥ पृथ्वीसी तुळात्रया काटाळें[6] । पृथ्वी चि योजावी समकाळें । या उदकाऐसीं आणिकें पातळें । असलियां योजावीं ॥ ९० ॥ तरि क्षणिक नाशिवंत जे जे पदार्थ । त्यांसी साम्यता नसे तुळणार्थ । मां[7] ब्रह्मादि हरिहर जेणें कृतार्थ । सर्वां सुसेव्य जें ॥ ९१ ॥ जें शब्दामाजीं सांपडेना । मनासी तर्कितां जें तर्केना । दिव्यदृष्टिसगट हि दिसेना । चर्मदृष्टीस हि ॥ ९२ ॥ श्रवणीं ज्याची ध्वनि पडेना । त्वचेंद्रियासी जें आडळेना । हातामाजीं सांपडेना । मां धरूनि द्यावें ॥ ९३ ॥ घ्राणीं नाडळे गंधरूपें । दंडें हाणितल्यां जें न कांपे । पाईं चालतां जें न रुपे[8] । तिखटें[9]मडपणें ॥ ९४ ॥ शस्त्रें[10] तोडितां जें तुटेना । पाणियांमाजीं असोनि भिजेना । आगी लागलियां हि जळेना । अशोष्य जें वायूसी ॥ ९५ ॥ आकाशासी ज्यामाजीं न रिघवे । वायूसी सहसा जें न लंघवें । महातेजादि प्रकाश आघवे । जेणें तुछ मानिले ॥ ९६ ॥ आवर्णोदकासी जें नालंपवे[11] । पृथिवीयेसी जें न झांकवे[12] । तमोगुणासी

---

१ कुडावा=रक्षण ? २ मुक्यानें गुळ खादला । गोडी नये सांगाव्याला ॥ दास. ६·१०·२. ३ लक्षण. ४ मोठेपणास. ५ लहान. ६ तागडींत. ७ तर मग. ८ बोचत नाहीं. ९ कंकराप्रमाणें तीक्ष्ण. १० नैनं छिंदन्ति शस्त्राणि । इत्यादि गीताश्लोकाप्रमाणें. ११ बुडवितां येत नाहीं. १२ लपवून ठेवता येत नाहीं.

जें न झेंपावे । कांहीं केल्यां हि ॥ ९७ ॥ रजोगुणाची अति तरळ बुद्धि । परि सहसा नाकळे ज्याची विधि[2] । सत्वगुणाची अति सत्वशुद्धि । परि स्वरूपीं न चले ॥ ९८ ॥ त्रिगुण पंचभूतांसी जें अतीत[3] । स्वसंवेद्य सनातन अनस्यूत[4] । जें आदिमध्यांतरहित । असंभवनीय ॥९९ ॥ निर्गुण निसंग निरामय । निर्विकार निरोपम अनिर्वचनीय । निराधार निरूपम अविक्रिय[5] । अजरामर नित्य शुद्ध ॥ १०० ॥ जें व्यापक दशदिशांतर्बाहेरी । जें स्वसंवेद्य[6] स्वानुभवदिनकरीं । तें रामदासकृपां दिनकरीं । सबाह्य पूर्ण सहजस्थिति ॥ १०१ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये द्वादश कळापे ब्रह्मांड चतुर्थदेहविवरण पिंडब्रह्मांड-ऐक्य निरूपणं नाम चतुर्थ कीर्ण प्रकाशः ॥ ४ ॥ ॥ श्रीराम ॥

**॥ श्रीराम ॥**

सत्स्वरूप स्वसंवेद्य शुद्ध । अपरांपर अति अगाध । अभाविकां परम दुर्बोध । स्वानुभवेंसीं साधकां ॥ १ ॥ निर्गुण निःसंग निर्विकार । निरोपम निरंजन निराधार । श्रुतिशास्त्रासी ज्याचा पार । जाणीवरूपें कळेना ॥ २ ॥ ऐसें असोनि अति अगाध । निमग्न जेथें संत साध । भोळीं भाविकें सात्विकें शुद्ध । त्यांचें विश्रामधाम जें ॥ ३ ॥ जेथें शंकर होऊनि समाधिस्त । अखंड ज्याचा स्वानुभव घेत । विष्णु विधि इंद्रादि सावचित्त[7] । जये स्वरूपीं ॥ ४ ॥ तेहतीस कोटी सुरवर । अठ्यासी सहस्र रुषेश्वर[8] । गण गंधर्व यक्ष किन्नर । जये स्वरूपीं निमग्न ॥ ५ ॥ संत महंत मुनेश्वर । सिद्ध साधु योगेश्वर । दत्त गोरक्ष दिगंबर । जये स्वरूपीं निमग्न ॥ ६ ॥ रुक्ष राक्षस उरंग[9] वानर । दैत्य दानवादि असुर । पिंडब्रह्मांडात्मक सचराचर । जये स्वरूपीं ॥ ७ ॥ ऐसें सद्गुरुस्वरूप वर्णितां । शिष्य ठेला समाधिस्त स्वभावता । विसरला कार्यकारणता । सस्वरूपीं निमग्न ॥ ८ ॥ समाधिस्त ठेला मुहूर्त येक । तादात्म्ययोगेंसीं संम्यक । तवं कृपाकरें स्पर्शूनि मस्तक । सर्वांगीं

१ तमोगुण ज्या ठिकाणीं झडप घालू शकत नाहीं. २ कर्म. ३ भिन्न. ४ अनुस्यूत=अखंड दंडायमान. ५ क्रियाशून्य. ६ ज्ञानस्वरूप वस्तु. ७ सावधान ८ रीस. ९ नाग.

कुरवाळिला ॥ ९ ॥ शिष्याचिया पूर्ण जालेपणें । सद्गुरूसी सुख अनंत गुणें । जेवि पूर्णचंद्र देखिलियां भरितें चौगुणें । दाटे क्षीरसमुद्रासी ॥ १० ॥ कां तें वत्स धालेपणें देखतां । वोरेंसें धेनु चाटी तत्वता । कीं पुत्र सर्वगुणसंपन्न होतां । मातांपितरां अति सौख्य ॥ ११ ॥ किं ते कमळीं[3] सूर्यकीर्ण स्पर्शतां । परम सौख्य कमळांसी तत्वता । किं चंद्रकरें कुमुदिनीसी[4] स्वभावता । सुख होय अति सौरेंसें ॥ १२ ॥ तेवि शिष्यासी श्रीकरें कुर्वाळितां । सर्वांगें शिष्य सुखावोनि तत्वता । समाधीचें व्युथ्थान स्वभावता । सहजस्थिति होतसे ॥ १३ ॥ ऐसा सुखाचिया परम सुरवाडें । शिष्य निजानंदें वाडेंकोडें । ह्मणे जी येव्हडें स्वरूप असोनि निवाडें । कैसें होतें झांकिलें ॥ १४ ॥ काय देखिला माझा अपराध । कां पूर्वीं न केला मज याचा बोध । ऐसें रम्य आणि परम अगाध । वेरि चांगलें हि ॥ १५ ॥ थोर तरि दिसे अमर्याद । सुक्ष्मत्वें हि अनुरेणाचें सुहृदें । भाविकांसी अत्यंत चि सुखद । ब्रह्मांडाबाहेरी अभाविकां ॥ १६ ॥ जें मृदत्वें गगनाहूनि कोमळ । असोनि कठिणांतर चाळिलें सकळ । दशादिशांतर व्यापूनि केवळ । बाहेरी दिसे कोंदलें ॥ १७ ॥ सघनत्वें दिसे अति साजिरें । मनोरम्य निघोटें गोजिरें । वस्तुमात्र सकळ होऊनि लाजिरें । न [12]सरे चि जेथ ॥ १८ ॥ बाहेर चि ह्मणों तरि माझे अंतरीं । व्यापक देखिजे जें सचराचरीं । अनुरेणापासूनि आब्रह्मवरी । जें सारिखें चि दिसे ॥ १९ ॥ ऐसें स्वरूप असोनि रम्य । हें या जनासी केवि जी अगम्य । जनेंसीं यासीं अति वैषम्यें[13] । दिसोनि येतसे ॥ २० ॥ ऐसें बोलोनि अंतरीं विचारी । मग आपण चि विचार करी । ह्मणे जन हें अहंपणें व्याप्त शरीरीं ।

---

१ दुध पिऊन तृप्त झालेलें पाहून. २ स्नेहभरित होऊन. ३ सूर्यविकासी कमलांला. ४ चंद्रविकासी कमलांस. ५ सुरसिकत्वानें. ६ स्वाधीन होऊन. ७ अत्यंत आवडीनें. ८ त्याशिवाय. ९ मित्र. १० नास्तिकांना स्वस्वरूपाची कल्पना नसल्यामुळें आपलें रूप त्यांच्यापासून फार दूर आहे. ११ सघन, परिपूर्ण १२ सरसावे, पुढें येई. १३ वैरभाव.

हें अहंपणासी अलिप्त ॥ २१ ॥ ब्रह्म त्रैअवस्थीं अबाधित । संत सनातन जें शाश्वत । जन हें अत्यंत अविद्यासक्त । त्यासी गोचर तें केवि होये ॥ २२ ॥ जन गांदलेंसे[1] मायामळें । ब्रह्म अत्यंत शुद्ध सोंवळें । ह्मणौनियां जनासी कदाकाळें । गोचरें[2] नोहे सर्वथा ॥ २३ ॥ इतुकें शिष्य मनीं च समजोनि । श्रीगुरूसीं बोले विचारूनि । जी ऐसें स्वसंवेद्य ब्रह्म शुद्ध असोनि । हें मायामळें केवि व्याप्त ॥ २४ ॥ माया हे अत्यंत चि समळ । माया व्यामोहाचें[3] पटळ । माया परोपरीं अत्यंत कुटिळें[4] । या जनासारिखी होतसे ॥ २५ ॥ माया असारपणें सगुण । सकळ चराचर जे असे व्यापून । अनंत ब्रह्मांडें रचून । क्षणामाजीं संव्हारी ॥ २६ ॥ ते मायेचे ये ब्रह्मीं कैसें होणें । हें दिसतसे जी मज अघटमानें[5] । मायेचें प्रत्यक्ष खरेपणें दिसणें । ब्रह्म अदृश्य सर्वदा ॥ २७ ॥ ऐसें जें सदैव अदृश्य ब्रह्म । तेथें मायेचें कैसें असे वर्म[6] । माया त्रिपुटीसहित सकाम । ब्रह्म त्रिपुटीरहित ॥ २८ ॥ मायेसी सदां उघड असणें । ब्रह्मासी घडे अखंड लपणें । कर्ताकार्येंसीं मायेकारणें । ब्रह्म त्रिपुटिअतीत ॥ २९ ॥ माया दृश्य दर्शनी द्रष्टेपणें वर्त्ते । ब्रह्म ये त्रिपुटीहूनि परतें । मायेसी ज्ञेयज्ञातेपणें ज्ञान जाणतें । ब्रह्म वेगळें याहूनि ॥ ३० ॥भोग्य भोक्तृत्व भोक्तेपण मायेसी । हें ठाउकें चि नाहीं ब्रह्मासी । माया ध्येयध्यातेपणें आडळे ध्यानासी । ब्रह्मीं याची अनोळखी ॥ ३१ ॥ माया पूजितेपणें पूज्य पूजक । ब्रह्मीं हें नाहीं च केवळ निष्टंक । माया भजतेपणें भज्य भजक । ब्रह्मीं याची वार्त्ता नसे ॥ ३२ ॥ मायेसी श्रोतेपणें श्रोतव्य श्रवण । ब्रह्म या त्रिपुटीहूनि भिन्न । मायेसी घ्रातेपणें घ्रेय घ्राण । ब्रह्मीं न घडे कदापि ॥ ३३ ॥ मायेसी वाचकपणें वाच्य वाचनता । ब्रह्मीं मुकेपण असे स्वभावतां । माया शबळपणें वर्त्ते तत्वता । ब्रह्म शुद्ध सनातन ॥ ३४ ॥ माया चंचळपणें अति प्रबळ । ब्रह्म समत्वें परम निश्चळ । माया विषम

---

१ पीडावलेले. २ प्रगट, प्रत्यक्ष. ३ अत्यंत मोहाचें. ४ वक्र, दुष्ट. ५ न घडणारी गोष्ट, अशक्य. ६ मर्म, सार.

सर्वकाळ । ब्रह्म साम्य सदैव ॥ ३५ ॥ माया सर्वस्वें दिसे अनादि । ब्रह्म केवळ सर्वांची आदि । माये लागल्या आधिव्याधि । ब्रह्म त्यांसी अस्पर्श ॥ ३६ ॥ माया सकळ चाळणा करी । ब्रह्म सुनिश्चळ निज-अंतरीं । माया वर्ते चराचर व्यवहारीं । ब्रह्मीं चराचर चि नसे ॥ ३७ ॥ मायेसी जीवमात्रांची वोळखी । ब्रह्मीं वोळखी ना अनोळखी । माया व्यापली नाना सुखदुखीं । ब्रह्मीं दोन्ही हि न दिसती ॥ ३८ ॥ माया चाळक पाळक सकळांची । ब्रह्मीं नाहीं हें कांहीं ठाउकें चि । माया चराचर रची खची । ब्रह्मीं चराचर न दिसे ॥ ३९ ॥ माया वर्ते अखंड द्वैतपणें । ब्रह्मीं अद्वैतत्व प्रतिपादणें । माया नित्य करितसे द्वंद्व-चाळणें । ब्रह्म नित्य निर्द्वंद्व ॥ ४० ॥ मायेची आडळतसे उपाधि । ब्रह्म सर्वथैव निरुपाधि । माया सकळ विकारांची अवधि । ब्रह्म निर्वि-कार सहजें ॥ ४१ ॥ मायेसी भलतें चि देइजे उपम । ब्रह्म सर्वदा निरुपम । मायेसी वेगळेपणें असे धाम । ब्रह्म निजधाम सर्वांचें ॥ ४२ ॥ मायेसी घातली असे सीम । ब्रह्म सर्वदा असे निःसीम । मायेसी असे नाम रूप कर्म । ब्रह्म तिहींसीं वेगळ ॥ ४३ ॥ पिंड ब्रह्मांड मायेमध्यें । ब्रह्मीं सकळ हारपलीं गेद्यें । माया वर्ते सर्वांसीं सान्निध्यें । ब्रह्म वेगळें सर्वेसीं ॥ ४४ ॥ माया वर्ते परतंत्रपणें सदा । ब्रह्म स्वतंत्र असे सर्वदा । माया परोपरीं भोगी संपदा । ब्रह्मीं न दिसे स्वप्नीं हि ॥ ४५ ॥ माये लागल्या संपत्ति विपत्ति । ब्रह्मीं दोन्ही हि कदापि न दिसती । मायासंगें सकळा अधोगति । ब्रह्मीं हें कांहीं चि नसे ॥ ४६ ॥ माया सर्वदा असे सगुण । ब्रह्म बोलिजे नित्य निर्गुण । मायेसी सर्वथा संभवपण । ब्रह्म जाणिजे असंभवनीय ॥ ४७ ॥ माया असे वचनीय । ब्रह्म बोलिजे अनिर्वचनीय । मायेचें जाणिजतसे प्रमेय । ब्रह्म अप्रमेय सर्वथा ॥ ४८ ॥ माया समळ ब्रह्म निर्मळ । माया

---

१ उत्पत्तिस्थान. २ मनाच्या व शरिराच्या व्यथा. ३ सीमा किंवा मूळ. ४ स्वरूप, घर. ५ बोलणें, बडबड. ६ उत्पत्ति. ७ बोलता येण्याजोगी. ८ पुराव्यानें सिद्ध करतां येतील असे मुद्दे.

अकाळ ब्रह्म सर्वकाळ । माया विकळे[1] ब्रह्म निष्कळें[2] । सकळाद्य जें ॥ ४९ ॥ मायेसी विलय ब्रह्मीं लय । माया क्षणिक ब्रह्म अक्षय । माया भयभीत ब्रह्म निर्भय । काळकळनातीत[3] ॥ ५० ॥ माया साभास ब्रह्म निराभास । माया निरावकाश ब्रह्म सावकाश । माया अंध ब्रह्म स्वयंप्रकाश । स्वानुभवदिनकरीं ॥ ५१ ॥ माया निरानंद ब्रह्म स्वानंद । माया शब्दमय ब्रह्म निशब्द । माया माइक ब्रह्म स्वतसिद्ध । सकळकाळाद्य ॥ ५२ ॥ माया अशाश्वत ब्रह्म शाश्वत । माया येकदेशी ब्रह्म सर्वगत । माया होय जाय ब्रह्म अनुस्यूत । अखंडैकर्वन ॥ ५३ ॥ माया अधरें ब्रह्म घनदाट । माया खरबड ब्रह्म निघोंट[4] । माया कनिष्ठ ब्रह्म वरिष्ठ । सर्वेश्वराहूनि ॥ ५४ ॥ माया विटे ब्रह्म अविट । माया वक्र ब्रह्म सरळ नीट । माया कचाट ब्रह्म अचाट । आत्मयापरिस ॥ ५५ ॥ माया कठिण ब्रह्म कोमळ । माया विरळ ब्रह्म पुष्कळ । माया तुळिली ब्रह्म अतुळ । ईश्वरादिकांसी ॥ ५६ ॥ माया कुरूप ब्रह्म सुंदर । माया थोडी ब्रह्म फार । माया निबर ब्रह्म फार सकुमार । गगनाहूनि ॥ ५७ ॥ माया कळंक ब्रह्म निष्कळंक । माया वाईट ब्रह्म संम्यक । माया काल्पनिक ब्रह्म निष्टंक । कल्पनेपरतें ॥ ५८ ॥ असो ऐसें मायाब्रह्म निवडितां । वेदशास्त्रें विस्तारलीं तत्वतां । परस्परें नाना संवाद करितां । ग्रंथ जाले अपार ॥ ५९ ॥ परंतु कोण्हाचेनि नोहे चि निश्चय । यावरि बोलणें बोलिलें असंभवनीय । परि सेवटीं जालें सकळ अनिर्वचनीय । बोलणें न पुरे ॥६०॥ श्रुति स्मृति नाना ग्रंथकार । बोलणें बोलिलें हें चि फार । परि येकाचेन हि निश्चय साचार । जाला चि नाहीं ॥ ६१ ॥ मत्तमत्तांतरें भांबावलीं । शास्त्रें निकरें[10] सेवटासी आलीं । पुराणाची मातें[11]

---

१ विशेषकलांनींयुक्त. २ निर्गुण. ३ काळ+कलना+अतीत. कलना=आकलन करण्याची, ग्रहण करण्याची बुद्धि. ४ अखंडदडायमान, निर्लेप. ५ निराधार. ६ एकसारखें, परिपूर्ण. ७ संकुचित. ८ मोठे. ९ दासबोध ६×५ पहा. १० निकर=समूह, निक्षूनपणा ११ मोठेपणा, मातब्बरी; किंवा कदाचित् ' मति ' हा शब्द लिहावयाचा असावा.

खुंटली । स्मृतिसहित ॥ ६२ ॥ जेथ साही दर्शनें वेडावलीं । बंडें पाशांडें मध्यें चि विरालीं । उपनिषधांची गति खुंटली । परि निश्चय नोहे चि ॥ ६३ ॥ संस्कृत प्राकृत अन्य भाषाग्रंथ । बोलती सकळ हि हा चि कथार्थ । परि सेवटीं येक हि निश्चितार्थ । कोण्हाचेनि न जाला ॥ ६४ ॥ वेद बोलिकेपणें अचाट । तेणें उपसिलें शब्दसिंधुकचाट । परि त्याचेन हि येक सेवट । ये गोष्टीचा न जाला ॥ ६५ ॥ ये गोष्टीसाठीं केले नाना उपाय । ग्रंथपरिभाषा नाना अन्वय । परंतु ये गोष्टीचा कृतनिश्चय । केला नाहीं कोण्हीं ॥ ६६ ॥ आपुलालिया मतिप्रकाशें । ग्रंथ बोलिले सावकाशें । परि येकाचिया बोलण्याऐसें । दुसऱ्याचें नाडळे ॥ ६७ ॥ आतां ते सकळ हि निश्चय । सांगतां विस्तारेल ग्रंथान्वय । न बोलतां ग्रंथाचा उपाय । राहों पाहे सकळ ॥ ६८ ॥ शिष्य ह्मणे श्रीगुरुप्रति । यदर्थीं स्वामी काय आज्ञा देती । तवं श्रीगुरु सुखावोनि ह्मणती । बोल गा तूं सुखें ॥ ६९ ॥ इतुकी श्रीआज्ञा हो न सरे । तवं शिष्यस्वानंदासी जालें चेइरें । मग स्वानुभवाचिया अनुकारें । बोले दिनकर रामदासीं ॥ ७० ॥ तरि जो जो ज्याचा प्रत्यय । तो तो सांगिजेल यथान्वय । श्रोतीं देऊनियां कृपापसाय । श्रवण केलें पाहिजे ॥७१॥ येक ह्मणती मुळींचें ब्रह्म चि खरें । वरकड मिथ्यामय येकसरें । तवं येरें ह्मणती प्रत्यक्ष दिसे तें खरें । अदृश्य तें माइक ॥ ७२ ॥ तवं आणिक मतकार बोलती । यद्दृष्टं तन्नष्टं हे श्रुति । जें नाशिवंत तें माईक निश्चितीं । ब्रह्म खरें शाश्वत ॥ ७३ ॥ तवं येर ह्मणे जीवभूत सनातन । हें मुख्य शास्त्रींचें वचन । तवं दुजा ह्मणे येकं ब्रह्मैव प्रमाण । वेदवाक्य सत्य ॥ ७४ ॥ तवं आणिक ह्मणती हे कोण गोष्टी । निर्गुणं गुणभोक्तृ च हें वाक्य सृष्टि । माया मुळीची खरी तुह्मीं कष्टी । व्यर्थ चि कां होतसा ॥ ७५ ॥

---

१ सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा व वेदांत. २ कचाट= खटपट. ३ खटपट. ४ जागृति. ५ स्वरूपानें, अनुरोधानें. ६ पसाय=प्रसाद. ७ दुसरे.

या वचनीं आणिक सरसावले । येकमेव द्वितीयं नास्ति हें श्रुति बोले । या वचनें मिथ्यत्व सहज चि आलें । मायादेवीसी ॥ ७६ ॥ तवं येर ह्मणे सर्वं खल्विदं ब्रह्म । या वचनें माया मुळींची सत्य निभ्रम । मायेवेगळा सर्वपणाचा नेम । कोणासी असे आणिक ॥७७॥ तवं आणिक बोलिले वेदवचन । सर्वं मिथ्यैकं ब्रह्म सनातनं । या वचनें मायेसी असत्य-पण । सहजें चि आलें ॥७८॥ तवं येक बोलती वेदवचन । ब्रह्मैवेदं सर्वं हें मुख्य प्रमाण । माया मुळींची खरी यासी अप्रमाण । कोण ह्मणों शके ॥ ७९ ॥ हें ऐकोनि आणिक बोलती । नेह नानास्ति किंचन हे श्रुति । या वचनें सहज चि मिथ्यापण निश्चितीं । मायादेवीसी आलें ॥ ८० ॥ तवं आणिक बोलिले वचन । खं ब्रह्म हें श्रुतीवाक्य प्रमाण । अष्टधा प्रकृतीमाजीं सांपडलें गगन । ह्मणोनि माया मिथ्या केवि पां ॥ ८१ ॥ येथ वचन बोलिले कोण्ही आणिक । जे आकाशासी ब्रह्मासी काय वेगळिक । गगनसदृशं हा वेदानुवाक । अनेक संमत्तेंसीं ॥८२॥ तथापि शब्दगुणमाकाशाद्विद्वचन । तरि शब्दविरहित जें शुद्ध गगन । तें ब्रह्म होय सत्य सनातन । अष्टधेमाजीं शब्दाकाश ॥८३॥ यावरि मायादेवीचा पक्षकारी । या वचनें सहज चि निरोत्तरीं । बोलणें खुंटलें माया बाजी-गारी । सहज चि जाली ॥ ८४ ॥ तथापि येकमेवाद्वयं ब्रह्म । हा वेदवाक्यार्थ अति निःसीम । येणें सूर्यप्रकाशें सर्व हि तम । माया मिथ्या-पणें निरशली ॥ ८५ ॥ इये मिथ्यामय मायेच्या संपर्कें । ब्रह्मीं खरेपणें आवरणं घाल्रूं पाहे तवकें । तवं अकस्मात स्वयंप्रकाशा-चिया बीकें । स्वानुभवदिनकर उदेला ॥ ८६ ॥ उदेज-लेनि स्वानुभवदिनकरें । मायातमें लंघिजे दिगंतरें । ब्रह्मानुभवसुख-साम्राज्य सोपारें । सहजस्थिति लाहिजे ॥ ८७ ॥ तरि जी कृपानिधि कृपाळुवा । सांगिजे ब्रह्मीं मायेचा कैसा उठावा । निर्गुणीं सगुणत्वाचा

१ आकाश. २ वेदाचें वचन. ३ बाजीगरी=गारुडविद्या. ४ सहवासानें. ५ आच्छादन. ६ त[illegible] किंवा तवका=धैर्य. ७ तेजानें, प्रभेनें. ८ सोपारा= सोपें, सुलभ.

यावा । कवणे रीतीं जाणिजे ॥ ८८ ॥ ऐसीं आइकोनि शिष्यआक्षेपाचीं उत्तरें । श्रीगुरु बोलों आरंभिलें कृपाभरें । ब्रह्मीं माया जाली कोण्या प्रकारें । तें उत्तर देइजेल ॥ ८९ ॥ अरे जें मुळीं जालें चि नाहीं । त्याची वार्ता सत्यत्वें पुससी काई । पाहें या मृगजळाचे डोहीं । कोणें काय पोहावें ॥ ९० ॥ इंद्रधनुष्यीं बाण कोणें योजावा । वंध्यापुत्र पडैणीं कैसा ढकलावा । तीळपुतळीचा विवाह करावा । कवणे रीतीसीं ॥ ९१ ॥ छायेसी संग घडेल कैसा । तया संध्यारागेसीं झोंबिजेल सहसा । नेत्रींचे बाहुलीसीं लग्नाचा वळैसा । कोणें कीजेल पैं ॥ ९२ ॥ तैसें मुळींचें चि जें असत्य । त्याचें काय वाखाणावें सत्य । आकाशनदीच्या स्नानें कृतकृत्य । कोणें होइजेल पैं ॥ ९३ ॥ मृगजळाचिये सागरीं । सस्याच्या सिंगाची नाव सांजिरी । करूनि चालिला वंध्यापुत्र नगरी । गंधर्वाची लुटावया ॥ ९४ ॥ तवं तेथ थोर अन्योन्य जालें । वंध्यापुत्रें गंधर्वनगर पाडिलें । मग जाळूनियां टाकिलें । चित्रींचेनि हुताशनें ॥ ९५ ॥ वरि मृगजळ आणूनि सिंपिलें । तेणें तणाँचेनि बागुलें विध्वंसिलें । तेथ आरिस्यांतिल्यां पुरुषें केलें । वंध्यापुत्रासी अभिषेचन ॥ ९६ ॥ तेवि मायादेवीचें जालेपण । पुन्हां त्याचें अशंकाग्रहण । आणि अशंकेचें प्रतारण । उत्तर देणें ॥ ९७ ॥ तथापि तुवां हें भावार्थें पुसिलें । तरि अवश्य जाईल सांगितलें । आधीं इचें सत्यत्व तन्हि तुवां पाहिलें । विचारूनि प्रत्ययें ॥ ९८ ॥ ब्रह्म सत्य सार नित्य निर्गुण । माया असार सर्व सगुण । तो हि बाजीगारीऐसा जाण । मिथ्या खेळ इयेचा ॥ ९९ ॥ देखोदेखीं हातींचे हातीं । जे जे पदार्थ खरेपणें दिसती । ते सर्वे चि क्षणमात्रें नासती । पात्यासी पातें न लागतां ॥ १०० ॥ ऐसें सर्वप्रकारें जें असत्य । त्याचें जालेंपण काय होईल सत्य । तें सांगणोरें कोणे रीतीं कृत्य । संपादावें तेथे ॥ १०१ ॥

---

१ उदय. २ दास० ८×३×१. ३ पडण=विसाव्याची जागा. ४ गोंधळ, घोटाळा. ५ सुशोभित. ६ अन्योविन्य=चमत्कार. ७ तृणाचें. ८ बागुलबोवा. ९ पाहतां पाहतां. १० नेत्रपातें. ११ सांगणारानें.

तथापि तुझिया संतोषासाठीं । सांगिजेल मायाब्रह्मींची परिपाटी । तें आदरें सामावीं श्रवणसंपुटीं । श्रोतयांशिरोमणी॥१०२॥दिनकर शरण रामदासीं । रिघोनि विवरिजेल मायाब्रह्मासी । स्वानुभवदिनकरीं सुखसंतोषीं ब्रह्मावबोधें बोधैक्य ॥ १०३ ॥ जेवि क्षीर नीर निवडिती हंस । तेवि स्वानुभवदिनकरीं मायेचा ब्रह्मीं निरास । पुढिलिये कळापीं दिनकररामदास । यथान्वयें वदेल ॥ १०४ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये द्वादश कळापे मायाब्रह्मविवरण नानामत्तप्रतिपादन निरूपणं नाम पंचम कीर्ण प्रकाशः ॥ ५ ॥ ॥ श्रीराम ॥ कळाप वोवीसंख्या ॥ ५३८ ॥

---

## ॥ मायाब्रह्मविवरण कळाप ॥ १३ ॥

### ॥ श्रीरामचंद्र ॥

ॐ नमो सद्गुरु मायातीत । स्वसंवेद्य शुद्ध शाश्वत । सत्य सनातन पूर्णभरित । विज्ञानस्थिति ॥ १ ॥ विज्ञानस्थितीचिया पूर्णपणें । अशाश्वत जें गुणभूतादि केणें[1] । तें मूळमायेसहित सांडणें । करूनि टाकिलें ॥ २ ॥ मग सहजानंदें आत्मस्थिति । विज्ञानाचिया योगें सुखसंवित्ति । स्वानुभवदिनकरीं आईती[2] । संतोषाभिवृद्धि ॥ ३ ॥ तेणें आद्यंत संपूर्ण सस्वरूप । निरशलें गुणभूतैपडप[3] । मूळमायादि जीवेश्वरारोप । स्वरूपीं लयस्थ[4] ॥ ४ ॥ यया स्वरूपाचिया स्वानुभवें । मी माझेंपण कांहीं नाठवे । मी आणि माझें निरशूनि आववें । सद्गुरुस्वरूप ॥ ५ ॥ तें सद्गुरुस्वरूप अंतर्बाह्य । व्यापकत्वें करूनि साह्य । मायाब्रह्म निवडूनि ग्राह्य । सारांशब्रह्म ॥ ६ ॥ त्या परब्रह्मीं माया कैसी जाली । हे पूर्वं कीर्णीं शिष्यें करितां बोली । तेथ सद्गुरूनें नाहींपणें निर्भर्छिली । मृगजळवत ॥ ७ ॥ तथापि शिष्यमनोगत रक्षणें । म्हणौनि बोलिजेल मायाब्रह्माचें विवरणें । संतीं अंतःकर्णाचिया सावधपणें । श्रवण केलें पाहिजे ॥ ८ ॥ ब्रह्मीं माया कव-

---

१ जिन्नस. २ सामग्री, किंवा सहज. ३ अष्टधा प्रकृतीचें आवरण. ४ लीन.

ण्या गुणें जाली । हे बहुतीं बहुता प्रकारीची बोली । आपुलालिया मतें केली । शास्त्रसंमतकारीं ॥ ९ ॥ कोण्ही ह्मणती ब्रह्मीं माया । मुळींहूनि असे शिष्यराया । ब्रह्मावेगळें कदापि इया । होणें नाहीं सर्वथा ॥१०॥ कोण्ही ह्मणती जितुकें व्यापक ब्रह्म । तितुकें चि इयेचें हि व्याप्य कर्म । ब्रह्माचें सकळ वर्म । इयेलागीं ठाउकें ॥ ११ ॥ कोण्ही ह्मणती माया मुळींची । दुसरेपणें आहे खरी चि । ब्रह्माचिया संगें रची खची । नाना सृष्ट्यादि व्यापार ॥ १२ ॥ कोण्ही ह्मणती जरी हे खरी ह्मणावी । तरि निरसिलियां न निरसावी । हे विचारितीं निरसे आघवी । तरि सत्य कैसेनि पां ॥ १३ ॥ कोण्ही ह्मणती जरि हे खोटी असती । तरि कोण्हाचे दृष्टीस न पडती । आणि वेळीं वृद्धी न लागती । बहुवसपणें ॥ १४ ॥ कोण्ही ह्मणती बहुवस जो व्यवहार । त्याचा सत्यत्वें कैंचा विचार । तस्मात माया जाणावी क्षणभंगुर । तरंगवत ॥ १५ ॥ कोण्ही ह्मणती हे ह्मणावी तरंगवत । तरि तरंग क्षणामाजीं नाहीं होत । हे आकल्पपर्यंत दिसत । जैसी तैसी चि ॥१६॥ कोण्ही ह्मणती हे आकल्पपर्यंत । वरिच्यावरि असे होत जात । आहेचिपणें परि अशाश्वत । करणें इयेचें ॥ १७ ॥ कोण्ही ह्मणती हे चि जेव्हां करणार । तेव्हां हे खरेपणें सत्य साचार । कार्यकर्तृत्वाचा विचार । इये चि अधीन ॥१८॥ कोण्ही ह्मणती जरि इयेचे चि अधीन असतें । तरि ब्रह्माचें नांव कोण्हीच न घेते । ह्मणौनि कर्मकर्तृत्व इयेतें । कैसें आरोपिता ॥ १९ ॥ कोण्ही ह्मणती करणार हे चि सत्य । ब्रह्मासी जाणणें इचें कृत्य । सर्व ज्ञातेपणाचें सामर्थ्य । इचे चि ठाईं ॥ २० ॥ कोण्ही ह्मणती हे चि खरी असती । तरि ब्रह्माचें ध्यान कां धरिती । तस्मात खरेपणाची सर्व महंती । वाउगी च दिसे ॥ २१ ॥ कोण्ही ह्मणती ध्यानेंसीं भोग्यजात सकळ । तें इचें इयेसी च करणें अळुमाळ । इजवेगळें आणिक प्रबळ ।

---

१ व्यापण्यास योग्य असें. २ विचारानें, विवेकानें. ३ दास. १५×७×१० ते १२. ४ विस्तारानें, सर्वव्यापकत्वानें. ५ बुडबुड्याप्रमाणें, लाटाप्रमाणें. ६ कांहींबाहीं

कोण असे पैं ॥ २२ ॥ कोण्ही ह्मणती जरि हे चि प्रबळ आघवी । तरि दृश्य पदार्थें कां निरसावी । सकळ द्रष्टेपणें हे चि असावी । इये पृथ्वीमाजीं ॥ २३ ॥ कोण्ही ह्मणती द्रष्टेपणें अवघी हे चि । ब्रह्मीं थोरपणाची शक्ति कैंची । इयेच्या योगें सृष्टीमाजीं ब्रह्माची । कीर्ति होतसे ॥ २४ ॥ कोण्ही ह्मणती काय हें घडेल । जे दादल्यापरिस थोर बाइल । तुमचेनि कैसा हा जी बोल । बोलवला प्रभु ॥ २५ ॥ कोण्ही ह्मणती हें ऐसें नव्हे । ब्रह्माचिया अंगसंगें थोरावे । परि सकळ चराचर हें आघवें । इयेचें निर्मित ॥ २६ ॥ कोण्ही ह्मणती हे निर्माणकर्त्री जाली । मग ब्रह्माची थोरपणें कायसा बोली । ह्मणौनि इयेच्या सामर्थ्यें हे चि व्याली । जगडंबर अवघें ॥२७॥ कोण्ही ह्मणती जगडंबर खरें असतें । तरि तत्काळ चि कां हो नाशतें । आणि त्यामुळें खोटेपण येतें । इजला हि कां ॥ २८ ॥ कोण्ही ह्मणती अहो हे करुणकुमारिका । मना वाटला तो खेळ करी निका । सवें चि त्रिटलियां न लागतां घटिका । मोडूनि टाकी सर्व हि ॥ २९ ॥ कोण्ही ह्मणती कुमारी आठ वर्षेंवरी । हे काय ह्मणावी जन्मकुमारी । आणि भर्त्तारेंविण अभुक्त जे नारी । ते विधवा बोलिजे ॥ ३० ॥ कोण्ही ह्मणती भर्तार इची हे चि । येका आंगीं दों रूपें वर्ते साची । त्रैलोकीं ख्याति पुरुषाची । अर्द्धनारीनटेश्वर ॥ ३१ ॥ कोण्ही ह्मणती अर्द्धनारी-नटेश्वर । तेव्हां आमचे चि बोलणें साचार । सगळी माया होती ते अर्द्धीवर । खोटेपणें आली कीं ॥ ३२ ॥ कोण्ही ह्मणती इयेसी कां हो खोटेपण घडे । हे असे ब्रह्माचेनि पांडें । अनंता ब्रह्मांडाचें सांकडें । चालवी हे चि ॥ ३३ ॥ कोण्ही ह्मणती चालवी परि परतंत्र । ईश्वराआधीन जिचें सूत्र । ते नाशिवंतपणें खेळ करी विचित्र । त्यासंगें नाशे आपण ॥ ३४ ॥ कोण्ही ह्मणती खेळ आंगासी ये । मग जाजावोनि गुप्तपणें लपों जाये । स्थळ कोठें न दिसे तेव्हां सुलीन होये । परब्रह्मीं सगळी ॥ ३९ ॥

१ करण=मनोमयकोश ? इच्छाकुमारी. २ मोलाची, बरोबरीची. ३ त्रासून.

कोण्ही ह्मणती ते ब्रह्मीं राहे खरी । परंतु ब्रह्मासी अगोचर तिची पैरी । दुजेपणेंचि सकळ करी । कार्यकारणरचना ॥ ३६ ॥ कोण्ही ह्मणती जें दुजेपणें चि असे । तें स्वरूपीं सुलीन होईल कैसें । मीठ उदकेंसीं के घूळेंसें । दुजेपणें राहे ॥ ३७ ॥ कोण्ही ह्मणती मोतीं समुद्रीं च जालें । आणि सगळें पाणियाचें चि बोतलें । परि तें शतसहस्र मोलासी आलें । पाणी निमोलें सेवटीं ॥ ३८ ॥ कोण्ही ह्मणती पाणी निमोलें खरें । परि तें राहे युगकल्पावसरें । आणि जें जें मोलाचीं तें चि क्षणभंगुरें । नाशोनि जालीं ॥ ३९ ॥ कोण्ही ह्मणती उपजलें तें नाशेल । अहो ये गोष्टीचें काय कीजे नवल । येऱ्हवीं कल्पांतकाळीं काय राहील । हें विचाराना ॥ ४० ॥ कोण्ही ह्मणती कल्पांतीं सकळ नाशेल । परंतु येक ब्रह्म शाश्वत राहील । त्यावांचूनि विलया जाईल । माईक अवघें ॥ ४१ ॥ कोण्ही ह्मणती ब्रह्म कोणें देखिलें । हातीं धरूनि कोणें दिधलें । आणि तें खरेपणें राहिलें । कासयावऱ्हूनि ॥ ४२ ॥ कोण्ही ह्मणती आत्मज्ञानें पाहिलें । पाहोनि निजअंतरीं विचारिलें । विचारूनि अनुभवसुख घेतलें । स्वानुभवदिनकरीं ॥ ४३ ॥ कोण्ही ह्मणती माया गेलियां विलयासी । आत्मज्ञान मग कोणासी । आत्मज्ञानेंसीं अनुभव कवणासी । स्वानुभवदिनकरीं ॥४४॥ कोण्ही ह्मणती वाच्यांशें असे माया । ते लक्षांशें जाऊनि विलया । ब्रह्मस्वरूप पाहावया । स्वानुभवदिनकरीं ॥ ४५ ॥ कोण्ही ह्मणती वाच्यांश लक्षांश मायेचे । माया नाशलियां कोण काह्याचें । तेथें लक्षावें स्वरूप कोणें कोणाचें । स्वानुभवदिनकरीं ॥ ४६ ॥ कोण्ही ह्मणती पूर्वपक्षीं माया असे खरेपणें । सिद्धांतियेसी ब्रह्म होणें । मग सावकाश सस्वरूप भोगणें । स्वानुभवदिनकरीं ॥ ४७ ॥

---

१ प्रकार अथवा गोष्ट. २ कोठें, कसें. पाण्यांत मीठ पडल्यावर धुळीप्रमाणें तें निराळें कसें राहील? ३ पूर्वपक्ष=यथार्थ विषय प्रतिपादण्यास जी अयथार्थ शंका घेतात ती. ४ शंका निरसन होऊन निश्चय करण्याचे वेळीं. कदाचित् एक ‘ती’ गळाली असावी. ‘सिद्धांतीं तियेसी’ असे शब्द असावेत.

कोण्ही ह्मणती पूर्वपक्ष आणि सिद्धांत । मायायोगें जाले अति विख्यात । माया नाशलियां कोणासी सिद्धांत । स्वानुभवदिनकरीं ॥ ४८ ॥ कोण्ही ह्मणती मायेविण ब्रह्मप्राप्ति । न घडे हें चि श्रुति स्मृति बोलती । परि ते मायेचा विलय होतसे अंतीं । [1]स्वानुभवदिनकरीं ॥ ४९ ॥ कोण्ही ह्मणती मायेचा अंत जाला । माया नाहीं ऐसा निश्चय केला । तरि मग ब्रह्मप्राप्ति कवणाला । स्वानुभवदिनकरीं ॥ ५० ॥ कोण्ही ह्मणती जरि ऐसें ह्मणावें । तरि हें वेदशास्त्र काय खोटें मानावें । आणि संत महंत जे जाले निमग्न आघवे । स्वानुभवदिनकरीं ॥ ५१ ॥ कोण्ही ह्मणती संत महंत वेद शास्त्र । काय मायेवेगळे असे स्वतंत्र । जे ब्रह्मानुभवें जाले चिन्मात्र । स्वानुभवदिनकरीं ॥ ५२ ॥ कोण्ही ह्मणती माया मृगजळाऐसी । सूर्यविवर्तें[2] प्रभा फांके जैसी । प्रभानाशीं मृगजळ नाशे अनायासीं । स्वानुभवदिनकरीं ॥ ५३ ॥ कोण्ही ह्मणती सूर्य प्रत्यक्ष दिसे सगुण । आणि त्यासी अस्तोदय लागले परिछिन्न । ब्रह्म सदोदित परिपूर्ण । स्वानुभवदिनकरीं ॥ ५४ ॥ कोण्ही ह्मणती सूर्याऐसें ब्रह्म ह्मणतां । ब्रह्मीं लागों पाहे सगुणता । ब्रह्म तरि निर्गुण असे स्वभावता । स्वानुभवदिनकरीं ॥ ५५ ॥ कोण्ही ह्मणती साय जैसी दुधावरी । तैसी ब्रह्मीं मायेची असे उंजरी[3] । क्षणें लपे क्षणें प्रगटे साईचे परी । आंगींच्या अंगिकपणें[4] ॥ ५६ ॥ कोण्ही ह्मणती दुध प्रत्यक्ष नाशिवंत । आणि ब्रह्म तरि स्वसंवेद्य शाश्वत । शाश्वतासी नाशिवंताचा दृष्टांत । देणें हें चि लघुत्व ॥ ५७ ॥ कोण्ही ह्मणती दृष्टांत येकदेशी[5] । देणें लागतो समजावयासी । जरि दुजी वस्तु असे वस्तु चि ऐसी । तरि मग थोरपण काय ॥५८॥ कोण्ही ह्मणती बीज जैसें निराकार । त्यापासूनि निफजे नानाकार । तैसा मूळमायेचा प्रकार । ब्रह्मीं जाणिजे ॥ ५९ ॥ कोण्ही ह्मणती बीज कैसें निराकार । प्रत्यक्ष दिसे सगुण साकार । नाशे विटे कां उगवे साचार । तैसें ब्रह्म केवि ह्मणिजे

---

१ ज्ञानस्वरूप. २ विवर्त=भोंवरा, नसून दिसतें तें, भास, मिथ्यारूप. ३ उत्कर्ष. ४ सामर्थ्यानुरूप. ५ अल्प.

॥ ६० ॥ कोण्ही ह्मणती ब्रह्म निर्गुण निर्विकार । निबिड सघन सत्य साचार । यासी बीजत्वाचा दृष्टांत देणें हा काय विचार । थोरपणाचा ॥ ६१ ॥ कोण्ही ह्मणती अहो सुवर्ण । निबिड असोनि अति सघन । त्याचे अळंकार होती नाना घडोन । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ६२ ॥ कोण्ही ह्मणती हे कोण गोष्टी । सुवर्ण अग्निसंगें होय तेव्हां चि खोटी[1] । हीन होय तत्काळ कसवटीं[2] । ब्रह्म काय तैसें असे ॥ ६३ ॥ कोण्ही ह्मणती ब्रह्म अदाह्य अछेद्य । अकुत्स्यपणें स्वसंवेद्य । ब्रह्मीं हीन पदार्थ न मिळे सद्य । सुवर्णीं हीन मिळतसे ॥ ६४ ॥ कोण्ही ह्मणती सुवर्ण प्रत्यक्ष नाशिवंत । ब्रह्म सर्वाद्यपणें असे शाश्वत । यासी अशाश्वताचा दृष्टांत । कैसा देतसा जी ॥ ६५ ॥ कोण्ही ह्मणती ब्रह्म पातळ आणि पोकळ । सुवर्णखोटी[3] जडपणें निखळें[4] । ह्मणौनियां दृष्टांतीं विकळ । सहज चि जालें ॥ ६६ ॥ कोण्ही ह्मणती अहो जैसें । घृत विघरलें तें पोकळ पातळ असे । सवें चि थिजोनि घृतकण होती आपैसे । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ६७ ॥ कोण्ही ह्मणती घृत ह्मणिजे पदार्थ कोण । सकळ दृष्टांतांमाजीं हा दृष्टांत हीन । घृत चिरकाळ ठेविलियां जाय नाशोन । ब्रह्म तें सदैव अविनाश ॥६८॥ कोण्ही ह्मणती ब्रह्म अविट सुगंधित असे । घृत तत्काळ खौंट घाणी लागोनि नाशे । आणि घृत साकारपणें प्रत्यक्ष दिसे । परब्रह्म तें अदृश्य ॥ ६९ ॥ कोण्ही ह्मणती आकाशीं इंद्रधनुष्य । तैसी ब्रह्मीं माया प्रगटे सादृश्य । ऐसें गर्जतसे वेदांतभाष्य । आणि नाना ग्रंथ ॥ ७० ॥ कोण्ही ह्मणती हे कोण गोष्टी असे । ब्रह्म काय आकाशींच्या अभ्राऐसें । जे[6] तेथें इंद्रधनुष्यासरिसें । उद्भवणें मायेचें ॥ ७१ ॥ कोण्ही ह्मणती अभ्राऐसें ब्रह्म ह्मणता । येथ दूषण लागों पाहे तत्वता । जें वारेनि वितुळे स्वभावता । त्यासी ब्रह्मसाम्यता केंवि ॥ ७२ ॥ कोण्ही ह्मणती हें बोलणें चि नव्हे । हा हीन दृष्टांत ऐसें समजावें । जे झीलुँ[7] विरळ

---

१ लगड, गोळा. २ परीक्षा केल्यानंतर. ३ सोन्याची लगड. ४ निष्कल, शुद्ध. ५ मुळांत ' ळ ' गळाला आहे. ६ कीं. ७ झील=हलु.

त्यासी कैसें उपमावें । परब्रह्मेसीं ॥ ७३ ॥ कोण्ही ह्मणती मेघीं अकस्मात विज्जु तळपे । तैसी ब्रह्मीं माया तत्काळ उदिपे । सर्वे चि क्षणमात्रें हारपे । विज्जूचियाऐसी ॥ ७४ ॥ कोण्ही ह्मणती हें तुह्मी काय बोलतां । मेघांसीं ब्रह्मेसीं केविं साम्यता । मेघ तत्काळ वोसरे वायु स्पर्शतां । ब्रह्म वायूसी अभंग ॥७५॥ कोण्ही ह्मणती ब्रह्म घनदाट । शाश्वत निबिड निवोटें । मेघ अशाश्वत आणि पोंचट । ते ब्रह्मेसीं केविं साम्यता ॥ ७६ ॥ कोण्ही ह्मणती पृथ्वीचे आंगीं जैसे घट । तैसें ब्रह्मीं उद्भवे मायेचें कचाट । घटाकारें अनेक जीवसंवाट । मायादेवीकारितां ॥७७॥ कोण्ही ह्मणती ऐसें कैसें घडेल । पृथ्वी ब्रह्मेसीं कैसी तुळेल । पृथ्वी नाशेल जळेल बुडेल । ब्रह्म तें अविनाश ॥ ७८ ॥ कोण्ही ह्मणती पृथ्वीचा दृष्टांत ब्रह्मासी देतां । ब्रह्मासी येवों पाहे परम हीनता । पृथ्वी जड नाशिवंत ते ब्रह्मा शाश्वता । केविं साम्यतेसी येईल ॥ ७९ ॥ कोण्ही ह्मणती जैसें महातेजीं स्फुलिंग । तैसें ब्रह्मीं मायेसी होणें अव्यंग । कार्यकारणयोगेंसीं सांग । नानाकारें निफजे ॥ ८० ॥ कोण्ही ह्मणती हां हो हे गोष्टी उत्तम । ब्रह्मासी आणि महातेजासी सम । ब्रह्म शाश्वत संत सुखधाम । महातेज तें दाहक अति ॥८१॥ कोण्ही ह्मणती अहो दाहक असो अथवा नसो । परि तें येकदेशी आणि नाशिवंतपणाचा अतिशो । धगधगीतपणें ब्रह्मासेजीं बैसों । कैसें तन्हि लाहील ॥ ८२ ॥ कोण्ही ह्मणती ब्रह्म समसाम्यता सीतळ । शाश्वत सनातन सुनिश्चळ । यासी समतेसी सहसा विकळ । महातेज तुछतेसीं ॥ ८३ ॥ कोण्ही ह्मणती गगनीं जैसीं गंधर्वनगरें । तैसी ब्रह्मीं माया उद्भवे निर्द्वारें । क्षणमात्रें येती जाती नानाकारें । तैसी हे हि होतसे ॥ ८४ ॥ कोण्ही ह्मणती गगनासी आणि ब्रह्मासी । साम्यता घडों शके जी कैसी । भूतत्वाचें नाम ठाकलें आकाशीं । ब्रह्म पंचभूतां अतीत ॥८५॥

---

१ उगवे. २ सघन, परिपूर्ण. ३ समुदाय. ४ पूर्णपणें. ५ अतिशय, अतिप्रसंग. ६ समीप, शेजारीं. ७ भिन्न.

असो ऐसें आपलालें अनुभव बोलतां । तेणें अति गंजबु[1] जाला वमा-
वंता । स्वानुभवें ग्रंथार्थ चालत होता । तो राहिला क्षणेक ॥ ८६ ॥
तरि येथ माझा अपराध नाहीं । परस्परें संवादले संत जें कांहीं । तें
त्यक्त करितां थोर प्रत्यवाय[2] हा हि । याचा दोष कोणें घेइजे ॥ ८७ ॥
ह्मणोनि अवश्य बोलणें लागलें । तेणें निरूपण दुरी फांकलें । तरि[3]
समर्थें पाहिजे क्षमा केलें । इये गोष्टीनिमित्य ॥ ८८ ॥ इतुकें वक्ता
बोलतसे भीत भीत । तवं संत सर्वस्वेंसीं क्षमावंत । कृपाभरें उभारूनि
अभय हस्त । नाभी नाभी ह्मणती पां ॥ ८९ ॥ सखया सहज तूं
जें जें बोलसी । तेणें अंकुर निघों पाहाती स्वसुखासी ।
दोंदें[4] पेलती स्वानुभवासी । संतोष पावे वृद्धीतें ॥ ९० ॥
मां हें तरि केवळ ब्रह्मनिरूपण । विशेष मायाब्रह्मींचें विवरण । त्याहि-
माजीं नाना तर्क संभाषण । वेदशास्त्रगर्भींचें ॥ ९१ ॥ वरि बोल अति
सोंबडे परि सखोल[5] । अर्थभरित आणि परमार्थें गोलें[6] । प्रमयान्वयें[7] जाणों
सामावेल । परब्रह्म सगळें ॥ ९२ ॥ ऐसें हि असोनि बोलणें सरळ ।
मितलां[8] बोलीं अति मवाळ । माजीं परमार्थश्रवणें स्वानंद बहळ[9] ।
स्वानुभवदिनकरीं ॥ ९३ ॥ तरि ये गोष्टीनें परमानंद । आह्मांसी हें
निरूपण परम सुखद । तुझिया स्वानंदें चालेल ग्रंथानुवाद । तो चि
बोलें निजसुखें ॥ ९४ ॥ येथ धन्य धन्य गा तुझी बुद्धि । ईमाजीं
परब्रह्म आकळिलें त्रिशुद्धि । नाना निरूपणें तर्क वितर्क निरवधि ।
मनोजन्य करणें ॥ ९५ ॥ अगा धड गोष्टी कोण्हा सांगतां न ये ।
पुसिले पृछेचीं[10] उत्तरान्वयें । मां हें परब्रह्म आकळूं कोणासी ये ।
प्रबोधान्वित यथोक्त ॥ ९६ ॥ ह्मणौनि भला भला गा तूं
गुणनिधि । तुझिया स्वानंदासी उत्तरोत्तर वृद्धि । होऊनि

१ गजबजु ! गजब याचा अर्थ गहजब, जुलूम असा आहे परंतु या ठि-
काणीं गोंधळ या अर्थानें शब्दाची योजना केली आहे. २ पापमूलक, दोषकारक
गोष्ट. ३ तर मग. ४ भोळसर. ५ गंभीरपणाचे. ६ मधुर. ७ विषयव्याप्ति इतकी
आहे कीं. ८ परिमित. ९ अत्यंत, बहुत. १० शंकेचा.

परब्रह्मीं सुलीन बुद्धि । तुजसगट होऊं दे ॥ ९७ ॥ इतुकें संतवाक्येंसीं कृपावरद । आइकोनि स्वानुभवदिनकरीं सुखद । पावोनियां निजसुखस्वानंद । जी जी ह्मणौनि पुढारला ॥ ९८ ॥ ह्मणे जी जी स्वामी संत श्रीगुरो । अकल्पेनाप्यैक आकल्पत्तरो । तुमचिया कृपाकटाक्षें तरों । ग्रंथसागर हा ॥ ९९ ॥ देवा तुह्मावीण आमुचेनि । शब्द न बोलवे भरवसेनि । मां ग्रंथकथानुवादनीं । सामर्थ्य कवणा ॥ १०० ॥ पारि अकळ महिमा जी तुमचा । करूं ह्मणाल तें कराल हा निश्चय साचा । हा वायु चंचळ पारि तुमचे आज्ञेचा । नेंडनाच चालवी ॥ १ ॥ हा सूर्य दिसे अति उष्ण तेजाळ । पारि तुमचिया आज्ञा होय सीतळ । काळ कृतांत हि परम कृपाळ । तुमचिये कृपेनें ॥ २ ॥ अजी तुमची निजकृपा ज्यासी घडे । त्यासी ब्रह्मांड होय प्रमाणुयेवढें । आणि विक्षेपें[4] पाहाल ज्याकडे । त्यासी प्रमाणु काळतुल्य ॥ ३ ॥ ह्मणौनि तुमचिये कृपेचा महिमा अगाध । कृपेसाठीं शब्द ब्रह्म हा निशब्द । नाना ग्रंथानुवाद विविध । कृपायोगें समर्थ ॥ ४ ॥ तुमचिया कृपायोगें साचार । ग्रंथराज स्वानुभवदिनकर । आद्यंत न्यून-पूर्ण सविस्तर । रामींरामदासकृपा ॥ ५ ॥ ग्रंथ वदणार तुमचे तुह्मी । तुमचिया आज्ञा निमित्यमात्र मी । श्रोते वक्ते सकळ हि स्वामी । श्रीरामदास आद्यंत ॥ ६ ॥ अहो रामींरामदासकृपा केवळ । दिनकराचे अवयव सकळ । रामदासकृपेविण विकळ । सर्वांग दिनकराचें ॥ ७ ॥ मुखें मुका नेत्रीं आंधळा । पदीं थोटा आणि हातीं खुळा । सर्वांग-विवर्जित मोदळा । रामदासकृपेविण ॥ ८ ॥ तो चि कृपाघन वर्षतां सुरस । दिनकर सर्वांगीं सपोष । तेणें सर्वस्वें दिनकर रामींरामदास । स्वानंदभरित ॥ ९ ॥ ऐसा स्वानंदाचिया पूर्णपणें । स्वानुभवदिनकरीं

---

१ अकल्पन+अपि+एक, आकल्पोत्तर = चिरकाल, परंतु निदान एक कल्प होऊन जाईपर्यंत तरी, असा अर्थ किंवा कोणी, तुह्मी कल्पनातीत असून हि भक्तांना कल्पतरु च आहां, असा अर्थ करतात. २ आधिक्य, उत्कर्ष. ३ परमाणु. ४ अडथळा किंवा विघ्न आणण्याच्या हेतूनें. ५ सद्गुरुस्वरूपीं.

पेखणें । मायाब्रह्माचिया विवरणें । पुढील कीर्ण तेजस्वी ॥११०॥ दिनकर रामदासीं सुखसंपन्न । माया जालियां ब्रह्मीं सुलीन । स्वानुभवदिनकरीं परिछिन्न । माया ब्रह्म विवरिजे ॥ १११ ॥ स्वस्ति श्री स्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये त्रयोदश कळापे मायाब्रह्मविवरण नानातर्कपरिछेदन निरूपणं नाम प्रथम कीर्ण प्रकाशः ॥ १ ॥ श्रीराम जयराम जयजयराम ॥ रामचंद्र दिनकर रामदास ॥

---

॥ श्रीराम ॥

सद्गुरु ह्मणे निजशिष्यासी । सांगितलें नाना परिभाषांसी । आतां साकल्य मायाब्रह्मविवरणासी । यथान्वयें सांगिजेल ॥ १ ॥ ब्रह्म केवळ जाणिजे निर्गुण । माया सर्वस्वेंसीं मूर्त्तिमंत सगुण । ब्रह्म शाश्वत माया अशाश्वत अपूर्ण । उभयता निवाड ॥ २ ॥ ये गोष्टीचें असे परम सांकडें । निर्गुणीं सगुण कैसें घडे । नाहीं ह्मणावें तरि दृष्टीपुढें । प्रत्यक्ष दिसे ॥ ३ ॥ आतां हें निवडिजे कोण्या योगें । ब्रह्म हें नव्हे कव्हणाजोगें । यासी दृष्टांत द्यावया समांगें । येक हि न दिसे ॥ ४ ॥ अहो पदार्थासारिखा पदार्थ असे । तरि दृष्टांतीं योजितां समरसे । तरि ईश्वरें ब्रह्मांडमाजीं तमासे । विचित्र केले असती ॥ ५ ॥ तरि नाशिवंत जे नाना पदार्थ । ते येकाऐसे येक न दिसती यथार्थ । मां परब्रह्मासारिखा चि पदार्थ । मिळेल काइसेनि ॥ ६ ॥ या गगनासारिखें असावें गगन । तरि दृष्टांतीं योजिलियां सुख गहन । परि तें ईश्वरें न केलें यासी प्रयत्न । काय चाले कवणाचा ॥ ७ ॥ पाहातां धुंडितां त्रिभुवन । पवनासारिखा नाहीं पवन । जीवनासारिखें न दिसे जीवन । कीं तेजाऐसें अपर ॥ ८ ॥ इये पृथ्वीसारिखें दुसरें ।

---

१ भूषण. २ कलाप ११×४×२७ यांतील आशंका, ब्रह्म निःसंग निर्विकार निर्गुण । तेथ तदंगत्वें चि ईश्वरत्व सगुण । कैसें घडों शकेल ॥ इचें समाधान या किरणांत केलें आहे. ३ संकट, अवघड गोष्ट, ४ सम अंग ह्म० लक्षणें असलेलें, ५ एक तें च ( तेज च ).

न दिसे धुंडितां येकसरें । सूर्य चंद्र आणि ग्रहगण साचारें । येकयेक चि हे ॥ ९ ॥ ये पृथ्वीवरी मेरु पर्वत । येक चि असे सुनिश्चित । आतां त्याऐसें दृष्टांतीं उचित । दुजें काय देइजे ॥ १० ॥ ह्मणौनि नाशिवंत जे कां पदार्थ । त्यासारिखें दुजें न दिसे यथार्थ । मां त्या परब्रह्माचिसारिखें दृष्टांतार्थ । काय योजावें पैं ॥ ११ ॥ तथापि पूर्वी कोणीं नाना दृष्टांत योजिले । ते तितुके हि पाषांड[1] थोतांडें उडविले । आतां श्रोतयांचें मन रिझेल वेहिलें[2] । कवणे गोष्टीनें ॥ १२ ॥ तरि आपणासी येक गोष्टी पुसिली । तरि सांगतां न ये कदापि वांकुली[3] । आणि दुसरिआची तरि पुसपुसों सोली[4] । परोपरीं काढिती ॥ १३ ॥ दृष्टांतांवेगळे तरि समजेतिना । दृष्टांत देतां करिती तर्क नाना । ऐसें जन आजानें[5] कांहीं कळेना । यासी कोणें काय कीजे ॥ १४ ॥ तथापि दृष्टांताचिया च्यारि जाती । स्वजातीय विजातीय विगत भेद चौं दृष्टांतीं । नाना संवादकुसरी[6] कीजे महंतीं । परस्परें शास्त्रेंसीं ॥ १५ ॥ आतां याची विवक्षा[7] कीजेल । ते सादरतां[8] संतीं श्रवणीं आइकिजेल । तेणें कृपापसायें[9] वरद देइजेल । स्वानुभवदिनकरीं ॥ १६ ॥ तरि स्वजातीय ह्मणिजे केवळ । आंब्यासारिखें अमृतफळ । विजातीय ह्मणिजे निंबु जांबुळ । आंबा त्याऐसा ॥ १७ ॥ विगत ह्मणिजे केशराऐसा । भेद बोलिजे आंबा सेंदेसरिसा[10] । येवं चतुर्विध पदार्थ दृष्टांतठसा । पदार्थ समजावयासी ॥ १८ ॥ स्वजातीयत्वें आंबा अमृतफळ । नामें दोनि पारि पदार्थ येक चि निखळ[11] । तेथें नामें रूपें कर्में सकळ । ऐक्यता दिसतसे ॥ १९ ॥ विजातीय ह्मणिजे आकार वेगळा । पारि अंबीळत्वें[12] ऐक्य आंब्या जांबळा । केशराऐसा ह्मणिजे तो वेगळा[13] ।

---

१ नास्तिकपणाच्या कल्पनांनीं. २ सत्वर, लौकर. ३ वांकुली=निंदा. ४ साल काढणें=कीस काढीत बसणें किंवा अंगाची कातडी काढणें. ५ अजाण, अज्ञानी. ६ संभाषणचातुर्य. ७ हेतु, कारण किंवा अर्थ. ८ तत्परतेनें. ९ कृपाप्रसादानें. १० सेंद=करंडा, करटी, परंतु या ठिकाणीं शेंदड ह्मणून एक फळ आहे, त्याप्रमाणें किंवा शेंदराप्रमाणें असा अर्थ घ्यावा. ११ निष्कळ, शुद्ध. १२ गोड, आंबट वगैरे रुचीच्या दृष्टीनें. १३ सोडून न पाहतां.

गोडी आणि आकारा ॥ २० ॥ परि अंतरस्थिति आंब्याची । केशराऐसी जाणिजे साची । भेद ह्मणिजे वेगळा चि । सर्वा प्रकारें ॥ २१ ॥ गोडी आकारें वेगळा । अंतरस्थितीसी हि निराळा । परि वर्णव्यक्ति कदाचित पिंवळा । सेंदेऐसा बोलिजे ॥ २२ ॥ हें असो न्यायशास्त्रीं चत्वार गुण । समजावया केलें प्रमाण । प्रत्यक्ष प्रमाण तथा उपमान । आणि अनुमान तो चौथा ॥ २३ ॥ तेथ प्रत्यक्ष ह्मणिजे डोळां देखिजे । प्रमाण ह्मणिजे साक्षीनें जाणिजे । उपमान ह्मणिजे दृष्टांतें समजिजे । अनुमान तो तर्कानुसार ॥ २४ ॥ हें वेदांतशास्त्रीं चत्वार प्रमाण । बोलिलीं वस्तु समजावया लागुन । यावरूनि जाणती विद्वज्जन । वस्तुविवक्षा यथोक्त ॥ २५ ॥ तरि मायाब्रह्मींचें विवरण । समजावया च्यारि पदार्थ प्रमाण । तैसें चौं प्रकारें दृष्टांतीं हि समजोन । नित्यानित्यविचारें ॥ २६ ॥ प्रथम प्रत्यक्षत्वें वस्तु देखिजे । स्वजातीयत्वें नाम बोलिजे । तथा प्रमाणासी ह्मणिजे । विजातीय ऐसें ॥ २७ ॥ उपमान बोलिजे दृष्टांतासी । त्याची जाति विगताऐसी । अनुमान बोलिजे तो भेदासी । एवं चतुर्विध प्रमाणें ॥ २८ ॥ तरि ब्रह्मासी येक स्वजातीयत्वें दृष्टांत । आधीं देऊनि पाहों प्रस्तुत । श्रोते समजोत अथवा क्षोभोत । आपुलिया स्वानुभवें ॥ २९ ॥ तेथ गगनीं जैसा निर्माण पवन । तैसी ब्रह्मीं मूळमाया निर्माण । आतां ये गोष्टीचें साकल्य विवरण । यथान्वयें सांगिजेल ॥ ३० ॥ तरि गगन निश्चळ ब्रह्म निश्चळ । गगनीं वायु चंचळ ब्रह्मीं माया चंचळ । गगन कोमळ ब्रह्म कोमळ । तैसी च वायु आणि माया ॥ ३१ ॥ गगन पोकळ ब्रह्म पोकळ । गगन निर्मळ ब्रह्म निर्मळ । ब्रह्म सर्वदा समकाळ । तैसें चि गगन ॥ ३२ ॥ आतां गगनीं गगनपण शब्दासी । निशब्दीं ब्रह्म बोलिजे गगनासी । जेवि शुद्ध सोनें आणि हीनकसासी । अंतर तें काळिमेचें ॥ ३३ ॥ वर्णें

---

१ आंतील रसाचा रंग. २ परब्रह्माचें स्वरूप. ३ अनिर्वाच्यपणानें गगनाला ब्रह्म ह्मणणें ह्मणजे.

दोन्ही हि पिंवळीं दिसती । परि अग्निमाजीं सोनें पीतवर्ण निश्चितीं । तेथ हीनकस होय कृष्णाकृति । उभयतां अंतर इतुकें चि ॥ ३४ ॥ परंतु पीतपण दोहींचें साचें । ह्मणौनि दृष्टांतीं वर्णकांतीचें । तद्वत गगनीं गगनत्व शब्दाचें । तो[1] निरशलिया खंब्रह्म ॥ ३५ ॥ ह्मणौनि स्वजातीयत्वें प्रत्यक्ष । ब्रह्मासी दृष्टांतीं योजे[2] येक आकाश । त्या आकाशीं उद्भव होय वायूस । तेवि ब्रह्मीं मूळमाया ॥ ३६ ॥ असो गगनीं जाला जो पवन । तो शब्द स्पर्श गुणद्वयें परिछिन्न । तो वायु निजांगीं द्विधा रूपें धरून । उष्णसीतळतेसीं ॥ ३७ ॥ मग उष्णांशीं तेज जन्मलें । सीतळीं उदक निर्माण जालें । समयोगें आळोनि जाहलें । भूमंडळ निर्माण ॥ ३८ ॥ तेथ शब्दरूपें जें गगन । तें प्रणवरूप जाणिजे गहन । तो प्रणव शुद्धसत्व परिछिन्न । जो शुद्ध वायु असे ॥ ३९ ॥ सबळ वायु तो सत्वगुणात्मक । तेज तमोगुणी जाणिजे सम्यक । उदक रजोगुणी निष्टंक । त्रिगुणेंसहित पृथ्वी ॥ ४० ॥ एवं त्रिगुण आणि पंचभूतें । मिळोनि निर्मिती अष्टधेतें । त्यामाजीं शुद्ध वायु चाळितसे[3] निजसत्तें । जीवेश्वररूपें जो ॥ ४१ ॥ असो तें भूमंडळ अति विस्तीर्ण । वरि पर्वत समुद्र वृक्ष पाषाण । च्यारी खाणी चौऱ्यासी लक्ष योनि गणन । सचराचर व्यापलें ॥ ४२ ॥ हें आकल्पपर्यंत असे तिजवरी । पुन्हां वरिच्यावरि सामावे तिजमाझारी । मग कल्पांतीं पृथ्वी [4]विरे नीरीं । नीर शोषी महातेज ॥ ४३ ॥ तेजातें उडवी पवन । पवन जाय शब्दीं समरसोन । शब्द तो गगनीं निशब्द होऊन । गगनपणासी नुरवी ॥ ४४ ॥ तेन्हां केवळ जालें निर्गुण । परब्रह्म स्वयें सघन । एवं स्वजातीय दृष्टांतें मायाब्रह्मविवरण । प्रत्यक्ष जाणिजे ऐसें हें ॥ ४५ ॥ आतां विजातीय दृष्टांतें प्रमाण । जैसे आकाशीं उद्भवती मेघगण । पृथ्वीवरी वृष्टि करूनि संपूर्ण । पुन्हां गगनीं सामावती

---

१ गगन हा शब्द. २ योजतां येतें. ३ आपलें प्रभुत्व चालवितो, इतरांना चलनवलनशक्ति देतो. ४ विरघळते.

॥ ४६ ॥ तैसी ब्रह्मीं उद्भवे मूळमाया । पुन्हां ब्रह्मीं चि जाय विलया । जैसीं कां तें अभ्रपडळें निजछाया । आछादिती गगनातें ॥ ४७ ॥ यासी ह्मणावें विजातीय । कां जे गगन ब्रह्माऐसें होये । परि अभ्रापासूनि सृष्ट्योत्पत्तिकार्य । कांहीं होतां न दिसे ॥ ४८ ॥ तथापि मेघ वृष्टीचिया भरें। उदक वर्षोन वांचवी सचराचरें । तृण धान्य पिकोनियां आदरें । सृष्टिक्रम चालतसे ॥ ४९ ॥ परि तें चि तृण धान्य मेघीं न समाये । ह्मणोनि हा दृष्टांत बोलिजे विजातीय । आतां विगत दृष्टांताचा अन्वय । उपमानेसीं बोलिजे ॥ ५० ॥ तेथ विगत दृष्टांताचें लक्षण । ब्रह्मीं मूळमायेचें विवरण । घटाकाशेसीं उपमान । तृतीय विवक्षा ॥ ५१ ॥ तरि शुद्ध तत्पदार्थें ब्रह्म केवळ । निर्गुण निश्चळ निर्मळ । तेथ उपाधिभेदें शबळ । मूळमायारूप ॥ ५२ ॥ जो शुद्ध तत्पदार्थ निश्चळ । तो चि उपाधियोगें बोलिजे शबळ । घटीं बिंबलें जेवि गगन निर्मळ । तें घटाकाश बोलिजे ॥ ५३ ॥ परंतु हा विगत दृष्टांत जाणिजे । येथें उगें चि उपमानेसीं समजिजे । कां जे आकाश दृष्टांतीं साजे । परि घटत्व भासेना ॥ ५४ ॥ सृष्टिक्रम नव्हता जे समई । तेव्हां घटाची पाहावी कोठें नवाई । आणि घटीं बिंबोनि पुढें कार्याकार्यसोई । तेणें काय केलिया पैं ॥ ५५ ॥ जेथें पंचभूतें चि मुळीं नाहीं । तेथें घटत्वाची वार्त्ता असे कांहीं । आकाशें मग कवणे ठाईं । बिंबणें असे ॥ ५६ ॥ तथापि उपाधियोगें कार्याकारण । सृष्टिक्रम जालियावरि होईल हा प्रमाण । कां जे घटमठादि नाना उपाधि निर्माण । जालिया मग असो ॥ ५७ ॥ आतां ब्रह्मीं माया विवर्त्तरूप । जेवि सूर्यप्रकाशें मृगजळाचा आरोप । भेददृष्टांतें याचें स्वरूप । वोळखोनि जाणावें ॥ ५८ ॥ भेद ह्मणिजे अनुमानीक ज्ञान । जेवि पर्वतीं धूम्र देखिला दुरून । त्या धूम्रावरूनि

---

१ अभ्रपटल. २ मायेचें कार्य. ३ याचा कर्ता मेघ. ४ अपूर्वता. ५ बरें, त्यावेळीं घट मिळून त्यांत आकाशानें आपली व्याप्ति केली असें मानलें तरी अशा घटाकाशाकडून मायेप्रमाणें कार्याकार्य काय घडणार ? ६ मूळाची नसून भासणारी.

तेथें हुताशन । आहे ऐसा जाणावा ॥ ५९ ॥ तेथ अनुमानें करावे नाना तर्क । धूम्रावरूनि तेथें अग्नि आहे ह्मणावा निष्टंक । तरि मनुष्यावीण कोण अग्निद्योतर्क[1] । तस्मात मनुष्य हि असेल ॥ ६० ॥ तरि अन्नोदकसंग्रहाविण । तेथें मनुष्य राहों शके कोण । तस्मात तें हि असेल परिपूर्ण । तरि जाऊनियां पाहीजे ॥ ६१ ॥ ह्मणौनि तेथ धावोनि आला । कां जे अन्नोदक प्राप्त होईल आपणाला । तवं तो आग्यासर्प[2]मुळें अग्नि लागला । तेणें पर्वत जळतसे ॥६२॥ तेथें आपण हि अकस्मात सांपडला । निश्चय[3] केला तो वांया गेला । एवं अनुमानीक ज्ञान होय जयाला । त्यासी मोक्षप्राप्ति न घडे ॥ ६३ ॥ तर्कज्ञानें भावना भाविती येक । तवं तेथें चि वितर्क होती अनेक । ह्मणौनि निष्कारण तें[4] अनुमानीक । प्रत्यक्ष प्रमाण उपयोग्य ॥ ६४ ॥ तथापि तें[5] अनुकूळ नोहे । तरि मग धरावी उपमान अनुमान सोये । असो सांगतां मायाब्रह्मअन्वय । माजीं शास्त्र[6]विवक्षा आठवली ॥ ६५ ॥ ह्मणौनि अनुमानीक ज्ञान कामा न ये । तथापि धरावी कार्यकारणसोय । असो ब्रह्मीं माया- कैसी हा चतुर्थान्वय । बोलिजेल आतां ॥ ६६ ॥ तरि आतां तें अनुमानीक ज्ञान । विवर्ताचें देऊनि उपमान । कीजेल ब्रह्मीं मायेचें विवरण । सूर्यमृगजळदृष्टांतें ॥ ६७ ॥ तरि ब्रह्म निर्गुण निराकार निर्मळ । नित्य सत्य सुनिश्चळ । तो शुद्ध तत्पदार्थ केवळ । वर्णिला वेदें ॥ ६८ ॥ तें स्वयें चि आपेंआप । तेथें नाहीं नाम रूप । मायामय विश्वानुभवें आरोप । कीजे वस्तुत्वाचा ॥ ६९ ॥ जरि दुजी गमे पैं अवस्तु । तरि च ह्मणणें घडे वस्तु । द्वैतें दिधला नसतां हस्तु । अद्वैतत्व घडेना ॥ ७० ॥ आकारासी नसतां ठाव । निराकारत्वाचा हि अभाव । असो मायेचा नसतां प्रादुर्भव । ब्रह्मीं ब्रह्मत्व स्फुरेना ॥ ७१ ॥ एवं नामरूपाचें वर्म । हा सर्वथा नव्हे स्वरूपधर्म । माया-

---

१ अग्नि उत्पन्न करणारा, प्रकाशणारा. २ एकसर्पाची जात आहे; त्याच्या मुखांतून नेहमीं अग्नीच्या ज्वाळा निघतात. ३ आस्तिकता. ४ तें ज्ञान. ५ प्रत्यक्ष आणि प्रमाणज्ञान. ६ तर्कशास्त्राचे दृष्टीनें विवरण.

कवळित जीव स्वकर्म । स्वभावें बोलती ॥ ७२ ॥ मायातीत अचल अव्यय । शुद्ध तत्पदार्थ निष्क्रिय । तेथें च विवर्त्तरूपिणी होय । उत्पन्न मूळमाया ॥ ७३ ॥ ब्रह्मीं माया कदां न घडे । आणि ब्रह्मेविण हें[1] हि केविं घडे । ह्मणौनि अघटितघटना जोडे । नाम इयेचें ॥ ७४॥ तियेतें आधिष्ठूनि राहिलें । ह्मणौनि शुद्धासी शबळत्व आलें । तो शबळ तत्पदार्थ ऐसें बोलिलें । वेदांतशास्त्रीं ॥ ७५ ॥ विवर्त्ताचें स्वरूप ऐसें । सत्य चि असतां अनारिसें[2] भासे । निर्धारूं जातां कांहीं च नसे । भासलें तैसें ॥ ७६ ॥ परब्रह्म परिपूर्ण असतां । अपूर्णतेविण केवि भासे पूर्णता । दुजेनविणें[3] जे अहंब्रह्मता । तें मायेचें स्फुरण ॥ ७७ ॥ ह्मणौनि अघटितघटना बोलिजे । ब्रह्म अद्वैत जिनें प्रतिपाद्य कीजे । तिनें चि नाथिलें[4] द्वैत दाविजे । ह्मणौनियां ॥ ७८ ॥ अद्वैत ह्मणिजे दुसरें नाहीं । तेथें दुजें तें लटिकें चि पाहीं । तथापि अन्यथा[5] जें भासे कांहीं । ते अघटितघटना ॥ ७९ ॥ सूर्यप्रकाश नव्हता अनारिसा । तेथें नाथिला चि जळाभास मृगासी कैसा । तो[6] सूर्यविवर्त ह्मणिजे जैसा । तैसा ब्रह्मविवर्त्त जनासी ॥ ८० ॥ ते मूळमाया जेथ आभासे । तयेतें आविष्ठूनि जें वसे । तो शबळ तत्पदार्थ येरें[7] असे । शुद्ध चि अवघा ॥ ८१ ॥ जेथें मृगजळ आभासलें । त्या प्रकाशासी साकारत्व कल्पिलें । तद्रूपत्वें व्यापकत्व जयासी आलें । येर अवघे निराकार ॥८२॥ असो एवं ब्रह्मीं मायेचें स्फुरण । याचें चौं प्रकारें सांगितलें लक्षण । प्रत्यक्ष प्रमाण आणि उपमान । अनुमान तो चौथा ॥८३॥ चहूं लक्षणीं च्यारी दृष्टांत शुद्ध । स्वजातीय विजातीय विगत भेद । येणें दृष्टांतें जालें निर्व्यवाद । मायाब्रह्मविवरण ॥ ८४ ॥ प्रथम गगनीं जाला पवन । तेवि ब्रह्मीं मायेचें जालें स्फुरण । स्वजातीयत्वें हें प्रत्यक्ष अनुमोदन । वेदवेदांतप्रतिपाद्य ॥ ८५ ॥ दुजें विजातीय दृष्टांतें साक्षित्वें प्रमाण ।

---

१ ब्रह्माच्या आश्रयावांचून मायेचें स्वतंत्र राहणें. २ वेगळें, भिन्न. ३ अद्वैतरूपानें. ४ लटिकें. ५ जें केवळ सत्य हि नाहीं व केवळ मिथ्या हि नाहीं असें. ६ जळाभास होणें. ७ मायाधिष्ठित ब्रह्माखेरीज बाकीचें.

जेवि गगनीं देखिजे गंधर्वभुवन । तेंवि ब्रह्मीं मायेचें जालेपण । आतां तिजा पदार्थ सांगिजेल ॥ ८६ ॥ विगत दृष्टांत उपमानेसीं । घटाकाशवत होणें ब्रह्मीं मायेसी । अनुमानिक भेद दृष्टांतीं सूर्यविवर्त्तासी । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥८७॥ एवं चहूं उपलक्षणीं ब्रह्मीं माया । स्फुरद्रूप जाणिजे शिष्यराया । यावेगळे दृष्टांत ते वांया । विटंबना ब्रह्माची ॥ ८८ ॥ तरि यावेगळे नाना दृष्टांत । मायाब्रह्मावरी देती संत । ते सांगतां आपुलें चि चित्त । सलज्ज होतसे ॥ ८९ ॥ ह्मणती ब्रह्मीं माया कैसी जाली । जेवि सूर्यबिंब प्रतिबिंबे सलिलीं । तरि सृष्टि चि आकारासी न्हती आली । तेथ बिंब प्रतिबिंब काइसें ॥ ९० ॥ किंवा ह्मणती बीजीं जेवि जाला तरु । कीं सुवर्णीं नाना अळंकारु । कीं तो दुधावरी सायेचा प्रकारु । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ९१ ॥ कीं ते उदकावरी नाना तरंग । कीं समुद्रीं लहरिया अनेग । कीं नाना घटीं निफजे पृथ्वीचें आंग । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ९२ ॥ कीं तेलावरी पुतळी आली । कां ते शरीरीं छाया लिंगटली । किंवा दोरीं सर्पाकारें भासली । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ९३ ॥ कां तें अभ्रीं धनुष्य निघालें । किंवा शुक्तिकेवरी रुपें भासलें । कीं आरिसां रूप देखिलें । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ९४ ॥ कीं नेत्रीं बाहुली देखिली । कां ते जळीं प्रतिभा भासली । कीं अकस्मात दृष्टि तरळली । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ९५ ॥ कां जेवि संध्यारागीची प्रभा । कीं नीळिमा पर्वतीं स्वयंभा । कीं छायामंडपीं कोण उभा । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ९६ ॥ कीं गुहिरियीं सरडाचे नाना रंग । मेघीं उमटती रंग अनेग । कीं भिंतीवरी चित्र जैसें सुरंग । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ९७ ॥ कीं रात्रीं राळेचिया ज्वाळा । किंवा तो जैसा धूम्रपुतळा । कां त्या चंद्रीं जैशा सोळा कळा । तैसी

१ पाण्यांत. २ अर्थात् मृत्तिकेचें. ३ पुतळाच्या किंवा इतर आकाराचा तवंग. ४ लागली, चिकटली. ५ शिंपल्यावर. ६ आरशांत. आं असा सप्तमीचा प्रत्यय आहे. ७ प्रतिबिंब. ८ तरळणें=भांबावणें, खेळणें. ९ यांत्रिक शुभ्र वस्त्राचा पडदा सोडून त्याचे आंत दिवा लावून त्यामधून जीं निरनिराळीं चित्रें दाखवितात त्याचें नांव. १० इच्छेनुसार क्षणोक्षणीं रंग पालटणाऱ्या सरड्याची एक जात आहे.

ब्रह्मीं मूळमाया ॥ ९८ ॥ कीं ते सूर्यप्रभा चिरींवे गमे । कीं नभीं चक्रें दिसती दृष्टीसंभ्रमें । कीं जैसें व्योमीं[2] देखिजे नीळिमे । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ९९ ॥ कां ते नटाची सोंगसंपादणी । कीं बहुरूपीची रावो राणी । कीं ते बाजीगारी[3] जैसी साचपणीं । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ १०० ॥ कीं ते बेगडाचे अळंकार । कीं पारियांचीं मोतें साचार । कीं ते अभ्रकाची झगमग वर । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ १ ॥ कीं जेवि तूप विघरलें तें थिजलें । कीं तें शस्त्रामाजीं पाणी देखिलें । कीं मोतीं पाणिदार मोलावलें । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ २ ॥ कीं ते मेघीं विद्युल्लता झमकली । कीं अकस्मात गडगर्जना जाली । कीं गगनीं रात्रीं नदी देखिली । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ३ ॥ किंवा नाद उमटे अश्वाआंगीं । कीं उदकीं फेण होय सर्वांगीं । कीं स्वप्नामाजीं देखिजे अनेगीं[6] । तैसी ब्रह्मा मूळमाया ॥ ४ ॥ ऐसे नानापरी हीन दृष्टांत । मायाब्रह्मासी योजूनि असंख्यात । त्या ब्रह्माची विटंबना बहुत । केली ग्रंथकर्त्यांनीं ॥ ५ ॥ अहो सूर्यासीं उपमितां खद्योत । तरि काय हें ग्रंथकर्त्यांसी उचित । तैसे ब्रह्मासी देऊनि हीन दृष्टांत । नानापरी बोलती ॥ ६ ॥ अहो आंब्याचें कैसें गोडपण । जैसें तें प्रत्यक्ष इंद्रावँण । तरि हें काय भूषण दूषण । आंब्यासी कीं आपणासी ॥ ७ ॥ जरि सार्वभौमासी देखतां दृष्टीं । तुज रंकाऐसी हो भाग्यपुष्टि । ऐसें ह्मणतां काय त्यासी संतुष्टि । चित्तामाजीं वाटेल ॥ ८ ॥ कीं तो आधिकें चि यासी क्षोभेल । तत्काळ रासभारोहण करील । सेवटीं शिरछेदास हि प्रवर्त्तेल । क्षोभक दृष्टीनें ॥ ९ ॥ पाहा मनुष्यासी न साहे हीन दृष्टांत । मां त्या सर्वेश्वरासी देणें हें काय उचित । येणें कैसें न क्षोभे त्याचें चित्त । आणि बरें पाहेल तो केवि ॥ ११० ॥ तथापि सर्वब्रह्मे ग्रंथकर्ते जाले । तेंहीं कुंकुम द्वारावतीसी येक केलें ।

---

१ पृथकपणें फाकलेली. २ आकाशांत. ३ बाजीगरी=गारुडविद्या. ४ पान्याचीं. ५ चकाकी. ६ अनेक प्रकारच्या वस्तु. ७ कडू कंवडळ ( हंसकोश ) ८ गाढवावरून धिंड काढील. ९ दृश्यादृश्य सर्व ब्रह्म आहे असे ह्मणणारे; ब्रह्म मायेचा भेदभाव न पाहणारे.

अवघें चि ब्रह्म जेथ जालें। तेथें उंच नीच कवणासी ॥ ११ ॥ जें चि परब्रह्म ते चि माया। तें चि विश्वेसीं सर्वब्रह्म स्थापूनियां। शिष्यासी सर्वब्रह्म बोधूनियां। अवघें चि येक ह्मणती ॥१२॥ अहो जरि अवघें चि येक होतें। तरि मग वेदशास्त्रविधी कासियासी ते। ह्मणौनिया येवढिया अन्यायातें। कोणें काय ह्मणावें ॥ १३ ॥ अवघा जाहालासे गलबला। कोण्ही नायके कोण्हाचिया बोला। या सर्वब्रह्मयांनीं ब्रह्मासी आणिला। हीनापवाद दृष्टांतें ॥ १४ ॥ परंतु ब्रह्म शुद्ध बुद्ध सत्य शाश्वत। त्यासी हे बाधूं पाहाती काय दृष्टांत। परि यांचिया योगें हीनता पावत। हे चि निजांगीं ॥ १५ ॥ अहो सूर्यासी उपमिला कोळसा। कीं राजहंस तो डोंबाऐसा। तरि या बोलीं ज्याचा तो चि सहसा। मूर्खत्वासी आला ॥ १६ ॥ पाहातां ब्रह्म निर्गुण निसंग निर्विकार। त्यासी हे हीन दृष्टांत देती जे साचार। यमयातनेचे जे नाना नर्कप्रचार। हे देवें त्यांसी निर्मिले ॥ १७ ॥ इतुकें संतीं आइकतां चि वचन। स्वानुभवदिनकरीं संतोषोन। ह्मणती भला भला गा तुझें सर्वेश्वर कल्याण। उत्तरोत्तर करूं सुखें ॥ १८ ॥ तूं ब्रह्मगरिमा जे बोलिलासी। ते सर्व हि ब्रह्मार्पण परिपूर्णतेसी। आतां पुढीलिये ग्रंथकथेसी। अनुवादें सुखें ॥१९॥ इतुका संतवाक्यपसाय लाधोनि। दिनकर रामींरामदासीं समरसोनि। स्वानुभवदिनकरेसीं अनुदिनीं। सहजस्थिति ऐक्यता ॥१२०॥ येथूनि संपलें मायाब्रह्मविवरण। पुढें सांगिजेल सर्वेश्वरलक्षण। प्रकृतिपुरुषेंसी पुढील कीर्ण। कथानुवाद करील ॥१२१॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये त्रयोदश कळापे परब्रह्ममूळमायाविवरण निरूपणं नाम द्वितीय कीर्ण प्रकाशः ॥ २ ॥ श्रीराम जयराम जयजयराम ॥

---

॥ श्रीराम ॥

आइकोनि मायाब्रह्मीचें विवरण। शिष्य सर्वांगें सुखावोनि पूर्ण।

---

१ डोमकावळ्याप्रमाणें. २ करो. ३ ब्रह्माचें खरें महत्व. ४ प्रसाद.

ह्मणे जी स्वामी निवाड केला परिछिन्न । गुरुशास्त्रआत्मप्रचिति ॥ १ ॥ जेवि कां ते निजचंचु राजहंस । क्षीर नीर निवडिती निःशेष । कां ते परीक्षवंत नाना नाणियांस । खरें खोटें निवडिती ॥ २ ॥ तेवि जी दयाळा कृपामूर्ति । ब्रह्मीं मायेची निवडिली उत्पत्ति । आतां तें पुरुष आणि प्रकृति । हें कोणासी ह्मणिजे ॥ ३ ॥ ऐसी शिष्येनि भावें करितां विनति । सद्गुरूसी जाली परम विश्रांति । तरि पुसिला जो प्रश्नु यथानिगुति[1] । तो श्रवण करीं अत्यादरें ॥ ४ ॥ तरि ब्रह्मीं अहं-ब्रह्म जें स्फुरण । तें चि प्रकृतिपुरुषाचें लक्षण । सूक्ष्मस्वरूपीं अष्टधा गहन । अव्यक्तरूपें बोलिजे ॥ ५ ॥ जैसा निश्चळ गगनीं चंचळ पवन । तो द्विधारूपेसीं परिछिन्न । शुद्धशबळत्वें जाला निर्माण । तैसी ब्रह्मीं मूळमाया ॥ ६ ॥ गगनीं शुद्धभागें उदेला जो पवन । अर्द्धमात्रात्मक प्रणवोच्चारण । तो चि परमात्मा परिछिन्न । सर्वेश्वररूप जो ॥ ७ ॥ उरला जो शबळ भागें पवन । तो अकार उकार मकारात्मक जाण । तेथें त्रिगुण जाले निर्माण । रज सत्व तम सूक्ष्मत्वें ॥ ८ ॥ त्या शबळ पवनीं तमोगुणरूपें । उष्णांश जो कां आरोपे[2] । तो देदिप्यमान तेजा-चिया स्वरूपें । प्रगटता जाला ॥ ९ ॥ तैसा चि रजोगुणस्वरूपें सीतळांश । तो उदकरूपें जाला सार्द्रांश[3] । निजांगीं वायु सत्व-गुणांश । धरिता जाला स्वानंदें ॥ १० ॥ पुढें उष्णांशीं तेज प्रगटलें । शीतांशीं उदक निर्माण जालें । परस्परानुयोगें आळों गोठों लागलें । पृथ्वीमंडळ हें ॥ ११ ॥ मुळीं शब्दगुणेसीं गगन । शब्दापासूनि स्पर्श जाला निर्माण । ह्मणौनि शब्द स्पर्श हे दोन्ही गुण । वायूचे आंगीं असती ॥ १२ ॥ त्या वायूपासूनि जालें तेज । तें रूपगुणेसीं प्रगटे सहज । मुळींचे शब्द स्पर्श गुण द्विज । हे हि तेजीं शोभले ॥ १३ ॥ एवं तेजीं शब्द स्पर्श रूप । उदकीं रसत्वाचा आरोप । मुळींचे शब्द स्पर्श रूप । हे उदकें धरिले ॥ १४ ॥ एवं शब्द स्पर्श रूप रस । चहूं गुणीं उदक सपोष । त्यांपासूनि पृथ्वी

---

१ यथार्थ. २ कल्पना केली. ३ सार्द्रांश=पातळ, ओलसर.

ते धरी गंधगुणास । आणि मुळींचे च्यान्ही हि ॥ १५ ॥ एवं शब्द स्पर्श रूप रस गंध । पृथ्वी जाणिजे पंचविध । एवं पंचभूतें आणि त्रिगुण मिळोनि प्रसिद्ध । अष्टधा प्रकृति ॥ १६ ॥ ऐसी अष्टधा रूपें मूळमाया । सर्वेश्वर अधिष्ठिला इया । पुढें परस्परानुमेळें कारणकार्या । प्रसवती जाली ॥ १७ ॥ हे मूळमाया विवर्तरूपिणी । इयेचीं रूपें जालीं तिन्ही । मूळमाया तथा माया आणि । तिजी ते अविद्या ॥१८॥ जे स्वरूपोन्[1]मुखा ते मुळमाया । जे प्रपंचोन्मुखा ते माया । जे प्रपंच-रूप चि होऊनियां । राहिली ते अविद्या ॥ १९ ॥ येणें त्रिरूपें येकी प्रकृति । पुरुष आत्मा ऐसिया श्रुति । तो येक चि परि उपाधिभेदें संतीं । त्रिधा बोलिजे ॥२०॥ मूळमायोपाधिभिन्नत्वें आत्मा । तो चि मायोपा-धीं ईश्वर प्रत्यगात्मा । त्यास चि अविद्योपाधीं जीवात्मा । ऐसें बोलती ॥२१॥ त्रिरूपें येक पुरुष अनंग[2] । त्यासी प्रकृतियोगें अंगसंग[3] । तयाचा समागम रसरंग ये प्रकृतीसी ॥ २२ ॥[4] पुरुष आपुलिया निजसत्ता । प्रकृतीचा असे वेत्ता[5] । आणि प्रकृतीचिया वृत्तांता । येणें चि साफल्य ॥ २३ ॥ प्रकृति पुरुषाचें अर्द्धांग । आभास मात्र भिन्न भाग । जैसें अर्द्धनारीनटेश्वराचें सोंग । येक चि दोहीं रूपीं ॥ २४ ॥ ते प्रकृति अस्वातंत्र्यें[6] नेणे पुरुषासी । पुरुष स्वकीयत्वें जाणे तियेसी । ऐसिया सहवासें येकमेकांसी । स्वरूपसिद्धि ॥ २५ ॥ एवं मूळपुरुष मूळप्रकृति । इयें चि प्रकृतिपुरुषें बोलिजे श्रुति । कार्यकारणभावें वर्त्तती । अभिन्नरूपें ॥ २६ ॥ सांगतां प्रकृतिपुरुषांचा महिमा । परम विश्रांति निगमागमा । जियेनें स्वसामर्थ्यें जगदात्मा । वश्य करूनि ठेविला ॥ २७ ॥ ते गुणमयी तो गुणनियंता । ते विश्वसंजीवनी तो विश्व-शास्ता । ते जगज्जोति तो जगद्भर्ता[7] । पुराणपुरुष ॥ २८ ॥

---

१ मूळ ब्रह्मस्वरूपाकडे तोंड करून ह्मणजे जिचा ओढा मूळस्वरूपाकडे विशेष. २ निराकार. ३ संलग्नता. ४ या दोन चरणांचीं अक्षरें मुळांत अशीं आहेतः 'तयाचा सहागमरसरंये प्रकृतिसि' ? ५ जाणणारा. ६ स्वतंत्र नसल्यामुळें. ७ जगाचें पोषण करणारा.

ते शक्ति तो सदाशिव । ते सद्भक्ति तो सद्भाव । ते स्वयंज्योति तो स्वयमेव । स्वयंप्रकाश ॥ २९ ॥ ते सर्वसाक्षिणी तो सर्वेश्वर । ते तुर्या तो प्रत्यगात्मा साचार । ते इछा तो कुमार । परब्रह्मींचा ॥ ३० ॥ यांची परस्परें कुळवाडी[1] । सांगतां पैं असांघडी[2] । प्रकृतिजोडिया जोडी[3] । पुरुष भक्षी ॥ ३१ ॥ ते आमुला[4] हे आमुली । ययां संगेति[5] नाहीं देखिली । परि सकळ कुळवाडी जथिली[6] । ययां चि दोवीं ॥ ३२ ॥ तो अनंग आणि निसुधा । निकामी आणि पैंधा[7] । जीर्णपणें अति वृद्धां- । हूनि वडिल ॥ ३३ ॥ त्या आडनांव पुरुष । येऱ्हवीं स्त्री नाहीं जडेमाणुस[8] । सेवटीं पुरुषत्व हि त्यास । हे चि आणी ॥ ३४ ॥ तो अचक्षु अश्रवण । अपाणी आणि अचरण । नांव कर्म ना वर्ण । कांहीं च नाहीं ॥ ३५ ॥ अवयवहीन कांहीं च नसे । तो चि जयेचा भर्त्ता[9] असे । तियायोगें भोगणें आपैसें[10] । सुखदु:खाचें जया ॥ ३६ ॥ तो समुळीं देखिजे[11] अकर्त्ता । असोनि उदास अभोक्ता । परि इयेनें येकपत्नीव्रता । तया वेवविलें ॥ ३७ ॥ जयेसीं पाहातां आळुमाळु[12] । रूपागुणाचा चाळेंढाळु[13] । परि असेल तैसा हि खेळ । आणीतसे रूपासी ॥ ३८ ॥ पाहातां हे प्रकृति चि सावेव । परि त्रिगुणासी होणें ईपासाव । ह्मणौनि गुणमयी इचें नांव । गुणक्षोभिणी ॥ ३९ ॥ हे प्रतिक्षणीं नीचेंनवी[14] । नामारूपाची च आघवी । सकळ जनातें आश्रावी[15] । हे चि येक पैं ॥ ४० ॥ इचेनि सकळ नामें प्रसिद्धें । रूपें भासती इचेनि विविधें । सर्व हि इंद्रियें सावधें । इयेकारितां ॥ ४१ ॥ असोनिया नपुंसक मन । इचेनि भोगी त्रिभुवन । अहंकारासी थोर आंगवणें[16] । इचेनि संगें ॥ ४२ ॥ महा दीप हे कामाचें । वसौटें दिसे क्रोधाचें । निज-

---

१ व्यापार, व्यापआटोप. २ असांगडें=निरुपम. ३ प्रकृतिपुरुषांच्या वर सांगितलेल्या जोड्या ह्या सर्व. ४ संततिरहित. ५ इष्टमित्र, गणगोत वगैरे सहवासी. ६ गुंतविली? ७ पांगळा. ८ जड=ज्ञानहीन. किंवा जडलेलें. ९ पोशिंदा. १० अपैसें= आपलें आपण. ११ मुळांत 'देखि' आहे. १२ कांहींबाही. १३ ढाळ=अभिषेक, रसपूट. १४ नित्य नवी. १५ आश्रय देते. १६ इच्छा.

द्धाम मोहाचें । भयासी थारा हे ॥ ४३ ॥ हे व्यामोहाचा थारा । इया भ्रमाचा डांगोरा । विश्राम सकळ विकारां । शोकसंतापेसीं ॥ ४४ ॥ हें वाङ्मयाचें सांटें । साकारपणाचें वेसौटें[2] । प्रपंचाचें आगिठें[3] । अखंड धुपे ॥ ४५ ॥ येथूनि जालिया कळा । विद्या वाढती येथ सकळा । स्वधर्मासी प्रताप आगळा । स्वकर्मसहित ॥ ४६ ॥ त्रिगुणाच्या तिन्ही शक्ति । इयेपासाव विकाशती । ज्ञानक्रिया द्रव्यसहिती । इछेसी व्याली हे ॥ ४७ ॥ हे चमत्काराचें वेळाउळें[4] । नादाची हे टांकसाळ । सकळ चराचरखेळ । इयेचा चि पैं ॥ ४८ ॥ उत्पत्ति स्थिति प्रळय । हें इयेचें काळत्रय । सुषुप्ति स्वप्न जागर तुर्य । अवस्था इयेच्या ॥ ४९ ॥ हे अनंगातें आवरी । असंगातें स्वीकारी । चाळकासी सामावी उदरीं । निसंगपणें ॥ ५० ॥ हे सौभाग्याचें भरितें । कीं हे सौजन्याचें उंजितें । सर्वगुणाचें आइतें[6] । भांडार हें ॥ ५१ ॥ चौदा विद्या चौसष्टि कळा । त्यांचा येथ येकवळा[7] । दैवी संपदा ज्या सकळा । त्यांची आरांभ हे ॥ ५२ ॥ हे शृंगाराचें धाम । शांतीचें सौभाग्य निःसीम । क्षमा दया निष्काम काम । जिंती इयेचेनि ॥ ५३ ॥ तो अद्वय अनादि असंग । हे द्वैतसिद्ध सर्वसंग । तो अभंग अजर अनंग । हे सर्वसंग पूर्णता ॥ ५४ ॥ तो अद्वैत हे दुसरे । तो निःसंग हे सोयरें[10] । तो निराळेंं[11] सर्व हि घरें । बांधलीं इया ॥ ५५ ॥ तो अनावर हे आवरी । तो अचर्च्य हे सर्व चर्चा करी । तो अनाम हे नाना नामें धरी । विश्वात्मकेसीं ॥ ५६ ॥ तो स्वयंभ हे संभूति[12] । तो नुसधा[13] हे सर्व धरिती । तो अमूर्त हे मूर्ति । सावयवेसीं ॥ ५७ ॥ तो निरावेव हे सर्वावयव । तो अरूप हे स्वरूप स्वयमेव । तो निष्कर्म हे कर्मप्रसर सर्व । आवरी सोडी ॥ ५८ ॥ तो अनार्त्त[14] हे सकळार्ति । तो संपूर्ण हे अपूर्णाकृति । तो उदास हे

---

१ सोबती. २ घर. ३ आगटी. ४ घर. ५ पेट. ६ स्वतःसिद्ध. ७ एकोपा. ८ बाग. ९ राहतात, जगतात. १० सर्वत्र इचा गोतवळा आहे. ११ गृहविहीन. १२ उत्पत्ति. १३ आधाराशिवाय. १४ रोगविहीन, इच्छारहित. आर्त=रोगी इच्छा किंवा आवड.

प्रतिपाळकर्ती । विश्वजनाचा ॥ ५९ ॥ तो निराकार हे आकार । तो निराधार हे आधार । तो निर्विकार हे सविकार । बहुवसपणें ॥ ६० ॥ तो शुद्धसत्व हे इच्छाशक्ति । तो प्रणव हे अर्द्धमात्रा व्यक्ति । तो क्षेत्रज्ञ हे क्षेत्रयुक्ति । सर्व हि करी ॥ ६१ ॥ तो चंचळ हे जड । तो सुक्षम हे प्रचंड । तो आत्मा हे चित्शक्ति अखंड । आत्मसंविति[1] ॥ ६२ ॥ तो स्वसंवेद्य[2] हे स्वरूपस्थिति । तो स्वानुभव हे अनुभूति । तो स्वप्रकाश[3] हे स्वयंज्योति । चिदानंदघन ॥ ६३ ॥ हे अर्द्धनारी तो नटेश्वर । हे षड्गुण तो ईश्वर । हे अपर तो परात्पर । परमात्मा चि पैं ॥ ६४ ॥

असो ऐसीं हें पुरुष प्रकृति । दोघें अभिन्नपणें वर्तती । यांचें कर्तृत्व सांगतां वेडावती । च्यान्ही वेद ॥ ६५ ॥ अर्द्धनारीनटेश्वर बोलिजे । तो हा व्यवहार जाणिजे । महावाक्यशब्द निफजे । ययां चि पासीं ॥ ६६ ॥ अहर्निश महावाक्याचा जप । यांस चि करणें सक्षेप[4] । मी शुद्धबुद्ध परब्रह्मस्वरूप । यास चि ह्मणणें ॥ ६७ ॥ ब्रह्माहमस्मि महावाक्य । येथींचा अर्थ अति अतर्क्य । ब्रह्मेसीं ईश्वरत्वें होतां पार्थक्य । तो ऐक्यासी आला तेणें चि ॥ ६८ ॥ ब्रह्मस्मरणें स्वरूपोन्मुख जाला । विस्मरणें मायेकडे फिरला । स्मरणविस्मरणें राहिला । ईश्वरपदीं चि ॥ ६९ ॥ असो ऐसें जेथ अखंड स्मरण । तें चि मूळमायेचें अधिष्ठान । स्मरणानंतरें विस्मरण । तें अव्याकृत बोलिजे ॥ ७० ॥ विस्मरणाचि-सारिखा भ्रम । तो चि अविद्यमायेचा उपक्रम । जो स्वरूपासी चि जीव-धर्म । असोनियां[5] आरोपी ॥ ७१ ॥ मूळमायेचेनि विकारें । सत्ताचैतन्य[6] जितुकें आकारे । तें प्रत्यक्चैतन्य निर्द्धारें । श्रुति बोलती ॥ ७२ ॥ सत्ताचैतन्य जो ईश्वर । तो चि उपाधिभेदें जीवाकार । जैसा घटामाजीं दिनकर । तेवढा चि दिसे ॥ ७३ ॥ प्रत्यक्चैतन्य जीवचैतन्य[7] । उपाधि भेदें येऱ्हवीं ब्रह्मीं अनन्य । तैस्या चि माया अविद्या अन्य[8] । मूळमायेसीं

---

१ आत्मज्ञानरूप. २ ज्ञानस्वरूप वस्तु. ३ म्हणजे सत्रूप. ४ साक्षेपें=उत्कंठेनें, यत्नानें ? ५ नसोनियां ? ६ सत्तचैतन्यापैकीं दुसरें जें ईशचैतन्य त्यास च सत्ता किंवा प्रत्यक् चैतन्य म्हटलें आहे. ७ सत्तचैतन्यापैकीं तिसरें. ८ उपाधिभेदें अन्य एऱ्हवीं अनन्य.

॥ ७४ ॥ सर्वेश्वरें मूळमाया अवलोकिली । ते त्रिगुण पंचभूतें यथाक्रमें व्याली । ते येकवटोनि ऐक्यासि आली । कर्दमरूपें अष्टधा ॥ ७५ ॥ पुढें पांचा भूतांचीं पंचवीस तत्वें । सकळें चळती पृथक्त्वें । सजीवें होऊनि येकत्वें । वर्तो लागती ॥ ७६ ॥ पुढें जितुकें जैसें तत्व आकारें । तितुका तैसा चि तत्वज्ञ विस्तारे । स्वयें चळे चाळी सविकारें । जडें चि केवळ होती जे ॥ ७७ ॥ जें जें तत्व तें तें क्षेत्र जाणिजे । क्षत्रज्ञ ईश्वर सर्वत्र बोलिजे । नाहीं तरी जडीं काय चेष्टिजे । त्या ईश्वरेंविण स्वयें ॥ ७८ ॥ त्या ईश्वराचे चि इछाविशेषें । द्विधा जालीं तत्वें अनायासें । सार्द्ध अपंचीकृत सावकाशें । हिरण्यगर्भ ईश्वराचें ॥ ७९ ॥ प्रकृतिपुरुषसंन्निधानें । महत्तत्वासी निर्माण होणें । स्वशक्तीसीं प्रकटणें । त्रिविधाहंकारें ॥८०॥ त्रिविध अहंकाराची त्रिपुटी जाली । ते सशक्ती सत्वरजतमेसीं विस्तारली । ज्ञानक्रिया द्रव्यशक्तीसीं आकारलीं । पंचमहाभूतें ॥ ८१ ॥ सत्वगुणीं शब्दगुणेसीं आकाश जालें । तेथून अंतःकरणपंचक व्यक्तीसीं आले । अंतःकर्ण मन बुद्धि चित्त अहंकारेसीं विस्तारलें । पंचक ज्ञानशक्तीसीं ॥ ८२ ॥ क्रियाशक्तीसीं रजोगुण । करिता जाला पंधरा तत्वें निर्माण । तें एवं रूप विचारूनि आपण । पाहावीं तत्वविदीं ॥ ८३ ॥ स्पर्शगुण वायुपापासूनि जाण । प्राणपंचक जालें निर्माण । व्यान समान उदान प्राण अपान । हें प्राणपंचक रजोगुणी ॥ ८४ ॥ रूपगुण तेजास्तव पूर्ण । ज्ञानेंद्रियपंचक परिछिन्न । श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । रजोजन्य क्रियाशक्तिसीं ॥ ८५ ॥ रसगुणी उदकापासाव जालें । कर्मेंद्रियपंचक रूपासी आलें । वाचा पाणी पाद शिश्न गुद विस्तारलें । रजोजन्य क्रियाशक्तीसीं ॥ ८६ ॥ गंधगुणीं पृथ्वीपासूनियां । विषयपंचक आलें उआया । शब्द स्पर्श रूप रस गंध यां । जानिता तमोगुण द्रव्यशक्तीसी ॥ ८७ ॥ आतां येकयेकाचे पांच अंश । परस्परें तंतुपटन्यायें

---

१ एकोप्यानें. २ स्थूल, जड. ३ आकारास.

प्रवेश । पंचविध प्रकारें जगदीश । करिता जाला स्वयें ॥ ८८ ॥ शब्द वाचा श्रोत्र व्यान अंतःकरण गगनीं । स्पर्श पाणी त्वचा समान मन पवनीं । रूप पाद चक्षु उदान बुद्धि दहनीं । समरसती जाली ॥८९॥ रस शिश्न जिव्हा प्राण चित्त जीवनीं । गंध गुद घ्राण अपान अहंकार धरणीं । एवं तत्वें परस्परें प्रवेशोनि । तंतुपटन्यायें राहिलीं ॥ ९० ॥ सर्वेश्वरइच्छाविशेषें कर्दम । तन्मात्रारसें जाला उत्तम । तो महातेजें आळोनि परम । गोळा निःशेष जाला ॥ ९१ ॥ तें चि ईश्वराचें स्थूळ देह ब्रह्मांड[1] जाण । तदंश जीवाचें स्थूळ पिंड प्रमाण । तैसें चि हिरण्यगर्भाचें सूक्ष्मात्मक परिछिन्न । लिंगदेह होतें जालें ॥ ९२ ॥ अव्याकृत माया कारणदेह ईश्वराचें । तदंश अज्ञानी कारणदेह जीवाचें । मूळमाया महा-कारणदेह दोहींचें । येक चि शुद्ध संकल्पें ॥ ९३ ॥ अवस्था उत्पत्ति स्थिति प्रळय ईश्वरदेवीं । तदंश जागृति स्वप्न सुप्ति अवस्था जीवीं । ब्रह्मा विष्णु रुद्र अभिमानी देवीं । तदंश जीवीं विश्व तैजस प्राज्ञ ॥९४॥ स्थानें सत्यलोक वैकुंठ कैळास । ईश्वरीं जाणिजे सविशेष । तदंश स्थानें हि जीवास । नेत्र कंठ हृदय ॥ ९५ ॥ भोग शिवीं सुखदुखमिश्र प्रवि-विक्त आनंद । तदंश जीवीं तैसे चि प्रसिद्ध । मात्रा अकार उकार मकार येवंविध । जीवशिवीं वर्तती ॥ ९६ ॥ ईश्वरीं गुणसाम्यत्वें वर्त्तती । ते चि सविकार जीवीं होती । रज सत्व तम ये प्रवृति— । नामें जयांचीं ॥ ९७ ॥ ब्रह्मांडीं शक्तित्रयांची उपपत्ति । क्रियाशक्ति ज्ञानशक्ति द्रव्य-शक्ति । अंशात्मकें पिंडीं हि त्या चि वर्त्तती । चतुर्विंशति कोशेसीं ॥ ९८ ॥ आतां चौथें देह जीवेश्वराचें । महाकारण मूळमाया साचें । अवस्था तुर्या सर्वसाक्षिणि दोहींचे । अभिमानी प्रत्यगात्मा सर्वेश्वर ॥ ९९ ॥ स्थानें मूर्ध्नि आणि नीळारंभ । दोहींचे भोग आनंदावभास स्वयंभ । अर्द्धमात्रा ॐकार स्वयंभ । मात्रा जयांच्या ॥ १०० ॥ ईश्वरीं शुद्धसत्वगुण । जीवीं हि तो चि वर्ते आपण । कार्यकारणयोगें संपूर्ण । येक चि दोहींकडे ॥ १ ॥ इछाशक्ति दोहीं स्थानीं । येक चि वर्ते

१ विराट देह. २ आकाश ?

द्विधा होऊनि । ऐसे सोळा कोश उभयतां मिळोनि । शुद्धसंकल्पात्मक ॥ २ ॥ माया अविद्यात्मक देहत्रय सा[1] । येक येक अष्टकोशात्मक सहसा । येकुन कोश अठेताळीस विश्वासा । विवरोनि पाहिजे ॥ ३ ॥ अठेताळीस आणि सोळा[2] । चौसष्टि कोशात्मक पिंडब्रह्मांडमेळा । यांमाजीं जीवेश्वर देहभावें सोहळा । घेती संकल्पविकल्पवशें ॥ ४ ॥ ऐसिया पिंडब्रह्मांडग्रंथी[3]। माजीं चंचळें वर्त्ते स्वकर्मपंथीं । स्थूळ देहाच्या घेऊनि बुंथी । कार्यकारणयोगें ॥ ५ ॥ जैसीं येके ब्रह्मांडीं अनेक पिंडें । होतीं चतुर्विध खाणींचीं बंडें । तैसी चि प्रकृतिमाजीं अनेक ब्रह्मांडें । सृष्टिक्रमें चि रचती ॥ ६ ॥ एवं सर्वेश्वरें मूळप्रकृतीच्या योगें । पिंड ब्रह्मांड रचिलें प्रकारें अनेगें । तें यथान्वयें सृष्टिक्रमसंयोगें । सांगिजेल पुढीलिये कीर्णीं ॥ ७ ॥ दिनकर रामीं रामदासीं शरण । स्वानुभवदिनकरीं होऊनि मग्न । ब्रह्मांडाची रचना यथान्वयें श्रवण । केलें पाहिजे ॥ १०८ ॥ स्वस्ति स्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये त्रयोदश कळापे प्रकृतिपुरुषयोगविवरण नाम तृतीय कीर्ण प्रकाशः ॥ ३ ॥ श्रीराम जयराम जयजयराम ॥

---

॥ श्रीराम ॥

ऐकोनि प्रकृतिपुरुषाचें विवरण । शिष्य सर्वांगें सुखसंपन्न । स्वानुभवदिनकरीं संतोषोन । निजानंदें डुल्लत ॥ १ ॥ ह्मणे धन्य धन्य जी सर्वोत्तमा । अकळ नकळे तुमचा महिमा । अनंत ब्रह्मांडाची गरिमा । इयेचे करणार तुम्ही ॥ २॥ लीळा न कळे ब्रह्मादिकां । तुमचे वर्णनीं वेद मुका । विष्णु शंकर करूनि आराधुंका । तुमचे स्वरूपीं निमग्न ॥ ३ ॥ तुमचेनि परब्रह्मानुभव । तुमचेनि प्रकृतिपुरुष स्वयमेव । नाना कळा लीळा लाघव । तुमचेनि जी आज्ञा ॥ ४ ॥ तुमचेनि चराचराचा प्रभव[9] ।

---

१ विराट, हिरण्यगर्भ व अव्याकृत हे ब्रह्मांडाचे व स्थूल, सूक्ष्म व कारण हे पिंडाचे; एकूण सहा. २ जीवेश्वराच्या चौथ्या देहाचे सोळा कोश. ३ चिज्जडाचें ऐक्य. ४ मायोपाधी ईश्वर, जीवेश्वर. ५ घुंगट. ६ महत्व. ७ तृप्ति, आवड किंवा प्रतिबंध. ८ कुशलता. ९ उत्पत्ति.

तुमचेनि सकळ विद्या वैभव । पिंडब्रह्मांडात्मक प्रस्ताव । तुमचेनि जी- सद्गुरु ॥ ५ ॥ तुमचेनि जीवेश्वरऐक्य । तुमचेनि ईश्वरब्रह्मैक्य । आणि प्रकृतिपुरुषाचें पार्थक्य । अभिन्नतेसीं केवळ ॥ ६ ॥ पिंडब्रह्मांडाचा लयोद्भव । तुह्मी चि जी करणार स्वयमेव । सेवटीं अकर्तेपणाचें हि महत्व । शोभे तुह्मास चि जी ॥ ७ ॥ आह्मां देहवंतां प्राणियां । ब्रह्म- पदप्राप्ति हे तुमची दया । आणि आह्मी नेणोनि जाणोनियां । जें पुसिलें तुह्मासी ॥ ८ ॥ तें तुह्मीं सकळ फाडोवाडीं । सांगितलें चि स्वसुखसुरवाडीं । नाना संदेहाचिया अंडी । निरशिलिया समर्था ॥ ९ ॥ परंतु येक असे जी संदेह । जो हा दिसतसे ब्रह्मकटाहे । याचे रचनेचा यथान्वय समूहें । मज सांगितला पाहिजे ॥ १० ॥ इतुकी ऐकतां शिष्यविज्ञापना । कृपा उचंबळोनि गुरुराणा । सांगता जाला ब्रह्मांडरचना । श्रवण केली पाहिजे ॥ ११ ॥ बा रे तुवां ये ब्रह्मांडरचनेसी । विचारिलें तें चि आतां परियसीं । आमुचें हि तत्व मानसीं । ऐसें चि होतें ॥ १२ ॥ विशेष तुवां केला याचा प्रश्न । येणें आह्मांसी सुख असे गहन । तरि आद्यंत आतां हें चि कथन । सवि- स्तर सांगिजेल ॥ १३ ॥ मुळीं सर्वेश्वरइच्छेस्तव । अनुक्रमें जाला त्रिगु- णप्रभव । तें चि ब्रह्माहरिहररूप स्वयमेव । सशक्तीसीं प्रगटले ॥ १४ ॥ ज्ञानशक्तीसीं सत्वगुण । मूर्तिमंत साळंकृत लक्ष्मीनारायण । तैसा चि द्रव्यशक्तीसीं तमोगुण । शंकरपार्वती प्रगटली ॥ १५ ॥ तिजा रजोगुण क्रियाशक्तीसीं । प्रगटला ब्रह्मा सावित्रीसीं । पुढें आपुलिया स्थळासी । निर्मिते जाले यथाक्रमें ॥ १६ ॥ यापूर्वीं सर्वेश्वरइच्छावशें । पंचभूतें निर्माण यथावकाशें । आकाश वायु तेज आप पृथ्वी क्रमवि- शेषें । गुणाधिक्यें होतीं जालीं ॥ १७ ॥ प्रथम आकाशीं येक चि शब्दगुण । शब्दस्पर्श द्विगुणेसीं पवन । शब्दस्पर्शरूपें विलसे दहन । चतुर्गुणीं तें उदक ॥ १८ ॥ शब्दस्पर्शरूपरसेसीं उदक । पंचगुणीं

---

१ प्रसंग अथवा गोष्ट. २ स्पष्ट अथवा मोकळेपणानें. ३ स्वसुखाच्या स्वाधीन होऊन. ४ दुर्घटपणा किंवा आढी=ढीग. ५ ब्रह्मांड. ६ समो=समय..

पृथ्वी विळसे सम्यक । शब्द स्पर्श रूप रस गंध हें पंचक । पृथ्वीचे ठाईं संपूर्ण ॥ १९ ॥ ऐसी पंचगुणी सबळ जाणोनि पृथ्वी । सर्वेश्वरें विश्वात्मक रचना बरवी । इजवरी आद्यंत केली आघवी । अकर्तेंपणें कर्तृत्व ॥२०॥ सकळ हि पृथिवीयेचें प्रमाण । लांबी रुंदी छपन कोटि योजन । इयेसभंवतें अंतर्बाह्य जीवन । दशशत गुणेंसीं[1] ॥२१॥ तया उदकाखालें तेजावरण । तें हि उदकापरिस दशगुण । तेजापरिस दशगुणित पवन । त्याहूनि दशगुण शब्दाकाश ॥ २२ ॥ त्यापरिस दशगुणी महत्तत्व । मूळमायासर्वेश्वरऐक्यत्व । तया अंतर्बाह्य परम तत्व । जें निर्गुण निर्विकार ॥२३॥ असो तळियामाजीं[2] जैसें कवीठ । तैसें उदकावरी पृथ्वीपीठ । तें बुडेल ह्मणौनि सर्वेश्वर कमठें[3] । होऊनि उदकीं राहिला ॥ २४ ॥ त्या कांसवाचे पृष्ठीवरी । शेष बैसोनि पृथ्वीसी मस्तकीं धरी । पृथ्वी डळमळील ह्मणौनि तिजवरी । दिग्गजें[4] ठेविले दडपण ॥ २५ ॥ सभंवते अष्टकुळाचळें[5] । अष्टदिशीं ठेविले विशाळ । त्यावरी अनुक्रमें राहिले दिक्पाळें[6] । आपुलालिया पराक्रमें ॥ २६ ॥ पृथ्वीमध्यस्थानीं मेरूपर्वत । अति उंच विशाळ अद्भुत । त्याची गणना न करवे इथंभूत । हा इतुका आहे ह्मणौनि ॥ २७ ॥ असो तया मेरूसी अनंत शृंगें । त्या सकळांत तीन विलसती समांगें । वरकड हि यथानुक्रमें अनेगे । समविषमत्वें शोभती ॥ २८ ॥ त्याची गणना सांगतां सविस्तरीं । ग्रंथ जाईल अति विस्तारीं । ह्मणौनि तें असो मध्य शृंगावरी । विष्णु बसे परिवारेसीं ॥ २९ ॥ त्याचें नाम ठेविलें वैकुंठ । रचना अति सुंदर मध्यपीठ । हिरयासारिखें अति तेजिष्ठ । सुवर्णमय लखलखित ॥ ३० ॥ जेथें जय विजय दोघे द्वारपाळ । जेथें समसुखें स्वानंदसुकाळ । जेथ कदापि

---

१ पटीनें. २ तळ्यांतील पाण्यामध्यें. ३ कच्छपरूप. ४ ऐरावतः पुंडरीको वामनः कुमुदोऽजनः । पुष्पदंतः सार्वभौमः सुप्रतीकश्च दिग्गजाः ॥ ५ निल, निषध, विंध्याचल, माल्यवान्, मलय, गंधमादन, हेमकूट व हिमालय असे मेरूच्या भोंवतीं आठ पर्वत आहेत ते. ६ इंद्र, अग्नि, यम, निऋृति, वरुण, वायु, कुबेर व ईशान, असे अष्टदिशांचे आठ अधिकारी.

नसे काळवेळ। स्वधर्मकर्म मूर्तिमंत ॥ ३१ ॥ जेथें प्रताप किर्ति औदार्य। मूर्तिमंत विलसे ऐश्वर्य गांभिर्य । शांति क्षमा दया धैर्य । भुक्ति मुक्ति मूर्तिमंत ॥ ३२॥ ज्याचे अर्द्धांगीं लक्ष्मी विलसे। तेथ भाग्यासि काय उणीव असे । जन्म जरा मृत्यु आपदा नसे । निपटूनियां[1] जेथ ॥३३॥ तेथ सुंदर साळंकृत विष्णुमूर्ति । चतुर्भुज मेघश्याम गळां वैजयंति । वामांगीं लक्ष्मी पुढें बृहत्साम गातीं । नारद तुंबर गण ॥ ३४ ॥ पुढें हात जोडूनि गरुड उभा । सिद्धि रिद्धि जेथें स्वयंभा। चतुर्विध मुक्ति वोळे[2]-गती सुलभा। भक्तांचिया मनोगतें ॥ ३५ ॥ तैसें चि त्यासे[3]जीं स्फटिक शृंग । कैळास नाम त्याचें जें अति अभंग । रचना ज्याची। मनोहर सुरंग । देदिप्यमान विलसे ॥ ३६ ॥ ते कैळासीं स्वसुखें शंकरपार्वती । निजगणेसहित विलसती । पुत्रपरिवार भूतगणसंपति । स्वानंदेसीं निवास ॥३७॥ त्याचे उत्तर भागीं मर्गजें शृंग । अत्यंत रचना ज्याची अव्यंग । सत्यलोक नाम त्याचें जें सुरंग । मनोहर नेटकें ॥३८॥ जेथें सत्य वसे मूर्तिमंत । दया धर्म आंगें चि असती जेथ । ब्रह्मा सावित्रीसहित तेथ । राज्य करी निजांगें ॥ ३९ ॥ तैसें चि पूर्वभागीच्या शृंगावरी । सुरवरेसीं इंद्र राज्य करी । त्याचें नाम बोलिजे अमरपुरी । जरा मृत्यु जेथें नसे ॥ ४० ॥ जेथ कल्पतरूचीं उद्यानें । जेथें चतुर्दंताऐसीं अपार वहनें । सकळांसी तृप्ति अमृतपानें । दिव्यांगना भोगार्थ ॥ ४१ ॥ जेथें कामधेनूंचीं खिल्लारें । चिंतामणींचीं अनेक अग्रारें[5]। पार्यातकादि[6] नाना तरु अपारे । वनें उपवने पुष्पलता ॥४२ ॥ दिव्य भोग दिव्य उपहार । सुमनचंदनादि नाना उपचार । जयांसी खुपों शकती चंद्रकर । ऐसे सकुमार सर्वांगें ॥ ४३ ॥ जेथें बृहस्पतिसारिखा प्रधान । सेनापति जेथें मरुद्गण । तेहतीस कोटी सुर मिळोन । पंक्तिकार जेथें ॥ ४४ ॥ जेथें शचीसारिखी पट्टराणी । परम पतिव्रताशिरोमणी । जयंतासारिखा सर्वगुणी । पुत्र विलसे ॥ ४५ ॥

---

१ निःशेषपणे. २ सेवा करितात. ३ जवळ. ४ पांचेसारख्या मौल्यवान पाषाणाचा. ५ अग्रहार=ब्राह्मणांना दिलेल्या देणग्या वगैरे. ६ पारिजातकादि.

असो यानंतर अग्निदिशेसी । श्रृंग अत्यंत रमणीय सुवेशीं । तेथें वास्तव्य आपुलिया निजगणेसीं । निजतेजें दीप्तिमंत ॥ ४६ ॥ चतुशृंग द्विमुख मेषवहन । सप्तभुजा आणि तीन चरण । स्वाहा स्त्रियेसी विराजमान । निजनाम अग्नि बोलिजे ॥ ४७ ॥ तैसें चि दक्षिण दिशेचिया श्रृंगावरी । यमधर्म राजा राज्य करी । ज्याचा दंड त्रिभुवनावरी । पुण्यपापात्मक शासन ॥ ४८ ॥ मृत्युलोकीं जें आचरण जो आचरे । त्याचें श्रवण होय सर्व दूतद्वारें । त्यासी देऊनियां कर्मशरीरें । नाना दंडें दंडिजे ॥ ४९ ॥ नैरुत्यकोनीं जें शृंग असे । तेथें यमाचिया आज्ञा निरुति वसे । यमयातनेची सकळ सामुग्री असे । जे सांगितली द्वितीय कळापीं ॥ ५० ॥ जितुकी कांहीं निरययातना । तेथील बोलिजे निरुति राणा । तो यमाचिये आज्ञेनें स्वर्गमृत्युयातना । नाना जीवां करितसे ॥ ५१ ॥ असो पश्चिम दिशेचिया शृंगावरी । वरुण राजा राज्य करी । त्रैलोकी-चया मेघउदकावरी । शासन चाले तयाचें ॥ ५२ ॥ वा[२]व्य कोनीं जें शृंग असे । तेथें वायु राज्य करितसे । पिंडब्रह्मांडीं वायुवे[३]शें । चाळणा करी जीवांची ॥ ५३ ॥ उत्तर दिशेसीं शृंग अति सुखद । तेथें राजा असे त्रैलोक्यधनद । कुबेर नाम त्याचें विविध । भोगविळासीं आसक्त ॥ ५४ ॥ असो वैकुंठापासूनि ईशान्य कोनीं । कैळास शोभे स्फटिक-वर्णी । शंकर पार्वती नंदीवहनी । निजपरिवारीं निवास ॥ ५५ ॥ यांवेगळीं मरुपाठारीं अनंत । ठाईं ठाईं शृंगें विलसत । तेथें स्थळें करूनि सुखोल्लसित । सकळ देव राहाती ॥ ५६ ॥ जितुकीं नामें तितुके देव । त्यांचे पृथुकाकारें असती ठाव । आपुलालिया सेनासमु-दाव । भाग्य संपत्ति राहिले ॥ ५७ ॥ ऐसा सुवर्णपर्वत अति मनोहर । विशाळ साजिरा उंची थोर । ज्याच्या गुहा आणि शिखरें अपार । म्हणौनि सहस्रशीर्षा बोलिजे ॥ ५८ ॥ मेरु शिखरिणामहं हें भगव-

---

१ अग्नेयी. २ वायव्य. ३ प्राणवायुमुळें. ४ भाग्यरूप संपत्तिसह असा अर्थ किंवा स्वर्गसुख उपभोगण्याची मुदत संपेपर्यंत असा अर्थ कित्येक करितात. ५ गीता अध्याय १०-२३.

वृचन । गीतेमाजीं बोलिला श्रीकृष्ण । जयावरी ठाईं ठाईं राहिले सुरगण । आपुलालिया विलासें ॥ ५९ ॥ ज्यावरी पूर्वदिशेसी असे आम्रवृक्ष । गणना विशाळ जो अपरोक्ष । ज्याचिया रसाचें अमृत हे साक्ष । पंचम स्कंध भागवतीं ॥ ६० ॥ तैसा चि जांबुळ वृक्ष असे दक्षिणेसी । ज्याचे शाखांशें जांबुनद सोनें लंकेसी । मधु वृक्ष असे जो पश्चम दिशेसी । पृथ्वीमाजीं मद्य त्याचें ॥ ६१ ॥ उत्तर दिशेसी वटवृक्ष विलसे । त्याची गणना शास्त्रांतरीं असे । ज्याचे डांहाळीस अडखळत असे । सूर्याचा रथ प्रत्यक्ष ॥ ६२ ॥ ऐसा अति उंच मेरुपर्वत । त्याचिया मस्तकीं ध्रुव विलासत । जया सभंवतीं प्रदक्षिणा नित्य कारित । ग्रहगण नक्षत्रें तारांगणें ॥ ६३ ॥ सप्तऋषि आणि सूर्यादि नवग्रह । सत्तावीस नक्षत्रें नवलक्ष तारा-समूह । हे सकळ ध्रुवा आणि मेरूसी निसंदेह । प्रदक्षिणा नित्य करिती ॥ ६४ ॥ असो मेरूपासीं मंदरपर्वत । तो हि उंच असे असंख्यात । तैसा चि हिमाचळ हि विलसत । अति उंचपणेसीं ॥६५॥ तैसे चि लोकालोक पर्वत । सभंवतीं पर्वतगणीं वेष्टित । आणिक हि पृथ्वीवरी असती अनंत । लाहान थोर मिळोनि ॥ ६६ ॥ नवखंडें आणि सप्तद्वीपें । सात हि समुद्र सांगिजती संक्षेपें । क्षारोदक मद्य दधि मधु तुपें । युक्षरसद क्षीरसमुद्र ॥ ६७ ॥ तो क्षीरसमुद्र अति विशाळ । पांसष्टि लक्ष गांवें खोल तुंबळ । ज्याचे तीरीं साक्षात घननीळ । शेषशाई परमात्मा ॥ ६८ ॥ तैसे चि साही असती अनुक्रमें । गणना शास्त्रांतरीं असे नियमें । त्यांमाजीं बेटें असती सुगमें दुर्गमें । त्यावरी नाना जिनस पिकती ॥ ६९ ॥ असो जंबु प्लक्ष शाल्मली कुशद्वीप । शुक[3] क्रौंच आणि पुष्करद्वीप । त्या

---

१ मेरुपर्वताला आधारस्तंभ असे मंदार, मेरुमंदार, सुपार्श्व व कुमुद असे चार पर्वत चारी दिशांस आहेत. या चार पर्वतांवर अनुक्रमें आंबा, जांभुळ, कदंब आणि वड असे चार प्रचंड वृक्ष आहेत. त्यांचें वर्णन श्रीमद्भागवत पंचम स्कंध अध्याय १६ यांत पहा. २ श्रीमद्भागवत पंचम स्कंध अध्याय २० च्या शेवटीं याचें वर्णन आहे. ३ शाकद्वीप.

सकळांत श्रेष्ठ जंबुद्वीप । ज्यामाजीं आपण वसतसों ॥ ७० ॥ त्या जंबुद्वीपामाजीं नवखंडें । थोरथोरें विशाळें प्रचंडें । इंद्र कांस ताम्र गंधर्व गभस्ति खंडें । सौम्य चार्वाण भरतादि ॥ ७१ ॥ यांची गणना सीमा शास्त्रांतरीं । सांगितलीसे साकल्य सविस्तरीं । येथें सांगतां ग्रंथ जाईल विस्तारीं । ह्मणौनि तें आतां असो ॥ ७२ ॥ सकळां खंडीं श्रेष्ठ भरतखंड । हिमाचळापासूनि रामेश्वरपर्यंत प्रचंड । याची रचना सांगतां वितंडें । शेषें नेणिजे स्वमुखें ॥ ७३ ॥ यामाजीं दक्षिणमानस उत्तरमानस । तीर्थें सांगतां असमसाहास । नाना क्षेत्रें नाना प्रतिमा बहुवस । अष्टम कळापीं निरोपिलें ॥ ७४ ॥ नाना राजे नाना भूपति । चहूं युगादि सेना चक्रवर्ती । गणना सांगतां पुरवती । व्यासवाल्मिकादिक ॥ ७५ ॥ असो पूर्वीं विष्णु मूर्तिमंत सत्वगुणेसीं । त्यापासूनि जन्म रजोगुण ब्रह्मयासी । त्या ब्रह्मयापासूनि सकळ चराचर-रासी । प्रभव जाला यथाक्रमें ॥ ७६ ॥ ब्रह्मयासी मानसपुत्र जाले आठ । अति नामांनिगे सामर्थ्यें वरिष्ठ । भृगु मरीचि अत्रि अंगिरा वशिष्ठ । पुलस्ती पुलह आणि क्रतु ॥ ७७ ॥ असो भृगुपासूनि वंशज अपार । जे वंशीं जगदीशें फरशराम अवतार । घेऊनि दुष्ट दैत्य समग्र । निर्दाळिले प्रतापें ॥ ७८ ॥ भृगूची पतिव्रता पुलोमा राणी । च्यवन ऋषेश्वर जाला तीपासूनि । वछ कवी शुक्र जमदग्नि । वंशोपवंशीं विख्यात ॥ ७९ ॥ त्या भृगुऋषीचें निवासक्षेत्र । भृंगार नामें अति पवित्र । जेथील रचना आदि विचित्र । पुराणप्रसिद्ध जें असे ॥ ८० ॥ तेथें भृगुऋषीनें केलें पुरश्चरण । त्याचें पुण्य त्रिजगतीं विस्तारलें गहन । तया पुण्यप्रभवें वंश सकळ पावन । अद्यापि चालत असे ॥ ८१ ॥ वाजसनेइ शाखाध्ययन । वछगोत्रीं विराजमान । गणक ज्योतिर्विद विद्वज्जनें । महा पुण्यप्रतापी ॥ ८२ ॥ ते चि वंशीं उपनाम पाठक । जनार्दननामें पुण्यश्लोक । जो पुरश्चरणी सूर्यउपासक । प्रतिज्ञा सूर्य

---

१ विशाळ. २ असंख्यात. ३ उत्पत्ति. ४ नामांकित.

केला उभा ॥ ८३ ॥ वाराणसी यात्रेचिया विलासें । ब्राह्मणसंतर्पण करितां हव्यासें । तेणें ऋण जालें अति विशेषें । [1]तेहीं मार्गों आदरिलें ॥ ८४ ॥ केला तिहीं बहुत चि निग्रह । आण शपथ दुराग्रह । तें सूर्यासी जालें दुःसह । तो खोळंबला प्रहर येक ॥ ८५ ॥ तेणें चकित जाले सकळ लोक । तत्काळ ऋण जालें फारीक । क्षणमात्रें जेथील तेथें सम्यक । सूर्यगमन पश्चिमे ॥ ८६ ॥ असो ते चि वंशीं कोणेरि पाठक । ज्यांच्या दर्शनमात्रें होइजे पुण्यश्लोक । जन्मांतर ब्रह्मसमंधादि अनेक । कित्तेकांचे नाशले ॥ ८७ ॥ कित्ते-कांसी जाले चमत्कार । ब्रह्मराक्षस राहों न शकती समोर । ज्याचे घरीं दरवडा घेतां चोर । निर्बंधनेसीं बांधले ॥ ८८ ॥ ते जेव्हां आले अनन्य शरण । तेव्हां स्वेछा चि दिधले सोडून । राजा आदिकरूनि सकळ हि जन । भयभीत जयासी ॥ ८९ ॥ त्याचे उदरीं नृहरि पाठक । सुब्राह्मण गणेशउपासक । स्नान संध्या शुचिर्भूत सम्यक । वेदशास्त्रसंपन्न ॥ ९० ॥ द्वारिका नाम निज भार्या । जे सकळ पति-व्रतांमाजीं [3]आर्या । पतिसेवापरायणी निजधैर्या । धरूनि स्वधर्मतत्पर ॥ ९१ ॥ तयेचे उदरीं जाला दिनकर । जो कां रामदासांचा नित्य किंकर । रामींरामदासकृपा स्वानुभवदिनकर । कळाप कीर्णीं प्रकाशला ॥९२॥ तो स्वानुभवदिनकर संपूर्ण । दिनकरें रामचंद्र निजात्मजेसी आपण । रामचंद्रीं करूनियां समर्पण । निजऐक्यता सहजस्थिति ॥ ९३ ॥ असो भृगुवंश सहज सांगतां । अकस्मात आडभरीं भरलों स्वभावता । तें श्रोतीं क्षमा करूनि तत्वता । स्वानुभवदिनकर ऐकिजे ॥ ९४ ॥ इतुकें दिनकरें वचन बोलिलें । तें आइकोनि संत परम तोषले । ह्मणती भला गा सहजस्थिति सांगितलें । निजवंशपरंपरेसी ॥ ९५ ॥ असो यावरी दुजा ब्रह्मपुत्र मरीचि । वंशपरंपरा सांगिजेल तयाची । श्रोतीं [4]वाणी न कीजे अवधानाची । यथाक्रमें आयकावें ॥ ९६ ॥ मरीचीचा

---

१ ऋणाइतांनीं. २ फडशा झाला. ३ श्रेष्ठ. ४ तोटा.

मानसपुत्र कश्यप ऋषि । त्यासी दक्षकन्या ज्या त्रयोदशी । त्या स्त्रिया केल्या कश्यपासी । पुढें वंशोपवंश विस्तारला ॥ ९७ ॥ त्यांत वडिल स्त्री असे अदिती । तीपासाव बारापुत्र होती । त्यांमाजीं मुख्य राजा जो अमरपति । तो इंद्र स्वर्गीं विलसे ॥ ९८ ॥ दुजा बोलिजे तो वामन । पंचमावतार जो गहन । धाता मित्र त्वष्टा यम वरुण । विवस्वत पुषा अर्यमा ॥९९॥ तथा सूर्य आणि सविता । एवं बारा पुत्र अदितीचे तत्वता । हिरण्याक्ष हिरण्यकश्यप हे उभयता । आणि मरुद्गण दितीचे ॥१००॥ दनुपासूनि सकळ जाले दानव । मनुपासूनि बोलिजती मानव । सुरमेपासूनि गण गंधर्व । विनतेचे गरुडारुण ॥ १ ॥ कद्रुपासूनि सकळ हि नागकुळ । इळेपासूनि पर्वत सकळ । सुरभीपासूनि अवघें गोकुळ । कामधेनूसहित ॥ २ ॥ क्रोधवहेपासूनि अष्टभैरव । सिंहिकेपासूनि राहुसहित दैत्य सर्व । मुनीपासूनि मुनेश्वर अपूर्व । नारदतुंबरादिक ॥ ३ ॥ कालिंदीपासाव जाली उत्पत्ति । अठराभार इया वनस्पति । कपिलेपासाव निर्माण होती । कपिलादिक सिद्ध ॥ ४ ॥ येका कश्यपापासूनि सकळ सृष्टि । बोलिजे या प्रकारें परिपाटीं । आतां अत्रिअनुसयेपासूनि पुत्रेष्टि । चंद्र दुर्वासा दत्तात्रय ॥ ५ ॥ अंगिरापासाव जाला बृहस्पति । पुढें पुत्रपौत्रादि वंशसंभूति । पुलस्तीपासूनि राक्षस होती । रावणकुंभकर्णादिक ॥ ६ ॥ पुलहापासूनि नाना संतति । सिंहशार्दूलादि चतुष्पाद याति । क्रतुपासूनि दक्षप्रजापति । त्यासी सेंभर कन्या मनोकल्पित ॥७॥ त्यांत तेरा दिधल्या कश्यपासी । सत्तावीस तया चंद्रासी । येकुनवंनास[1] दिधल्या मरुद्गणासी । दाहा यमधर्मासी दिधल्या ॥ ८ ॥ येक दिधली सदाशिवासी । येकुन गणना सेंभरासी । यांपासूनि सकळ सृष्टीसी । उत्पन्न होणें सविस्तर ॥ ९ ॥ आठवा ब्रह्मपुत्र जो कां वशिष्ठ । सूर्यवंशीं कुळगुरु जो वरिष्ठ । त्यापासूनि शक्ति पराशर व्यास शुकवंश श्रेष्ठ । अति विख्यात भूतळीं ॥११०॥ याहिवेगळे ब्रह्मकुमर । असंख्य असती अपार । भूमंडळीं ज्यांचा विस्तार । अनेकां प्रकारें दाटला

1 एकुणपन्नास.

॥ ११ ॥ असो सूर्यवंशीं रामचंद्रावतार । सोमवंशीं श्रीकृष्ण साचार । आणिक हि भक्तोद्देशें नाना अवतार । जगदीशें घेतले भूतळीं ॥१२॥ यानंतर नाना प्रकारें रचना । पृथ्वीवरी अपार संख्या करवेना । तितुकीं तीर्थें क्षेत्रें प्रतिमा नाना । पुरें पट्टणें ग्राम खेटकें[1] ॥ १३ ॥ च्यारी खाणी चौऱ्यासी लक्ष जीवयोनी । असंख्य जीव दाटले अवनीं[2] । चराचर पिंड ब्रह्मांड व्यापूनि । येका सर्वेश्वरें राहिजे ॥ १४ ॥ सप्त पाताळें[3] आणि सप्त लोकें[4] । येकूण चौदा भुवनें सम्यक । सर्वांचा चाळक पाळक पोषक । येक सर्वेश्वर[5] विलसे ॥ १५ ॥ वैकुंठीं वसे विष्णुमूर्ति । कैळासीं वसे शंकरपार्वती । सत्यलोकीं ब्रह्मा सावित्री असती । अमरावतीस इंद्र राजा ॥ १६ ॥ आणिक अष्ट दिशांचे दिक्पाळ । पूर्वीं च अनुक्रमें सांगितले सकळ । मृत्युलोकीं नाना चक्रवर्त्ती भूपाळ । पाताळीं शेष राज्य करी ॥ १७ ॥ असो येथें जो ज्या देवाचें भजन करी । अंतीं प्राप्त त्यासी त्या देवाची पुरी । सलोकता समीपता स्वरूपता तीं प्रकारीं । भजनवशें प्राप्त होये ॥१८॥ लोकीं राहाणें त्या नांव सलोकता । समीप असणें त्या नांव समीपता । स्वरूपप्राप्ति जालियां स्वरूपता । या त्रिविध मुक्ति बोलिजे ॥ १९ ॥ चौथी जे कां सगुणसायुज्यता । तिये चि विष्णु आणि शंकर अधिकारी तत्वता । आणि जे बोलिजे निर्गुणसायुज्यता । तयेचा अधिकारी येक सद्गुरु ॥ १२० ॥ निर्गुणसायुज्यताअधिकारी पूर्ण । येक सद्गुरुस्वामी च निश्चयेंकरून । विना सद्गुरु सायुज्यसदन । आणिक कोण देऊं शके ॥२१॥ जालीयां सकळ लोकां निर्वाण[6] । जें स्वसंवेद्यत्वें राहे स्वरूप निर्गुण । त्या नांव बोलिजे सायुज्यसदन । निजमोक्ष कैवल्यपद ॥ २२ ॥ इतुकी ऐकोनि पिंडब्रह्मांडरचना । अंतरीं सुखावला शिष्यराणा । विनित[7] भावें लागोनि गुरुचरणा । ह्मणे धन्य जालों मी आजि ॥ २३ ॥

---

१ खेडीं. २ पृथ्वीवर. ३ अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल. ४ भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्यलोक. ५ दास. ४-१०-२३,२४. ६ अंत. ७ नम्र.

जी हे सकळ चराचरसंभूति[1] । कळों सरली मज निश्चितीं । तरि इतुकें जगड्डीवाळ[2] मध्यें असतां स्वरूपप्राप्ति । कैसी होय पैं जीवासी ॥ २४ ॥ तरि हें सकळ शाश्वत कीं अशाश्वत । हें मज सांगिजो जी इथंभूत । तवं श्रीगुरु ह्मणती हें अशाश्वत । क्षणभंगुर तरंगत्वें ॥ २५ ॥ जे हे पिंडब्रह्मांडाची रचना । सांगितली तुज प्रकारें नाना । हे समयवशें प्रळयावसांना[3] । सर्व हि जाईल पैं ॥ २६ ॥ तें चि साकल्य पुढीलिये कीर्णीं । स्वानुभवदिनकरीं तूं आकर्णीं । दिनकर रामदासीं लोटांगणीं । सप्रेमभावें दंडवत ॥ १२७ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये त्रयोदश कळापे पिंड ब्रह्मांड चतुर्दशभुवनरचना चत्वारमुक्तिकथन निरूपणं नाम चतुर्थ कीर्ण प्रकाशः ॥ ४ ॥

---

॥ श्रीराम ॥

पूर्व कीर्णीं ऐकोनि पिंडब्रह्मांड । शिष्य सुखावोनि स्वानंद प्रचंड । ह्मणे स्वामी हें येवढें वितंडें[5] । स्वरूपीं सामावेल केवि ॥ १ ॥ ऐकोनि शिष्याची विज्ञप्ति । हांसोनियां श्रीगुरु निश्चितीं । ह्मणे रे बा पातयासी[6] न लगतां पाती । हें सर्व हि नाशे तत्काळ ॥ २ ॥ सागरीं तरंग जाले आणि गेले । केव्हां किती हें कोण्हासी न कळलें । कां ते मृगजळाचे पूर उठावले । त्यांसी नाशावया काय उसीर ॥ ३ ॥ कां ते गगनीं उठिलीं अभ्रपटळें । त्यांसी असणें कित्तेक वेळे । कां तें इंद्रधनुष्य हिरवें पिंवळें । आणि आरक्त[7] कितुलें पैं ॥ ४ ॥ तेवि हे जे सकळ रचना सांगितली । हे नाशे क्षण न लगतां वहिली । याची सांगिजेल प्रळयबोली । यथान्वयें सकळ हि ॥ ५ ॥ पिंडीं दोनि प्रळय बोलिले । तैसे चि ब्रह्मांडीं तितुके विहिले । आणि विवेकप्रळयासी[8] पाहिंजे विचारिलें । श्रीगुरुमुखें विचारूनि ॥ ६ ॥ पिंडीं येक[4] दिनांतप्रळय । दुजा जाणि-

---

१ उत्पत्ति. २ जगडव्याळ. ३ प्रळयांतीं. ४ ऐक. ५ विशाळ. ६ नेत्रपात्यासी. ७ तांबडें. ८ पांचवा प्रळय.

जे देहांतप्रळय। तैसा चि ब्रह्मांडीं ब्रह्मदिनांत येक प्रळय। दुजा ब्रह्मदेहांत ॥ ७॥ पांचवा जो विवेकप्रळय बोलिजे। त्यासी श्रीगुरुमुखें विचारिजे। देहचतुष्टयनिरासें वारिजे। सकळ संदेह विवेकें ॥ ८॥ असो आतां पिंडीचा नित्यप्रळय। त्याचा सांगिजेल यथान्वय[1]। च्यारि प्रहर दिवसा जागृति होय। त्यानंतर सुषुप्ति प्रगटे ॥ ९॥ सुषुप्ति प्रगटिलियां देह चेष्टित[2]। शरीर केवळ पडे निचेष्टित। पुन्हां चौं पाहारां[3] होय जागृत। यासी नित्यप्रळय बोलिजे ॥ १०॥ पूर्वी उत्पत्तिस्थितीसी जाली प्रवृत्ति। आतां प्रळयतुर्येसीं सांगिजेल निवृत्ति। तरि मनोमूळें अढळ वृत्ति। करूनि आइका ॥ ११॥ प्रळय-शब्दें प्रत्यक्ष नाश। जयासी पुन्हां नाहीं दर्शन प्रतिकाश[4]। सुषुप्तीसी हि बोलिजे तदंश[5]। परि ते अनारिसी ॥ १२॥ प्रळईं जालीयां महानिर्वाण। पुन्हां कैंचें तें चि शरीर प्रमाण। सुषुप्ति प्रत्यहांतीं[6] होय निर्माण। जीविताचेनि आश्रयें ॥ १३॥ तथापि जागृतिस्वप्नाचें पर्यावसान। यालागीं सुषुप्ति प्रतिदिनीं होतसे निदान। ह्मणौनि हा प्रळयांश हें बोलती मुनिजन। नित्यप्रळया शरीरीं ॥ १४॥ विषयसुख आणि निर्विषय दुख। दोहीं पदार्थीसी निद्रा विन्मुख। ते सुषुप्ति मरणांश होय सन्मुख। नित्य सावध करावया ॥ १५॥ कां जे मरणांतीं नाहीं प्रयत्न। सुषुप्ति सरलीयां आहे यत्न। जागृतिऐसें लाहोनि रत्न। निज स्वहित साधावया ॥ १६॥ असो प्रळयकाळ मुख्य ब्रह्मांडीं। तदंश मृत्यु होतसे पिंडीं। कारणीं प्रवेशे कार्यपर्वडी[8]। यथानुक्रमेसीं ॥ १७॥ शरीर या नामाचा अर्थ। जीतां[9] वाटत होता व्यर्थ। ये काळीं स्पष्टपणें यथार्थ। दाखवीतसे आंपुलें[10] ॥ १८॥ स्थूळ

---

१ संदर्प. २ चलनवलन करणारें हें शरीर. ३ प्रहरांनीं. ४ प्रतिबिंब किंवा दर्शन. ५ प्रळयांश. ६ प्रत्येक दिवसाच्या अंतीं. ७ निद्रावस्थेंत मनुष्य सुखदुःख-विकाररहित निचेष्टित पडलेला असतो; ह्मणून त्या अवस्थेला मरणांश ह्मटलें आहे. मरणांतीं यापेक्षां हि वाईट अवस्था होणार हें पाहून प्राण्यानें आपलें हित करून घ्यावें, हें निद्रावस्था सुचविते. ८ प्रकार, उपचार. ९ जिवंत असा. १० ‘स्वरूप’ शब्द पुढें अध्याहृत.

देहीचे पंचवीस अंश । ते सूक्ष्म देहामाजीं करिती प्रवेश । तया सूक्ष्म तत्वांचा ग्रास । करिती पंचमहाभूतें ॥ १९ ॥ तें यथानुक्रमें पंचमहाभूतें । त्यक्त करिती हळु हळु शरीरातें । आपुलीया आलीया अधिष्ठानातें । कवळिती क्रमें ॥ २० ॥ भूतचतुष्टय सृष्टिकाजीं[1] । मिळालें होतें पृथ्वी-माजीं । ते स्वकीय कळासमांजीं[2] । तत्काळ हारपे ॥ २१ ॥ लोपती पृथ्वीच्या सूक्ष्म कळा । परंतु प्रेतत्वें पडिलें देखिजे डोळां । त्वचा रोम अस्थि सिरा मांसाचा गोळा । पडे तिचा तिजवरी ॥ २२ ॥ तैसे चि आपुलाला आधिष्ठानीं । केवळांशें[3] जाती मिळोनि । मिश्रांशें[4] निवडती निदानीं । ते चि पृथ्वीचे आइक ॥ २३ ॥ घ्राणीं होईल गंधत्याग । आणि स्वासोस्वासाक्षरीं वियोग । गुदीं जाणवतसे मळत्याग । प्रयाणकाळीं किंचित ॥ २४ ॥ तेव्हां अहंकार सांडी बिढार[5] । विकल होईल सर्व शरीर । अंतीं प्रगटे घर्मनीर । तेव्हां भूमिनाश होतसे ॥ २५ ॥ अहंकार अपान घ्राण गुद गंध । येणें पंचांशेसीं पृथ्वीनाश होय प्रसिद्ध । तैसा चि जळांश नाशतां पंचविध । होय तो आयकिजे ॥ २६ ॥ शरीरीं चित्तवियोग होतां । स्मरण न राहे पैं तत्वता । कदाचित शुक्र तें हि स्वभावता । शिश्नद्वारें द्रवों पाहे ॥ २७ ॥ जिव्हा मोडे पडे कोरडी । मुखीं मधु घालितां हि न लागे गोडी । तेव्हां जळांश सकळ नाशती आणि वोंडी । वोसरे प्राणाची ॥२८॥ अंतकाळीं उष्मा होय जो शरीरीं । तो उदकनाश जाणावा चतुरीं । असो रस शिश्न जिव्हा चित्त प्राण नाशेंकरी । उदकनाश प्रसिद्ध ॥ २९ ॥ मग विकळ घाबिरी होतां बुद्धि । शरीरीं सर्वथा न राहे शुद्धि । कैंची स्वकीय परिकीय विधि । वोळखी चि मोडे ॥ ३० ॥ नयनीं सर्वथा न बुझे[6] रूप । विझे सुनीळतेचा[7] दीप । चंद्री[8] लागे होय विरूप । जठराग्नि हि विझे ॥ ३१ ॥ पदेंद्रिय ताठोनि धरी तान । मार्गीं लागतसे कंठीं उदान । येणें पंचांगें तेज पावे निदान । रूपभान निरशलियां

---

१ सृष्टीची उत्पत्ति होण्याचे वेळीं. २ स्वरूपांत. ३ सजातीय. ४ विजातीय. ५ राहण्याचें ठिकाण. ६ जाणता येत नाहीं. ७ प्रकाशाचा. ८ डोळे ताटकळणें.

॥ ३२ ॥ शैत्य उमटे जें सेवटीं । ते चि जाणावी तेजाची आंटी[1] । आतां वायूची प्रयाणपरिपाठी[2] । सांगिजैल संकेतें ॥ ३३ ॥ मन गमन करी धरी विकल्प । तेव्हां कैंचा शरीरसंकल्प । त्वचेसी न कळे मृदु कठिण आरोप[3] । पुष्प कीं शस्त्रादिक ॥ ३४ ॥ मुख्य समान जो कां नाभिगत । तेणेंसीं[4] संक्रमती[5] सर्व हि मारुत । पाणी[6]इंद्रिय हि नाश पावत । जो वायूचा अंश ॥ ३५ ॥ मन समान त्वचा पाणी स्पर्श । हें कळापंचक पावे विमर्श[7] । तो मरुत्पात देहशून्यत्वें आतां आर्कर्ष[8] । आइक व्योमपंचकाचा[9] ॥ ३६ ॥ ठांवं पुसेल अंतः-करणाचा । समूळ आटेल शब्द वाचा । श्रुति[11] श्रवणीं नुमटे सुहृदांचा । कोल्हाळ नाइके ॥ ३७ ॥ व्यान सर्वांगीचा आकर्षेल सकळ । प्रेत होऊनि पडेल केवळ । अंतःकरण व्यान श्रोत्र वाचा शब्दनाशीं तत्काळ । नाश होय आकाशाचा ॥ ३८ ॥ ऐसिया पंचकळासहितें । नाश पावती देहस्थ पंचभूतें । यानंतर तत्काळ होऊनियां प्रेतें । पडती शरीरें ॥ ३९ ॥ एवं स्थूळ देह आणि सूक्ष्मात्मक लिंग । देहद्वयासी बोलिला भंग । तेथ वासनात्मक तें अभंग । यांचें[12] कारण जें ॥ ४० ॥ सूक्ष्म देह नव्हतां[13] वेगळें । मरण कैसें पाविजे स्थूळें । आणि या स्थूळ देहावेगळें । सूक्ष्म जगीं उर्यावें[14] कीं ॥ ४१ ॥ विष्णुदूतीं अथवा यमदूतीं । यथाचरणें नेइजे स्वर्ग कां नर्काप्रति । दिव्य देहीं घातल्याविण गति । नाहीं सुखा अथवा दुखाची ॥ ४२ ॥ अतेव स्थूळदेहाचेनि मरणें । लिंगदेहासी हि लागे करणें[15] । अज्ञानकारणाचें जवं नुठी धरणें । तोंवरी हें[16] नाशेना ॥ ४३ ॥

---

१ आटणी. २ प्रकार. ३ कल्पना, भास. ४ त्याबरोबर. ५ प्रवेशती. ६ हात. ७ विमृष=साफ होणें, धुऊन निघणें, शुद्ध होणें. ८ आकर्षण, नाहींसें होणें. ९ आकाश. १० निर्मूल होईल. ११ ऐकावयाचें तें ह्म०. दुसऱ्याचें भाषण. १२ देहद्वयाचें कारण जें वासनात्मक कारणदेह. १३ न होतां. १४ जगेल. १५ स्थूल देहाबरोबर नाहींसें होणें. १६ लिंग देह जोंपर्यंत कारणदेहाचें धरणें ह्म० हा देह धारण करण्यास कारण, जी वासना ती नाहींशी होत नाहीं तोंपर्यंत लिंग देहाचा नाश होत नाहीं.

जरी मरणें चि लिंग भंग होये । तरि आत्मज्ञानाचें प्रयोजन काय । संन्यासादि नाना साधनोपाय । कासयासी लागले ॥ ४४ ॥ जें अज्ञानपूर्वक अन्यथाज्ञान । तो मूळकंद असतां वर्तमान । स्थूळ सूक्ष्म विस्तारभान । वाढे मोडे पुनःपुन्हा ॥ ४५ ॥ होतां स्थूळ पि-काची मोडणी । होय सूक्ष्म बीजाची पुडझाडणी । परंतु पुन्हां मांडतां पेरणी । तें बीज सिद्ध चि असे ॥ ४६ ॥ धान्य सुडीमाजीं आवरे । वेगळें होतां चि वावरे । बीजमात्र जें मुडां थावरे । तें चि पेरिलें पिके ॥४७॥ तैसा देहद्वयेसीं ये संसारीं । नाना शुभाशुभ कर्मे करी । देहनाशीं वासनात्मक उरे बीजाकारीं । तें उभारतां कोण ह्मणे नको ॥४८॥ जेथ अंतःकरणाची च स्थिति सरली । तेथें सूक्ष्मरूपें वासना कोठें उरली । ऐसें कदाचित ह्मणसी तरि ते राहिली । अज्ञानगर्भी कारणत्वें ॥४९॥ असो दिनांतप्रळयेसीं देहनाश । हे तुज दोनी निरोपिले सावकाश । आतां हे हि जया प्रळयाचे अंश । ते ब्रह्मांडीचे दोनी बोलिजती ॥५०॥ जीवप्रपंच आणि ईश्वरप्रपंच । ऐसें शास्त्रीं बोलिलें हें साच । परंतु येथें आहे उंच नीच । अतिशयेकरूनि ॥ ५१ ॥ ईश्वरप्रपंच इछामात्रें । जीवासी बांधलें कर्मसूत्रें । जीवासी नाना योनी यातना यंत्रें । ईश्वर आनंदविग्रही ॥ ५२ ॥ जीव नाशिवंत मिथ्या हें सर्व बोलती । ईश्वर सत्य शाश्वत ऐसें ह्मणती श्रुति । जीव प्रळयावसरें नाश पावती । ईश्वर तो अविनाश ॥ ५३ ॥ ईश्वरीं जोंवरि ईश्वरत्व असे । तोंवरि प्रळयावसरीं तो हि नाशे । तें चि ब्रह्मैक्यबोधें ईश्वरत्व समरसे । तेव्हां सहज चि ऐक्यता ॥ ५४ ॥ असो पिंडें जीवासी नाश बोलिला । ब्रह्मांडें ब्रह्मयासी असे कल्पिला । ब्रह्मा नाशलीयां शंकरविष्णूला । सहजें चि नाश ॥ ५५ ॥ ब्रह्मा हरि हर नाशलीयां कल्पांतीं । सत्व रज तम सहजें चि हारपती । त्रिगुण नाशलीयां शुद्धसत्वाची गति ।

---

१ उभ्या पिकाची कापणी झाली ह्मणजे कणसांतील कांहीं दाणे जमिनींत जातात. पुढें पेरणीच्या वेळीं तें धान्य न पेरलें तरी तें उगवतें च. २ कणसांत. ३ आच्छादिलेलें असतें. ४ इकडे तिकडे पसरतें. ५ मुड्यांत स्थिर असतें. ६ सगुण साकार रूप.

काय व्हावी असे ॥५६॥ शुद्धसत्व जो कां प्रणवात्मक । तें चि ईश्वरत्व बोलिजे सम्यक । तें ईश्वरत्व हि ब्रह्मीं निष्टंक । समरसोनि गेलें ॥ ५७ ॥ मग ब्रह्म जें कां सत्य शाश्वत । निर्गुण निराकारत्वें आद्यंत । हें हि ह्मण-नयाचें जें प्रांत । तें शुद्ध स्वरूप ॥५८॥ असो पिंडनाशें जीवाचें प्रळय बोलिलें । ब्रह्मांडनाशीं ईश्वरासी प्रळयद्वय कल्पिलें । तेथ ब्रह्मयाचें दिनांतप्रळय कैसें जालें । तें चि आतां सांगिजेल ॥५९॥ तरि येणें चि सूर्यें आयुर्गणना। चतुर्युग सहस्रावधि दिनमानों । ते चि संख्या रात्रीची गणना । चतुर्युग सहस्र ॥६०॥ ब्रह्मा अनिमिष्य तेथें कैंची निद्रा । जें बोलावें दंडासन अगोचरी मुद्रा । त्याची हे चि रात्री पैं शिष्येंद्रा । जे रचना चि लोपे आघवी ॥ ६१ ॥ आतां ब्रह्मदिनांत अल्प जो कल्पक्षय । तेथें हि पृथ्वी होय जळमय । ज्यासी स्वयें ऋषिराज मार्कंडेय । देखता जाला साकल्य ॥६२॥ तरि ब्रह्मयासी जेव्हां निद्रा प्राप्त जाली । तेव्हां सृष्टिरचना सहज चि राहिली । जेणें उत्पत्ति करावी वहिली । तो सुषुप्तीनें व्याप्त असे ॥६३॥ जैसा राजा जालीयां विषयांध । सर्व राजकारण होय स्तब्ध । तैसें ब्रह्मयासी गाढमूढत्व होतां शुद्ध । सृष्टिकार्य राहे सहजें ॥ ६४ ॥ तेणें स्थूळ रचना सर्व संव्हारे । सूक्ष्म देवताचक्र पैरतें सरे । अपंचीकृत हिरण्यगर्भ कारणीं उरे । ब्रह्मयासहित ॥ ६५ ॥ तेथें सूक्ष्मत्वें जीव-बीजाचिया पुंडवटीं । सांठवती मायामांदुसेचा पोटीं । जेवि सर्व सं-स्कारेसीं बाहुलियांची पेटी । खेळांतीं ठेवी कुमारिका ॥ ६६ ॥ तेवि चतुर्युग सहस्र होतां ब्रह्मशार्वरी । तोंवरि जीव स्तब्धले अज्ञानांधकारीं पुन्हां प्रबोध जालीयां ब्रह्मा विस्तारी । कुमारिकान्यायें पूर्ववत ॥ ६७ ॥ असो ब्रह्मयासी जालीयां निद्रा प्राप्त । सृष्टिरचना अवघी खोळंबत । पर्जन्याचें आवर्षण पडत । आनिद्रापर्यंत ॥ ६८ ॥ पडलीयां पर्जन्याचें आवर्षण । स्थावर जंगम जाय आटोन । सचराचर बीजरूपें हारपोन । कारणीं राहे सर्व हि ॥६९॥ तेव्हां ब्रह्मा रजोगुणांशेंसीं । सत्वगुणविष्णूचिये

---

१ ह्मणण्याचे. २ चतुर्युग सहस्राणि दिनमेकं पितामहः ॥ ३ अनिमिष=देव. ब्रह्मदेवाला अनिमिषआचार्य ह्मटलें आहे. ४ मागें. ५ मायारूपपेटीच्या पुडांमध्यें.

नाभीसी । लयस्थ होऊनि घेत विश्रांतीसी । चतुर्युगसहस्रपर्यंत ॥७०॥ तवं पृथ्वीं होय हलकालोळें । तृण धान्य ना वृक्षमूळडोळ । सचराचर नाशोनियां सकळ । दहदहमान होतसे ॥ ७१ ॥ पृथ्वी तापे खापराऐसी । तेणें उष्णता लागे मस्तकीं शेषासी । तो ज्वाळा वमितसे विषेसीं । तेणें पृथ्वी जळों लागे ॥ ७२ ॥ शंकराचा तृतीय नेत्र उघडे । तेणें अग्निज्वाळा निघती भडाडें । पृथ्वीचें होऊनियां राखोंडें । जळामाजीं विरतसे ॥ ७३ ॥ तेव्हां प्रळयमेघ वृष्टि करी । तेणें जळमय होत आंत बाहेरी । ऐसें चतुर्युग सहस्रवरी । रात्रीचें गणन सरे ॥७४॥ पुन्हां ब्रह्मयाचा होतां दिनोदय । सरला ब्रह्मदिनांत प्रळय । हळु हळु सृष्टिक्रमाचा अन्वय । पूर्वयोगें हों लागे ॥ ७५ ॥ वटपत्रावरी बाळमुकुंद । त्याचे नाभिकमळीं होता ब्रह्मा स्तब्ध । तो निद्रा होऊनि विगेत सावध । होता जाला निजांगें ॥ ७६ ॥ तवं तें आवर्णोदक आळलें । त्याचें भूमंडळ पुन्हां सरसावलें । बीजरूपें अज्ञानकारणीं होतें सामावलें । तें पूर्ववत होय सकळ हि ॥ ७७ ॥ असो ऐसिया तिसां दिवसीं येक मास । बारा मासीं होय येक वर्ष । ऐसीं सेंभर वर्षे होतां ब्रह्मयास । पूर्णायुष्य हों सरे ॥ ७८ ॥ तेव्हां आपलीं शत वर्षे अनावृष्टि । होऊनि सरे सर्व हि जीवसृष्टि । तेणें द्वादशादित्य अग्निवृष्टि । येके चि वेळा करिती ॥ ७९ ॥ आणि रुद्रनेत्रानळज्वाळीं । मेरूसहित स्वर्गाची होय होळी । तैसा चि शेषास्यहुतांशें पाताळीं । होईल भडका येकसरें ॥८०॥ जेवि वनामाजीं काष्टद्वयघर्षी । अग्नि प्रगटे तो जाळी वनासी । तेवि ब्रह्मांडाचिया अग्नीनें सर्वांसी । दग्ध केलें क्षणमात्रें ॥ ८१ ॥ असो रक्षा जालीयां ब्रह्मांडाची । वृष्टि होईल प्रळयमेघांची । येकी दाटी जळधारांची । गजशुंडेचें प्रमाण ॥ ८२ ॥ तये अतिवृष्टीचा जळीं । विरे ब्रह्मांडभस्माची डिखोळी । तेथ नाना मेहुडीं हि नभमंडळीं । विरोनि जाती सहजें ॥ ८३ ॥ असो जळें टाकिली मर्यादा । देखोनि महातेज प्रवर्तलें द्वंद्वा । तेणें शोषिली जळमर्यादा । तें वायूसी न साहवे चि ॥८४॥

१ हाहा:कार. २ डाळ=डाहाळी, फांदी. ३ विषयुक्त. ४ गणती. ५ नाहीशी. ६ आस्य=मुख. ७ मेघ. ८ असहिष्णुता धरून विघ्न करण्यास.

तेणें परमावेशें झडपिलें । तेज तत्काळ विझोनि गेलें । हें देखोनियां गिळूनि ठेलें । वायूसी गगनें ते ॥ ८५ ॥ मग तथा शब्दगुण गगनासी । तमोगुण सगळें चि ग्रासी । तमोगुणातें रजोगुण नाशी । निमिष्य येक न लगतां ॥ ८६ ॥ रजोगुण सत्वगुणीं विरे । सत्वगुण शुद्धसत्वीं वावरे । शुद्धसत्व तें येकसरें । महत्तत्वीं सामावे ॥ ८७ ॥ महत्तत्वरूप जो सर्वेश्वर । तो ब्रह्मस्मरणें जाला तदाकार । मूळमायेसहित पिंडब्रह्मांडप्रकार । निरसों लागे ॥ ८८ ॥ जेव्हां हें सर्व हि निरसलें । तेव्हां सर्वेश्वरत्व ब्रह्मीं समरसलें । मग आपणं ऐक्यत्वें संचलें । परब्रह्मस्वरूप ॥ ८९ ॥ मूळमायेचिया संव्हारें । अहंब्रह्म हें स्मरण सरे । तेथींचा वेदनानुभव उरे । जैसा उष्मा अस्तमानीं ॥ ९० ॥ त्यासी सर्वेश्वर ऐसें बोलती विचक्षण । परि तें मूळमायेचें चि उत्तर लक्षण । जेवि कां तुर्येचें चि पक्कपण । त्यासी उन्मनी बोलिजे ॥ ९१ ॥ तेवि मूळमायेचें करूनि उपेसाम्य । सर्वेश्वर ब्रह्मैक्यबोधेसी गम्य । मग अहंब्रह्म हा अनुपम्य । अभ्यास त्यक्त करी ॥ ९२ ॥ तेव्हां आपण चि येकपणेविण । उरे ब्रह्म निराभास निर्गुण । हा प्रळय परम निर्वाण । निरोपिला तुज ॥ ९३ ॥ एवं दिनांतेसीं देहनाश । पिंडीचे प्रळयद्वय सविशेष । तैसे चि ब्रह्मदिनांतेसीं ब्रह्मांडनाश । हा महाप्रळय चौथा ॥ ९४ ॥ ऐसे पिंडब्रह्मांडात्मक मिळोन । च्यारि प्रळय सांगितले परिछिन्न । आतां पंचम प्रळयाचें हि लक्षण । सांगिजेल यथान्वयें ॥ ९५ ॥ मुमुक्षभावें अति नम्रता । विवेकसंयुक्त होऊनि स्वभावता । श्रीगुरूसी शरण रिघोनि तत्वता । अनन्य भावेंकरूनि ॥ ९६ ॥ देहचतुष्टयेसीं निरशन । करूनि महावाक्यविवरण । आत्मानात्मविचारें होइजे ब्रह्मसंपन्न । यासी विवेकप्रळय बोलिजे ॥ ९७ ॥ एवं पंचप्रळयांचें निरूपण । तुज समजलें कीं परिछिन्न । ऐसें स्वामीनें पुसतां शिष्यें लोटांगण । घातलें निजभावें ॥ ९८ ॥

---

१ सहवास, आश्रय.

ह्मणे स्वामी जळबिंदु दुधीं पडला । तो तेव्हां चि दुग्धरूप जाला । तैसा स्वामीनें स्वकरें मम मस्तक स्पर्शिला । तेव्हां च्चि मी ब्रह्मरूप ॥ ९९ ॥ तें चि स्वानुभवाचें उत्तर लक्षण । स्वानुभवें च्चि बोलेल पुढील कीर्ण । स्वानुभवदिनकरीं संपूर्ण । दिनकर रामिरामदास ॥ १०० ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये त्रयोदश कळापे पंचप्रळयकथन निरूपणं नाम पंचम कीर्ण प्रकाशः ॥ ५ ॥ श्रीराम जयराम जयजयराम ॥ कळाप वोवी ॥ ५६७ ॥

---

## विज्ञानस्थिति पंचभूत त्रिगुणलक्षण नानाविध आशंका कळाप ॥१४॥

॥ श्रीरामचंद्र ॥

ॐ नमो सद्गुरु परब्रह्म । निर्गुण निर्विकार निरुपम । निराधार निरुपाधि नित्य सम-। विषमातीत ॥१॥ तेथ सद्गुरूसी परब्रह्म ह्मणतां । लज्जा वाटतसे चित्ता । जो जे वस्तूचा अनुभव देता । तो च्चि ते केवि होईल ॥ २ ॥ जरी सद्गुरुकृपा यासी न होती । तरी कैंची पां ब्रह्मानुभवसंवित्ति । ह्मणौनि सद्गुरुकृपायोगें प्राप्ति । शिष्यासी परब्रह्मत्व ॥३॥ अहो वृक्षापासूनि होय फळप्राप्ति । तें फळ आणि वृक्ष येक कैसीं होती । क्षेत्रीं निफजे धान्यसंपत्ति । तें धान्य क्षेत्र येक कैसें ॥ ४ ॥ सूर्यापासूनि प्रभा उदिपे[1] । ते प्रभा चि सूर्य केवि ह्मणिपे । तेवि ब्रह्मानुभवदेता जो त्यासी सैाक्षपें[2] । तें चि कैसें ह्मणावें ॥ ५ ॥ दीपाकरितां प्रकाश होये । त्या उभयतांसी येक केवि ह्मणों ये । चंद्राकरितां कळांसी वृद्धि क्षये । तो चंद्र कळा येक कैसीं ॥ ६ ॥ आकाशापासूनि होय समीरु । तो चि तें हा केवि घडे प्रकारु । तेवि परब्रह्मदानी जो सद्गुरु । तो चि तें कैसेनि पां ॥ ७ ॥ सद्गुरु अभिधान पुरुषवाचक । ब्रह्म नामें प्रत्यक्ष नपुंसक । पुरुष आणि नपुंसक येक । केवि घडों शके ॥ ८ ॥ ह्मणौनि सद्गुरूसी परब्रह्म ह्मणतां ।

---

१ उद्यास येते. २ उत्कंठेनें.

लज्जा खरी च हा शब्द बोलतां । कां जे शब्द बोलिलों भोळेपणें स्वभावता । परि विचारीं पडिलों ॥ ९ ॥ तथापि सद्गुरुकृपेच्या पडिपोंडें । कदाचित ब्रह्मीं येक वेळ साम्यता घडे । कां जे शिष्यासी गुरुकृपा होतां रोकडें । ब्रह्मत्व प्राप्त तत्काळ ॥ १० ॥ ह्मणौनि ब्रह्मापरिस अनंतगुणें । सद्गुरु अधिक ऐसें श्रुति स्मृति ह्मणे । पार्वतीस अनुग्रह करितां ईशानें । गुरुगीतेंत बोले प्रसिद्ध ॥ ११ ॥ जैसी कृपा तैसा अनुभव । सद्गुरु शिष्यासी ब्रह्म करी स्वयमेव । सद्गुरुविण स्वानुभवटेवें । स्वप्नीं हि होणें न घडे ॥ १२ ॥ ब्रह्म निर्गुण निःसंग निर्विकार । सद्गुरुस्वरूप न कळे साचार । सगुणनिर्गुणादि नाना आकार । सद्गुरु त्याहूनि वेगळा चि ॥१३॥ ऐसें स्वानुभवदिनकरीं स्वभावता । शिष्य बोलों गेला अवचिता । तवं श्रीगुरु कृपावलेनि तत्वता । आळंगिजे निजशिष्य ॥१४॥ बा रे तुज काय असेल अपेक्षित । तें चि बोलें पां आतां प्रस्तुत । हे उपचार सकळ तुझे असोत । जेथील तेथ पैं ॥ १५ ॥ ऐसी आज्ञा होतां चि श्रीगुरूची । शिष्य आशंका घेतसे स्वानुभवें चि । जी ज्ञानप्राप्ति जालीयां पूर्णतेची । सीमा कोठवरी ॥ १६ ॥ ऐसा शिष्य बोलतां स्वानुभवें । सद्गुरूसी निजात्मसुख आठवे । जेवि पूर्णचंद्रोदयें हेलावे । क्षीरार्णव अमर्याद ॥ १७ ॥ तेवि शिष्याचिया पूर्णपणें । श्रीगुरूसी सुख होऊनि दुणें । स्वानंदाचिया सुरवाडें पेखणें । निजवाक्याचें आरंभिलें ॥ १८ ॥ सखया तुवां पुसिला प्रश्न गहन । कीं तें आत्मज्ञान जालीयां पूर्ण । काय फळप्राप्ति होय किंलक्षण । यथाक्रमें सांगिजे ॥ १९ ॥ तरि तें चि आतां साकल्य सांगिजेल । तूं देईं पां अवधानाची सेलें । तेणें सगळें स्वसुख पावसील । निजवृत्तिसाम्यता ॥ २० ॥ येकाग्र करूनियां वृत्ति । ज्ञानें साधलीयां स्वरूपप्राप्ति । जेवि आरिसां पाहातां स्वमुख देखती । प्राणिमात्र आघवे ॥ २१ ॥

---

१ साम्यतेनें, सारखें, समान. २ प्रत्यक्ष. ३ ढब, आवड. ४ प्रफुल्लितपणानें. ५ भूषण, व्यर्थ बडिवार ( हंसकोश ). ६ उत्तम वांटा किंवा भाक.

तेवि आरिस्यासारिखें आत्मज्ञान । पाहातां कळे आपणासी आपण । देहचतुष्टय निराशे पूर्ण । महावाक्यें ज्ञानप्राप्ति ॥ २२ ॥ तेथें विचारितां महावाक्याचा अर्थ । श्रीगुरुमुखें होय कृतार्थ । सोहं ब्रह्म हा परमार्थ । वेदशास्त्रीं प्रतिपाद्य ॥ २३ ॥ ब्रह्म जें कां निर्गुण निर्विकार । तें चि मी निश्चयेसीं होये साचार । ऐसा सा शतें येकवीस सहस्र । जप करी अहर्निशीं ॥ २४ ॥ देहादि माझा प्रपंच सकळ । हें अवघें चि मानूनि बाष्कळ । अनुसंधानीं वृत्ति करूनि निश्चळ । स्वरूपीं होय येकाग्र ॥ २५ ॥ त्या स्वरूपाचा शुद्ध स्वानुभव । दिनकरीं गुरुकृपा स्वयमेव । पंचभूतेंसीं त्रिगुणी अष्टधाप्रभव । निरसूनि पाहावें ॥ २६ ॥ तेथ जो जो दृश्यत्वें पदार्थ दृष्टीसी पडे । तो द्रष्टादर्शनेसीं वारूनि येकीकडे । स्वानुभवाचिया निवाडें । काय उरेल तें ॥ २७ ॥ आधीं सकळ पदार्थेसीं पृथुवी । स्वभावें नाहींपणें निर्शावी । तैसी च उदकतेजाची हि वारावी । उपाधि ज्ञानदृष्टीं ॥ २८ ॥ मग वायु हि चंचळ चाळकतेसीं । निर्शावा ज्ञानदृष्टीं स्वानुभवेसीं । वायु हारपतां आकाशीं शब्दासी । सहजेंचि निराश ॥ २९ ॥ शब्द निरसिलियां गगनीं । सत्व रज तम निरसे निपटूनि । मग मूळमायेची झाडणी । सहजें चि होये ॥ ३० ॥ एवं मूळमायेच्या निरासें । ईश्वरत्व हि सहजें निरसे । जेवि प्रकृति नाशलियां नाशे । सहजें चि आत्मा ॥ ३१ ॥ तेवि निरसालियां मायेसीं ईश्वर । सहज चि ब्रह्मस्वरूप निर्विकार । ऐसें बोलावयासी तऱ्हि उत्तर । कोण उरलें पैं ॥ ३२ ॥ तेव्हां केवळ संगातीत निःसंग । शुद्ध बुद्ध निरुपम अव्यंग । निर्द्वंद्व निरामय अनंग । अनादि अजर अव्यय ॥ ३३ ॥ असंभवनीय अपार अतुळ । सघन साजिरें नित्य निश्चळ । निर्विकार निराधार निर्मळ । अनाम अरूप जें ॥ ३४ ॥ निष्कर्म निःप्रपंच निरुपद्रव ।

---

१ प्रतिदिनीं एकवीस हजार सहाशें वेळां होणारा " सोहं " असा अजपाजप. दासबोध १७×५ पहा. २ पंचभूतें+त्रिगुण=अष्टधा माया. ३ निवाडा होऊन. ४ ज्ञानदृष्टीनें.

निजानंदभरित जें स्वयमेव । स्वसंवेद्य स्वप्रकाश निरावयव । निर्गुण निःसीम ॥ ३५ ॥ काळकळनातें जें केवळ । अपार अनिर्वचनीय पोकळ । घनदाट निबिडपणें अचळ । शून्यातीत जें ॥ ३६ ॥ जें आदिमध्यांतरहित । त्रिगुणपंचभूतादि उपाधीवर्जित । अपरमित व्यापक जें अनंत । असंभाव्यपणें ॥ ३७ ॥ ऐसें जें उपाधीविवर्जित । तें परब्रह्म जाणिजे शाश्वत । जेथ न चले हेतु दृष्टांत । तर्क वितर्क भावना ॥ ३८ ॥ जें शस्त्रें न तुटे ह्मणोनि अछेद्य । ज्यासी होणें नसे ह्मणौनि [2]स्वसंवेद्य । उदकें न कालवे याकरितां अक्लेद्य । अशोष्य न शोषवे वायुचेनि ॥ ३९ ॥ अग्नीचेनि न जळे ह्मणौनि अदाह्य । कोण्हासी नाडळोनि जें अवगा[3]ह्य । दशदिशा व्यापूनि अंतर्बाह्य । सचराचर व्यापिलें ॥ ४० ॥ अनंत ब्रह्मांडें ज्यामाजीं भरलीं । जैसीं रात्रीं उदकीं तारांगणें वि[4]खरलीं । पारि त्या आडळलीं ना कळलीं । आलीं गेलीं कैसीं तें ॥ ४१ ॥ कां तें गगनामाजीं गंधर्व[5]नगरें । आलीं आणि गेलीं अपारें । परि त्यासी ठाउकीं नसती येकसरें । तेवि ब्रह्मीं ब्रह्मांडें ॥४२॥ कां ते उदकीं तरंग आले आणि गेले । ते उदकासी ठाउके न होती वेहिले । तेवि ब्रह्मीं ब्रह्मांडगोळ जाले । तें त्यासी ठाउकें न घडे ॥४३॥ ऐसें असंभाव्यपणें अगाध । श्रुति नेतिशब्दें जेथ स्तब्ध । ब्रह्मादि हारिहर नित्य सावध । ज्याचिया स्मरणीं ॥ ४४ ॥ ज्यासीं येकात्मता सनकादि संत । नित्य ध्याती वशिष्ठव्यासादि महंत । शुकवामदेवहनुमंतादि विरक्त । समाधिस्त जेथ ॥ ४५ ॥ कपिलगौतमादि महासिद्ध । पातंजळीदत्तगोरक्षादि साध[7] । विदेही जनकऋषभदेवादि अगाध । समाधिस्थ जेथ ॥ ४६ ॥ श्रीरामकृष्णादि अवतारी समग्र । सुर नर ऋषि

---

१ मुळांत " काळकळनात " असून " नात " खोडून समासांत " ने " कोणी लिहिला आहे; पण मला वाटतें " ती " हस्तदोषानें राहिली असावी. कालकलनातीत=काळाच्या आटोक्या बाहेरचें. चाफळप्रतींत ‘ काळकळनांत ’ आहे. २ स्वतःसिद्ध, नित्य, सनातन. ३ व्यापक. ४ पसरलीं. ५ आकाशांत, मनुष्याकृतीचे किंवा नगराकृतीचे जे ढग येतात ते. ६ सत्वर. ७ साधु.

मुनि राजे अव्यग्र । योगी ज्ञानी होऊनि येकाग्र । समाधिस्थ जेथ ॥४७॥ ऐसे समाधिस्थ समग्र सांगतां । ग्रंथ अपार विस्तारेल तत्वता । ह्मणौनि असो योगी ज्ञानी समस्तां । विश्रांतिदायक जें ॥ ४८ ॥ ऐसें जें अगाध आणि अनुपम्य । अनिर्देश्य अप्रमेय अगम्य । अनागत अजरामर समसाम्य । सत्य सनातन जें ॥ ४९ ॥ जें मायादिमळविहीन । ईश्वराचें निवासस्थान । जीवशिवादि असतां भिन्न । जेथ ऐक्यासी येती ॥ ५० ॥ अविद्या अष्टधेसीं जेथें वाव । ज्याचिया स्मरणें जीवेश्वर स्वयमेव । तें ब्रह्म मी यया स्मरणें जीव । ब्रह्मत्वासी येती ॥ ५१ ॥ जेवि भृंग अळिकेसी दंश कारितां । अळिका वेधें चि भृंग होय तत्वता । तेवि ब्रह्मानुसंधानें जीव स्वभावता ब्रह्मत्वासी येती निश्चयें ॥ ५२ ॥ सुईच्या अग्रावरी मोहरी थारे। इतुकी वृत्ति जारि ब्रह्मीं स्थिरे । तारि पापराशी दग्ध होऊनि अचिरें । जीवासी ब्रह्मप्राप्ति होये ॥ ५३ ॥ अनेक करावे साधनउपाय । अष्टांग योग कामनापवनजय । अभ्यासयोगें मनोलय । शनैः शनै करावा ॥ ५४ ॥ मन स्वरूपीं लीन व्हावयासी । अनंत पुण्य पाहिजे गांठीसी । जालियां मनपवनजयासी । परब्रह्म स्वयंभ हा ॥ ५५ ॥ मन जोंवरी स्वरूपीं न लागे । तों हा ब्रह्म जाला जऱ्हि आंगें । तऱ्हि जालेपण यासी न अवगे । मनोजयेविण सर्वथा ॥ ५६ ॥ त्या मनोजयाचें लक्षण । पंचदश कळापीं प्रथम कीर्ण । तेथ सांगिजेल सुलक्षण । श्रोतीं अभ्यासावें तदंगें ॥ ५७ ॥ असो ऐसें जें परब्रह्म निर्गुण । तेथ वृत्ति करूनियां सुलीन । अहंब्रह्मात्मक साधतां स्मरण । जीवासी ब्रह्मप्राप्ति सहजें चि ॥ ५८ ॥ होतें बहुत दिस चुकलें । आपण आपणासी भेटलें । जेवि घटसंगें आकाश होतें फांकलें । तें मिनलें आपआपणा ॥ ५९ ॥ कां तें जळामाजी प्रतिबिंबलें होतें । तें जळनाशीं ऐक्या आलें अवचितें । मग तेथ बिंब आणि प्रतिबिंब तें । वेगळेपणें कैंचें ॥ ६० ॥ कां तो जळबिंदु वेगळा

---

१ त्वरित. २ होय. ३ पसरलें. ४ मिळाले.

होता जाला । तो अकस्मात महार्णवीं बुडाला । तेथ ऐक्यात्मता ऐक्यस्थितीसी आला । हें हि कोणें ह्मणावें ॥ ६१ ॥ स्फुलिंग जेवि मिळाला महातेजीं । कीं तो रजरेणु ऐक्यत्वें पृथ्वीमाजीं । अथवा चंद्रकळा चंद्राचिया संयोजीं । येतां सहज चि पूर्णत्व ॥ ६२ ॥ तेवि आत्मानुसंधानें जीवासी । ब्रह्मप्राप्ति जालियां निश्चयेसीं । तो या देहें चि परब्रह्मतुकासी । समतुकें आला निजांगें ॥ ६३ ॥ न मोडतां त्याचिया देहाकारें । ते परब्रह्ममूर्त्ति चि अवतरे । ज्याची सस्वरूपीं वृत्ति नाहंपणें मुरे । तो परब्रह्म सगळें चि ॥ ६४ ॥ जेवि न मोडतां लोखंडाचा आकार । परिससंगें होय सुवर्णाकार । तेवि न मोडतां याचा देहाकार । हा परब्रह्म मूर्त्तिमंत ॥ ६५ ॥ कां तो योगीया प्रसुप्त कुंडलणी चेतवितां । योगबळें मनपवनेसीं ग्राशी पंचभूतां । मग सतरावियेचें अमृतपान करूनि तत्वता । देहाकारें दिव्य मूर्ति प्रगटे ॥ ६६ ॥ तेवि नित्यानित्यविचारें आत्मानुसंधानें । देहीं असतां जीवें ब्रह्मत्वासी येणें । श्रवणमनननिजध्यासें स्वयें होणें । साक्षात्कारें परब्रह्म चि ॥ ६७ ॥ एवं मुख्य ज्ञानप्राप्तीचें कारण । साधूनि ब्रह्माहमस्मि अनुसंधान । जीवशिवासी ऐक्य करून । परब्रह्मस्वरूप ॥ ६८ ॥ ह्मणौनि सद्गुरूनें शिष्यासी आश्वासूनि । आत्मज्ञानाचां अनुसंधानीं लाऊनि । ठेविला स्वयें परब्रह्म करूनि । तेव्हां ज्ञानकारण साधलें ॥ ६९ ॥ मग सहजस्थिति जिकडे पाहे । तिकडे स्वरूप चि देखताहे । त्रिगुणपंचभूतविवर्जित आहे । स्वरूप चि अवघें ॥ ७० ॥ स्वरूप कोमळ तरि गगनापरीस । कठीणपणें चाळिलें जेणें वज्रास । दशदिशांतर्बाह्य व्यापूनि असमसाहास । ममांतरीं तें चि ॥ ७१ ॥ स्मरणानुरूप पाहे स्वरूप । तवं जागृतीमाजीं देखे स्वरूपाचें पडपें । स्वप्नसुषुप्तिमाजीं हि तद्रूप । देखे स्वरूप चि अवघें ॥ ७२ ॥ एवं जागृतिस्वप्नसुषुप्तीमाजीं । तुर्यारूपें वृत्ति स्वरूप संयोजी । स्वरूपसमावेशें आत्मत्वाचां समाजीं । परब्रह्म चि देखे ॥ ७३ ॥

१ तुक=महत्त्व. २ बरोबरीनें. ३ जीवनकलेचें. ४ ज्ञानप्राप्तीची सर्व खटपट फलद्रूप झाली. ५ अनिवार. ६ शोभा.

दशेंद्रियादि जो जो व्यवहार । तो तो स्वरूपेसीं च ऐक्यत्वप्रकार । अंतर्बाह्य व्यापलें सचराचर । परब्रह्म केवळ ॥ ७४ ॥ आतां येथूनि तेथवरी जावें । कां इकडे तिकडे पाहावें । हें कांहीं नलगे आघवें । स्वसंवेद्य तें चि ॥ ७५ ॥ नाशिवंत उपाधि ते निरसावी । मग वस्तु चि सार आघवी । कोठें ध्यावी कोठें ठेवावी । ऐसें हि जेथ नसे ॥ ७६ ॥ ह्मणौनि शुद्ध बुद्ध सत्य सनातन । मायाअविद्यादिमळविहीन । शून्यातीत स्वसंवेद्य परिपूर्ण । अज अनादि अनाम ॥ ७७ ॥ त्या स्वरूपाचा अनुभव घेऊन । स्वानुभवदिनकरीं परिपूर्ण । ज्ञान साधलियाचें कारण । विज्ञानस्थिति सहजें चि ॥ ७८ ॥ मनाचें सहजें जालें उन्मन । चित्त स्वरूपीं गेलें समरसोन । अवघा अखंड आपला आपण । दुसरें कांहींच न दिसे ॥७९॥ ऐसा स्वानंदाचिया समावेशीं । बुझाविला[1] स्वानुभवदिनकर रामदासीं । ज्ञान साधलियाचे फळप्राप्तीसीं । मोक्षसाधनसंसिद्धी ॥ ८० ॥ सद्गुरु ह्मणतिलें शिष्यासी । तुवां पुसिलें ज्ञानफळप्राप्तीसी । तें हें जाणोनि मोक्षसाधनेसीं । परब्रह्मप्राप्ति निजदेहीं ॥ ८१ ॥ ये चि आत्मत्वाचां डोळां । जो भोगिजे तो चि हा मुक्तीचा सोहळा । ऐसें ऐकतां शिष्यस्वानुभव गळाला । स्वानंदसमाधीं संतृप्त[2] ॥ ८२ ॥ त्या स्वानंदाचेनि संतृप्तता । स्वानुभवदिनकरीं स्वभावता । उद्धार येतील ते रामदासकृपां तत्वता । स्वानुभवदिनकर अनुवादेल ॥ ८३ ॥ तें श्रोतीं होऊनि परम सादर । श्रवण करावें स्वानंदउद्धार । दिनकराचे मस्तकीं अभयंकर । संतीं महंतीं ठेवावा ॥ ८४ ॥ अभयंकर तुह्मीं पहिलें चि ठेविला । तेणें ग्रंथ सिद्धीसी आला । हा पाहिजे निजकृपां विस्तारिला । मागणें इतुकें चि जी ॥ ८५ ॥ वाक्य ऐकतां चि परम करुणेसीं । तथास्तु ह्मणौनि दिनकररामदासी । स्वानुभवदिनकरीं ब्रह्मस्वरूपेसीं । मोक्षसिद्धि पावतील ॥ ८६ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये चतुर्दश कळापे स्वानुभवपरिपूर्ण निरूपणं नाम प्रथम कीर्णप्रकाशः ॥१॥

---

१ समजाविला. २ पूर्ण प्राप्ति.

॥ श्रीराम ॥

शिष्य ब्रह्मप्राप्ति लाधोनि पूर्ण । स्वानुभवदिनकरीं समाधान । स्वानंदैक्यसुखसाम्राज्य गहन । विज्ञानस्थिति सहजें चि ॥ १ ॥ सहजसमाधिस्थ निजदेहीं । अर्द्धोन्मीलित निजदृष्टि न देखे कांहीं । देहीं असोनि जैसा विदेही । निजस्वानंदें डुल्लत ॥ २ ॥ अंतःकर्ण परब्रह्मीं सुलीन जालें । मन सहजस्थिति उन्मनत्व पावलें । बुद्धीचें वोलभ निश्चयात्मक आलें । परब्रह्मसाम्यतेसी ॥ ३ ॥ चित्त चैतन्येसीं चाकाटलें । अहंकाराचें बंड होतें स्फुरलें । तें स्फुरणत्वें चि साम्यतेसी आलें । परब्रह्माचिये ॥ ४ ॥ स्वानंदासी कोंभ फुटले । तेणें स्वसुख समाधीसी आलें । संतोषाचिये दुणें चढलें । निजांगीं भरितें ॥ ५ ॥ ज्ञान अति सौरस्य पावलें । विज्ञानासी बीकें चढलें । अज्ञान निपटूनि हारपलें । अन्यथाज्ञानेसीं ॥ ६ ॥ तेणें शांति बहुत थोरावली । क्षमा क्षम्यत्वें सन्मान पावली । दया सदयतेसी सौरभ्यतेसी आली । भूतमात्रीं समत्वें ॥ ७ ॥ सहिष्णतेसी सहनशीलता । तितिक्षेसी आली परिपक्वता । उपरतीसी येऊनि विरक्तता । स्वरूपीं मुराली ॥ ८ ॥ निवृत्तीसी गांभीर्य चढलें । प्रवृत्तीसी प्रौढत्व पावलें । सहजस्थितीसी आलें । मान्यपण ॥ ९ ॥ तेणें काम चि निष्काम जाला । क्रोध निजशांति अवगला । शोक चि निजधैर्याचें ल्याला । कवच निजांगीं ॥ १० ॥ मोहें विरक्तता अवलंबिली । भयाची निर्भय स्थिति जाली । सत्वसंशुद्धीसी आली । अक्षोभ्यता गहन ॥ ११ ॥ धैर्य दोहीं बाहीं बळावलें । सत्य शौर्यता लाधलें । समतेचिया आंगा आलें । अति तरुणपण ॥ १२ ॥ विश्रांति जाली परम लोंठी । साम्यतेसी चौगुणें बळ उठी । सौजन्यासी थापटूनि पाठी । निष्कापट्य आलें ॥ १३ ॥ मानें धरिलें अमानित्व । दंभासी ठसावलें अदंभत्व । मदें टाकूनि उन्मादत्व । उन्मनत्व अवलंबिलें ॥ १४ ॥

---

१ आवड अथवा तादात्म्य, २ चकित झालें. ३ ऐक्यभाव, सुरसत्व, प्रसाद. ४ तेज. ५ विपरीत ज्ञानासह. ६ सुवासिक, सौंदर्य, कीर्ति. ७ सुखदुःखादिकाविषयीं सहनशीलता. ८ मिळाला, भासला. ९ शुद्धसत्वाला अत्यंत शांति आली. १० मोठी.

आपणाहूनि वेगळें कोण्ही देखावें । तरि त्याच्या तिरस्कारीं प्रवर्त्तावें । तरि हा पहिलें चि अद्वितीय कोठें पाहावें । तिरस्कारासी मग ॥१५॥ पराधिक्यें प्रगटे मत्सर । तत्रं पाहिलें चि निवासी सर्वांतर । तेथ यासी न दिसे कोण्ही आपपर । निर्मत्सरता सहजें ॥ १६ ॥ पदार्थ कांहीं शाश्वत देखावा । तरि त्याचा येणें लोभ धरावा । निर्लोभता नाशिवं-ताचा त्याग करावा । ऐसें चि गमतसे ॥ १७ ॥ ब्रह्मांड सामावलें निजउदरीं । सन्मान पाहावा कोणावरी । संसर्गाची सरली वारी । तेथ द्वेषावें कवणासी ॥ १८ ॥ परिपूर्णत्वें निजांतरीं । तेथ संदेहासी कैंची उरी । ऐक्यत्वें समता आपपरीं । तेथ विकल्प कीजे कोणेसीं ॥ १९ ॥ विकल्पाची जेथ वारी सरे । तेथ संकल्प काइसेनि स्फुरे । संकल्पाभावें कल्पना मुरे । कामनेसहित ॥ २० ॥ कामना जेथ निष्काम जाली । तेथ तृष्णा हि वितृष्णेसी आली । निर्वासनस्थिति समरसली । वासना सस्वरूपीं ॥ २१ ॥ वासनेचा जेथ लय जाला । तेथ वांछेचा हि थारा मोडला । पदार्थमात्र निरसोनि गेला । इछा शमली सहजें चि ॥ २२ ॥ भावना जाली सर्वत्र सम । अणुमात्र न दिसे विषम । यम नियम प्राणायाम । प्रत्याहारें ध्यान धारणा ॥ २३ ॥ आसनजयेसीं अखंड । समाधीचें विरमलें बंड । सहजस्थितीसीं प्रचंड । व्युत्थान हारपलें ॥ २४ ॥ निजऐक्यता सहजस्थिति । विज्ञानेसी ब्रह्मसंविति । आत्मानुसंधानें उपरति । प्रत्याहारेसीं ॥ २५ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति व्यापूनि । त्रै अवस्थांची तुर्या साक्षिणी । तें साक्षित्व पोटीं जिरऊनि । आब्रह्मपर्यंत व्यापली ॥ २६ ॥ आब्रह्मापासूनि अणुरेणांत । व्यापूनि आदिमध्यांतरहित । आपुलें आपण सस्वरूप देखत । स्वसंवेद्यपणें ॥ २७ ॥ स्वसंवेद्यत्वें अवघा आपण । तेथें द्वेषील कवणासी कवण । येकांशें भूतमात्रीं राहिला व्यापून । तेथ आरि मित्र कवणासी ॥ २८ ॥ आरिमित्रपण जेथ निमालें । तेथ माझें तुझें सहज हारपलें । अहंपण समूळ विरालें । स्वरूपासगट

१ सान्निध्य, सहवास. २ जागा, स्थळ, अवकाश किंवा फेरी. जेथें संसर्गाला अवकाश नाहीं. ३ विरलें अथवा लाजलें. ४ विषयानिवृत्ति, वैराग्य.

॥ २९ ॥ अहं कोहं सोहंपण । त्रिपुटीसीं गेलें विरोन । नाहंपणेसीं विज्ञान । सहजस्थिति प्रगटलें ॥ ३० ॥ नित्य जेथें सहनशीलता । तेथें विरमली सुखदुखता । प्राप्तअप्राप्तीसीं संतुष्टता । सहजस्थिति विलसे ॥३१॥ शुद्धसत्वेसीं त्रिगुणभान । न दिसे ह्मणौनि जो सहजें निर्गुण । मायादि विकार गेले गळोन । ह्मणौनि निर्विकार जो ॥ ३२ ॥ पंचीकृतेसीं पंचभूतउपाधि । नाहीं तयाकारितां जो निरुपाधि । मीमाझे-पणाचा संग न बाधी । ह्मणौनि बोलिजे निःसंग ॥ ३३ ॥ पदार्थ-मात्राचें न साजे उपम । ह्मणौनि केवळ जो निरुपम । आपपारिखेंपणें नसे विषम । सम बोलिजे या हेतु ॥ ३४ ॥ स्तुतिनिंदेसीं मानापमान । गळाले ह्मणौनि जो सत्य सनातन । न चढे न वोहटे जो परिपूर्ण[1] । हर्षविषादरहित ॥ ३५ ॥ स्वरूपस्थितीसी नाहीं पालट । ह्मणौनि जो नित्य निर्घोट । सघन सांजिरा गुप्त ना प्रगट । अंतर्बाह्य सहजस्थिति ॥ ३६ ॥ अपेक्षा नाहीं पदार्थमात्राची । ह्मणौनि निरपेक्षता बोलिजे साची । अंतर्बाह्य जो सहजें शुचि । ज्ञान कर्म उपासना ॥ ३७ ॥ आत्मानुसंधानीं परम दक्ष । नित्यानित्यविचारीं सापेक्ष । स्वानंदाभिरामें निजमोक्ष । सहजस्थिति साधिला ॥ ३८ ॥ स्त्रीसुतधनगेहीं उदासता । पंचविषयेसी अनासक्तता । सर्व हि आधि व्याधि स्वभावता । विगत ज्यापासूनि ॥३९॥ व्हावी कांहीं आपणा फळप्राप्ति । ह्मणौनि करणें नाहीं कर्मासक्ति । निष्कामतेसीं सहजस्थिति । कर्मकळाप[2] करणें ॥ ४० ॥ कोण्हाचिया स्तुतिवादें न हर्षणें । निंदायोगें कोण्हाचा द्वेष न करणें । कांक्षा[3] नाहीं मत्ताभिमानें । शोचणें नाहीं कोण्हेसीं ॥ ४१ ॥ शत्रु मित्र समसमान । विगळित जाले मानापमान । शीत उष्ण सुखदुःखादि विषम भान । स्वप्नीं हि नसे जया ॥ ४२ ॥ अहर्निश अंतरीं सम-साम्यता । संगातीत निःसंग स्वभावता । मौन मुद्रेमाजीं अखंडता । स्वानुभवें संतृप्त ॥ ४३ ॥ जो स्वात्मस्थितीसीं सदां संतुष्ट । थोडें बहुत हो अल्प विशिष्ट । कोण्हीयेकां प्रसंगें वरिष्ट । सकळेसीं साजिरा ॥४४॥

---

१ परिपूर्ण. २ कर्मांचा समुदाय, बहुविध कर्में. ३ इच्छा, भूक.

मी येक सर्वगुणेसीं संपन्न । माझा चि व्हावा सर्वस्वें बहुमान । हें कदापि नाहीं आठवण । अमानित्व सहजस्थिति ॥ ४५ ॥ माझें करणें सर्व हि चांगलें । हें कदापि चित्तीं नाठवे वहिलें । नाहंपणें कर्तृत्व करूनि विहिलें[1] । अदंभेसी सहजस्थिति ॥ ४६ ॥ वायुहूनि मवाळपणें चालणें । गगनाहूनि मवाळपणें पाहाणें । मनाहूनि मवाळपणें बोलणें । अहिंसा हे सहजस्थिति ॥ ४७ ॥ खणोनि कालऊनि पायें तुडविती । नांगरूनि कुळऊनि[2] मोर्वेडिती । परंतु पृथ्वीचे ठाईं सर्वस्वें क्षांति । तद्वत् क्षमा जयाची ॥ ४८ ॥ कोण्ही शौच करूं अथवा पुजूं । परंतु तें उदक सर्वां उंजु । तेवि आर्जवाचा सर्व समाजु । आर्जव हें सहजस्थिति ॥ ४९ ॥ जेवि कां सूर्य निजतेजें दीप्तिमंत । तेवि गुरुसेवेचा ठाईं उद्यत । काया वाचा मनसा इंद्रियेसीं आसक्त । गुरुभजनीं सहजस्थिति ॥ ५० ॥ वायु जैसा तो अंतर्बाह्य शुचि । तेवि अंतर आत्मज्ञानें शुचि सहजें चि । मृत्यकाउदकें बाह्य शुद्धि स्वभावें चि । शुचित्व हें सहजस्थिति ॥५१॥ जेवि कां तें आकाश निश्चळ । तैसें मानस ज्याचें सदैव अढळ । आत्मानुसंधानेसीं अविकळ । स्थैर्यता हे सहजास्थिति ॥ ५२ ॥ अंतर्वृत्तीसी करूनियां निग्रह । प्राणायामीं दृढ बाह्येंद्रियसमूह । सारासारविचारें निसंदेह । आत्मनिग्रह सहजस्थिति ॥ ५३ ॥ विरागता विषयांचा ठाईं । शब्दस्पर्शरूपरसगंधीं अविषई । ज्ञानेंद्रियकर्मेंद्रियेसीं अविनेई । वितृष्णता हे सहजस्थिति ॥५४॥ मी येक ज्ञाता सर्वसंपन्न । कर्मकळाप माझे गहन । हे अहंकृति गेली ज्याची गळोन । अनकार सहजस्थिति ॥५५॥ जन्मजरामरणाचें भय सेंद्य । दुखदोषादि नाना व्याधींचें गद्यें । हें पुढें येणार आहे जों पद्य । तों सावध होणें सहजस्थिति ॥ ५६ ॥ देह गेह दारा धन संतति । यांचे ठाईं अतिशयें अनासक्ति । आणि इष्टानिष्ट

१ योग्य. २ कुळवानें जमीन साफ करून. ३ पेरताल. ४ सहनशीलता. ५ सरळ, सारखें. ६ मृत्तिका व पाणी यापासून. ७ परिपूर्ण. ८ वैराग्य. ९ ज्ञानेंद्रियकर्मेंद्रियांपासून फटकून राहणारा. १० अनहंकार (?) चाफळप्रतींत 'अनकार' च आहे. ११ तात्काल. १२ गद्यपद्य=कपट, फसवेगिरी.

ज्या नाना उपपत्ति । यांचे ठाईं समचित्त ॥ ५७ ॥ ईश्वरभजनीं भक्ति परम । भगवत्कीर्तनीं अति प्रेम । अव्यभिचारिणी भक्ति निःसीम । अनन्यभावें येकात्मता ॥ ५८ ॥ जनपदांचे ठाईं वितृष्णता । नित्य निरंजनीं येकनिष्ठता । सहजस्थिति सहिष्णता । ऐक्यभावें सस्वरूपीं ॥ ५९ ॥ आत्मविषईं नित्य सावध । तत्वज्ञानीं विचार विविध । ब्रह्मज्ञान जें परम शुद्ध । तेथें ऐक्यता सहजस्थिति ॥ ६० ॥ मिथ्या विपरीतपणें संसार अनिवार । तो आत्मज्ञानें निरसूनि समग्र । वारूनि जन्ममरणभय अपार । निर्भयता सहजस्थिति ॥ ६१ ॥ येकात्मता भजनाचिये विधीं । सात्विकभावेसीं संशुद्धि । आत्मअनात्मविचारसिद्धि । सत्वसंशुद्धि हे ऐसी ॥ ६२ ॥ अन्यथाज्ञानेसीं अज्ञान । निरसूनि साधावें आत्मज्ञान । तेणें सहजस्थितीसीं विज्ञान । ज्ञानयोग [3]व्यवस्थिति ॥६३॥ अन्न वस्त्र धन धान्य संपति । यांत जे पदार्थ अनुकूळ यथाशक्ति । व्यय करणें चि [4]अवंचकस्थिति । दानप्रसंगीं सादरता ॥ ६४ ॥ यमनियमेसीं जो प्राणायाम । ध्यान धारणा प्रत्याहारें अविश्रम । निजासनीं समाधि व्युत्थान निसीम । दम बोलिजे सहजस्थिति ॥ ६५ ॥ श्रौतस्मार्तादि कर्मी यज्ञ प्राधान्य । उपासनारहस्यीं प्रणवयज्ञ सौजन्य । आत्मानुसंधानेसीं ज्ञानी यज्ञ प्रामाण्य । त्रिविध यज्ञ सहजस्थिति ॥ ६६ ॥ त्रिवर्णासी उचित वेदाध्ययन । सर्वां वर्णयातीसी कर्त्तव्य नामस्मरण । यांत सर्वोत्कर्षें स्वात्मानुसंधान । स्वाध्याय हा सहजस्थिति ॥ ६७ ॥ गुरु देव कां [5]श्रेष्ठत्वें मान्य । यांसीं सर्व प्रकारेसीं अनन्य । काइक वाचिक मानसिक कीजे सौजन्यें[6] । तप बोलिजे सहजस्थिति ॥६८॥ आत्मपारिखें लाहानथोर । सर्वांसीं समतायोगें साचार । निष्कपट वर्तणें सर्वां प्रियकर । आर्जव ते हे सहजस्थिति ॥६९॥ ब्रह्मैक्यबोधेंसीं येकात्मता । जालीयां मी तूं खुंटे स्वभावता । दुजेपणें हिंसा चि विरमेली[7] तत्वता । अहिंसा ते हे सहजस्थिति ॥ ७० ॥ अशाश्वत जें होतें असत्यपणें । तें निरसूनि शाश्वत स्वरूप पाहाणें ।

---

१ दृष्टांत, युक्ति, कारण. २ देश अथवा लोकांचा सहवास. ३ निश्चित. ४ सरळ, निष्कपट बुद्धीनें. ५ श्रेष्ठ अथवा मान्य पुरुष. ६ सुजनत्व, मित्रत्व. ७ विराली, लाजली.

पाहोनियां स्वयें तें चि होणें । सत्य तें हें सहजस्थिति ॥ ७१ ॥ दुजे-पणावरी करूनि क्रोध । समूळ निरसिलें द्वैत विविध । शांतिसुखें भोगणें येकात्मबोध । अक्रोधता हे सहजस्थिति ॥ ७२ ॥ मीमाझेपणें होता जो संयोग[1] । तेणें वेष्टलें होतें स्वरूप सर्वांग । तें सोडूनि भोगिजे सस्वरूप सांग[2] । त्याग तो हा सहजस्थिति ॥ ७३ ॥ उंच निंळ[3] जवळ दुरी । असलीयां उठे ऊर्मीची उर्जेरी[4] । समसाम्यता आलीयां येका हारी । शांति ते हे सहजस्थिति ॥ ७४ ॥ कामक्रोधलोभाचें होतें पैशुंन[5] । तें समग्र टाकिलें निर्दाळून । स्वसुखेसीं स्वानंदें निमग्न । अपे-शुन हें सहजस्थिति ॥ ७५ ॥ पारिखें गांजिलें देखोनि स्वभावता । तें सर्वस्वें आप्त करणें हे सदयता । नेणोनि दुजेपणाची सहसा वार्त्ता । दया ते हे सहजस्थिति ॥७६॥ प्राणिमात्रेसीं निरपेक्षता । परोपकारीं परापेक्षता । को-ण्हासी न करणें लोलुप्यता । अलोंलुत्व[6] सहजस्थिति ॥७७॥ कठोर काठिण्य परधर्म । कुतर्क कापट्य[7] सोडूनि कुकर्म । सर्वांसीं मृदत्वें वर्तणें निसीम । मार्दव तें हें सहजस्थिति ॥ ७८ ॥ पुनःपुन्हां जन्मोनि मरणें । नाना विर्गवाक्यें[8] संसार करणें । याची लाज धरूनि स्वहितीं सादर होणें । ऱ्हीं हे बोलिजे सहजस्थिति ॥ ७९ ॥ संसारभ्रमें होता भ्रमला । तोंवरि चहुंकडे सैरा धाविला । तवं अकस्मात श्रीगुरुकृपा निश्चळ जाला । अचापल्य हें सहजस्थिति ॥ ८० ॥ देहबुद्धीचें झाडूनि मळिकट । आत्मज्ञानेसीं होऊनि येकनिष्ट । स्वयंप्रकाशें अति तेजिष्ट । तेज तें हें सहजस्थिति ॥ ८१ ॥ होता स्वरूपीं विगंत जोंवरि । तोंपर्यंत अन्याय कोण क्षमा करी । मग आलियां सस्वरूपीं येका हारीं । क्षमा ते हे सहजस्थिति ॥८२॥ चंचळपणें जीवीत्व होतें । तें श्रीगुरुपदीं केलें सेरतें[10] । मग आंपैसें[11] चि धरी निज धैर्यातें । धृति ते हे सहजस्थिति ॥८३॥

१ संबंध, मोहपाश. २ अव्यंग. ३ नीच तर नव्हे ? चाफळप्रतींत ‘ निळ ’ च आहे. ४ उत्कर्ष. ५ पैशुन्य, दोष. ६ अलोलुपत्व. दोन्ही प्रतींत ‘ अलोंलुत्व ’ च आहे. ७ फाजिलरूप. ८ लज्जा, विनय. ९ पराङ्मुख. १०अर्पण. ११ आपलेआपण.

मी देह या मळें होता गांदला । तो श्रीगुरुचरणस्पर्शें शुद्ध जाला । अंतरीं आत्मज्ञानें प्रक्षालिला । शुचित्व तें हें सहजस्थिति ॥ ८४ ॥ ब्रह्मैक्यबोधें समसमान । माझें तुझें आपला आपण । तेथें द्वेषी कोणासी कोण । अद्रोहता सहजस्थिति ॥ ८५ ॥ अणुपासूनि आब्रह्मपर्यंत । निरसूनि थोर लाहान समस्त । स्वानुभवदिनकरीं उर्वरीतें । अमान्यता हे सहजस्थिति ॥ ८६ ॥ असो ज्ञानलक्षणें संपूर्ण सांगतां । ना कळती तें मज सर्वथैव तत्वता । जरि श्रीगुरुकृपासामर्थ्य येईल हाता । तरि बोलिजेल सहजस्थिति ॥ ८७ ॥ पूर्वी कित्तेक सांगितली ज्ञानस्थिति । सकळ लक्षणेसीं यथानिर्गुति । पूर्णपणें विज्ञानाचिया संवित्ति । स्वानुभवदिनकरीं ॥ ८८ ॥ त्यावरी अठरा इयें ज्ञानलक्षणें । यानंतर सवीस दैवी संपति गुणें । संकळित बोलिलीं होतीं श्रीकृष्णें । तें साकल्य स्वानुभवदिनकरीं ॥ ८९ ॥ असो यानंतर पुढलिये कीर्णी । सांगिजेल पंचभूतांची उभारणी । दिनकर रामींरामदासमुखें आकर्णी । पंचभूतांचीं स्वरूपें ॥ ९० ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये चतुर्दश कळापे विज्ञानास्थितिलक्षण निरूपणं नाम द्वितीय कीर्ण प्रकाशः॥२

---

॥ श्रीराम ॥

ब्रह्म निश्चळ निर्गुण निर्विकार । तेथें माया निर्माण जैसा गगनीं समीर । मग पुर्वानुक्रमें मूळमाया साचार । जगद्रुप प्रसवली ॥ १ ॥ पाहातां मूळमायेचा स्वरूपानुभव । अर्द्धमात्रात्मक ध्वनी स्वयमेव । तयेचे चि अर्द्धांगीं विलसे प्रणव । ॐकार सर्वेश्वर ॥ २ ॥ त्यासी च शुद्धसत्व बोलिजे । अर्द्धमात्रा ते इच्छाशक्ति सहजें । अर्द्धनारीनटेश्वरत्व निफजे । दोंहिंविण येकांगीं ॥ ३ ॥ त्यांची येकपणें चि वेगळीक । सांगतां वाटे अति कौतुक । जेवि नभ आणि निळीमा पृथक । कीं सूर्य आणि प्रभा ॥ ४ ॥ कीं जेवि चंद्र आणि चंद्रकळा । कीं वेगळीक पुष्पा आणि

---

१ अज्ञानानें. २ त्रासला. ३ धुवून स्वच्छ झाला. ४ अवशिष्ट. ५ निभ्रांत, यथार्थ.

परिमळा । अथवा रत्न आणि रत्नकीळा । वेगळीक जितुली ॥ ५ ॥ तेवि हे प्रकृतिपुरुषें । वेगळेपणें चि येकवशें । जगड्विाळ व्याली असमसाहासें । कुमारत्व न मुकतां ॥ ६ ॥ प्रथम प्रकृतीसी पुरुषें । इछा अवलोकिलें संतोषें । तेथ तीनें पांच पोरें यथावकाशें । निर्माण जालीं ॥ ७ ॥ तेथें च्यार पुरुष तीन नपुंसकें । येक स्त्री मिळोनि येक अष्टकें । निर्माण जालीं गुणाधिकें । येकापरिस येक विख्यात ॥ ८ ॥ त्यांत पहिलें आधीं जालें नपुंसक । तें अगुणी च परि दिसे गुणाधीक । मग तें निशब्दीं शब्दाचें कौतुक । बोलतें जालें निजांगें ॥ ९ ॥ तें अकस्मात निजांगें शब्द बोलिलें । मुंकेपणें दोघांसी तेणें वाहिलें । तवं ते स्पर्शगुणें येऊनि झगटलें । सत्वगुणेंसी वायुस्वरूप ॥ १० ॥ तें दोघें जणें होतां ऐक्यस्वरूप । तेथें अकस्मात प्रगटलें रूप । मग रजोगुणेंसी तेजाचा साक्षप । करितीं जालीं निजांगें ॥ ११ ॥ ऐसीं पांच जणें गुळमुळूं लागलीं । तेणें सारद्रता रस रूपेंसी प्रगटली । तेथ तमोगुणीं उदकासीं ऐक्यत्वा आलीं । सात ही जणें पृथकत्वें ॥ १२ ॥ तें सात ही मिळोनी जालीं गाढ । तेथें गंधरूपें निजगंधी उठिली दृढ । तेणें आठां गुणेंसीं बांधोनि मढें । निजांगें पृथ्वी उभारली ॥ १३ ॥ असो ऐसीं जें कां प्रकृतिपुरुषें । येक असोनि वेगळीं इछावशें । पुढें जालीं तें ही आपुलीया संतोषें । ऐक्यत्वें भिन्न वर्तती ॥ १४ ॥ तैसीं च त्रिगुण आणि पंचभूतें । भिन्नता ची वर्तती ऐक्यत्वें । कोण्या प्रकारें तें यथासंकेतें । रूप करूनि दाऊं ॥ १५ ॥ मुळीं शब्दरूपें वायु गगनीं । प्रगटला तो द्विधा होऊनि । शुद्ध शबळ भागें वर्त्तोनी । भिन्नत्वेंचि ऐक्यता ॥ १६ ॥ शुद्धभागें जाला सत्वगुण । शबळभागें तो प्रभंजन । पुढें परस्परें कार्यकारण । करिते जाले रचना ॥ १७ ॥ सत्वगुणीं निजांगीं ज्ञानशक्ति । प्रसवती जाली पंचधा व्यक्ती । अंतःकर्ण मन बुद्धि चित्त अहंकारानुवृति । अति सूक्ष्मरूपें ॥ १८ ॥ पुढें शबळभागें जो कां वायु । तो शब्दस्पर्शाचा

१ त्रिगुण. २ पंच भूतें. ३ कळी, अंकुर. ४ शबल, अशुद्ध, मिश्रित.

धरूनि सावायु । प्रसवता जाला अन्वयु । शुद्धशबळभागेंसीं ॥ १९ ॥ शुद्धभागें जाला रजोगुण । शबळभागें निर्माण दहन । तो रजोगुण क्रिया शक्तीसीं अभिन्न । पंधरा तत्वें जानिला ॥ २० ॥ निजांगीं वायूचा गुण अति चंचळ । तेणें प्राणपंचक व्याला बहुळ । व्यान समान उदान प्राण अपान केवळ । पंचधा वायु बोलिजे ॥ २१ ॥ निजांगीं तेजाचें ज्ञानेंद्रियपंचक । श्रोत्र त्वचा चक्षु जिन्हा घ्राण सम्यक । वाचा पाणि पाद शिस्न गुद हें निष्टंक । कर्मेंद्रियपंचक दिल्हें उदकासी ॥ २२ ॥ येवं वायुपासूनि जाला जो शुद्धभाग । तो रजोगुण जाणिजे अव्यंग । शबळभागें तेजतत्व सुरंग । वायुजनित पैं ॥ २३ ॥ त्या तेजीं शुद्ध-भागें जाला तमोगुण । शबळभागेंसीं बोलिजे जीवन । तमोगुण द्रव्य-शक्तीसीं अभिन्न । पंचधा गुणें प्रसवला ॥ २४ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध । शुद्धभागें तमोगुण पंचविध । शबळभागें उदक जें प्रसिद्ध । तें पृथ्वीसी व्यालें पंचगुणेंसीं ॥ २५ ॥ ते पृथ्वीचे ठाईं पांच ही गुण । स्वनिर्मित देतसे तमोगुण । एवं पांच आणि तीन मिळोन । व्यालीं पंचविसांसी ॥ २६ ॥ परि मुळींचीं खरीं पांच आणि तीन । वेगळे-पणें असती अभिन्न । त्यांत सत्वरजतम हे त्रिगुण । वेगळेंपणें भासती ॥ २७ ॥ यांची त्रिविध लक्षणी वोळखण । पुढें सांगिजेल परिछिन्न । प्रस्तुत पंचभूतांची साकल्य ऊणखूण । सलक्षणेंसीं दाऊं ॥ २८ ॥ तरि आकाश वायु तेज आप पृथ्वी । येक येक भूतीं पांच पांच जाणावीं । व्यापकपणें देखिलीं आघवीं । परस्परानुमेळेंसीं ॥ २९ ॥ ऐसें सद्गुरुस्वामि बोलती जवं । सविस्मयें शिष्य हांसे तवं । ह्मणे जी स्वामी काय हें अपूर्व । ऐकिलें अकस्मात ॥ ३० ॥ जे येक येक भूत पंचभूतीं व्यापलें । हें स्वामि अपूर्व वाक्य बोलिले । आकाश दिसे निर्गुण संचलें । तेथें पंचभूतें तें कैसीं ॥ ३१ ॥ आकाशीं आकाश असे संचलें । तेथें वायुतेजासी कैसें देखिलें । आणि उदकपृ-

---

१ सावा. २ बहुत.

थ्वीसी केंवि जाय पाहिलें। तये निर्गुण आकाशीं ॥ ३२ ॥ तैसें च वायूचे ठाइं पृथ्वी तेज उदक। कैसें पाहावें किमात्मक। तेज पृथ्वी उदक दाहक। तेथ तें केंवि जाणावीं ॥ ३३ ॥ तैसें चि उदकीं तेज कोठें पाहावें। आणि वायुपृथ्वीसी कैसें जाणावें। हें येरांमाजीं वोळखावें। कवणे रिति जी ॥ ३४ ॥ ऐसा शिष्यहृदयवनाआंत। प्रवेशला संदेह-चतुर्दंत। तो स्वानंदपुष्पलता विध्वंसित। अविवेकशुंडा ॥ ३५॥ अविचारेंसीं करी रंवंदळी। आला जवं हृत्कमळसरोवराजवळी। तवं अकस्मात प्रबोधपं-चाननें आरोळीं। दिधली परमावेशें ॥ ३६॥ लाहोनि गुरुकृपाबळसावावो। विवेकउड्डाणें घातला आवो। विचारचवडा उभारूनि पाहा हो। अति सत्राणें धांविनला ॥ ३७॥ तया प्रबोधसिंहाची ऐकतां चि हाक। संदेहमत्तगजें घेतला धाक। थरथरां कांपतसे साशंक। तवं थोर जाला नवलावो ॥ ३८॥ होय नव्हेसें गजकुंभद्वयनिकट। त्यांवरी येऊनि बैसला बोधसिंह चपेट। सारासारविचारेंसिं नखें तिखट। तेंहीं कुंभद्वय विदारिलें ॥ ३९ ॥ आंतुनि प्रष्णमुक्तावळी काढिली। ते बोधसिंहें निजकंठीं घातली। संदेहगजाची पटधुळी केली। क्षणमात्रें निसंदेहता ॥ ४० ॥ तेणें शिष्यहृदयवनीं जाला आराम। स्वानंदासी सुख जालें अविश्रम। तें चि नित्य भोगिजे निज निःसीम। स्वानुभवदिनकरीं ॥ ४१॥ असो श्रीगुरु ह्मणतिलें शिष्यासी। तुंवां धरिलें अंतरीं संदेहासी। तरि आतां सदृढ होऊनि मानसीं। सारासारविचारें ॥ ४२ ॥ अंतःकर्ण करूनियां निश्चळ। क्षणेक होईं पां तूं निवळ। वृत्तीसी तर्कीचा दृढ देऊनि ढाळ। बुद्धि बोधेंसीं येकवटों दे ॥ ४३ ॥ तरि यांचे ठांइं असति गुण। सहज स्वभावेंसि परिछिन्न। त्यांची करूनि घेइं वोळखण। ह्मणिजे समजसी आपैसें ॥ ४४॥ आकाश घन आणि पोकळ। दों गुणीं वोळखिजे केवळ। तैसा चि वायु निबीड आणि चंचळ। दों गुणीं विलासला ॥ ४५॥ तेज दृश्य आणि तेजाळ। उदक मृद आणि पातळ। जड आणि कठिण हें

---

१ ऐरावत. २ सिंह. ३ अधिकता, साह्य. ४ डौल. ५ बलानें, वेगानें. ६ पद्मधूळ, दाणादाण.

केवळ । पृथ्वी विलसे दों गुणीं ॥ ४६ ॥ येक येका भूतीं दोनि दोनि गुण । शुद्धशबळभागें परिछिन्न । यांची धरीं पां तूं वोळखण । समजावयासी ॥ ४७ ॥ येथें सुक्षम दृष्टी करूनि समज । चंचळतेचें नाहीं काज । समजतां समजतां निज । पावसी सहजें ॥ ४८ ॥ असो आकाशीं आकाश असे सहजें चि । वायु हि स्तब्धरूपें तैसा तितुकाची । आकाशीं उभारणी तेजाची । करूनी दाऊं सहजें ॥ ४९ ॥ तरि अवकाशरूपें जो भासला भास । तें चि दृश्यत्वें तेज साभास । मृदत्वें गमलें जें आकाश । तें चि उदक जाणिजे ॥ ५० ॥ आकाश बोलिजे सघन । शून्यासारिखें संपूर्ण । शून्याभासें भासलें जडपण । तेचि गगनीं पृथिवी ॥५१॥ येवं आकाशीं पंचभूतें । तें या प्रकारें जाण निरुतें । आतां वायूचे ठाईं कैसीं असती तें । सविस्तर दाऊं ॥ ५२ ॥ तरि वायूसी अंतर्बाह्य आकाश । व्यापकपणें असे सावकाश । वायु निजांगीं स्वयंप्रकाश । मूर्त्तिमंत तो चि असे ॥ ५३ ॥ वायु चंचळपणें भासला भास । निजांगीं सतेजपणें होतसे स्पर्श । तो चि तेजाचा गुण साभास । दृश्यत्वें जो भासला ॥ ५४ ॥ स्पर्शगुणें भासला जो समीर । तें चि प्रभंजनीं तेज साचार । वायु मृदत्वें जो सीतळ रुचीर । तें चि उदक जाणिजे ॥५५॥ वायु हळु तऱ्हीं परम निबिड । भारीपणें तत्काळ मोडे झाड । त्या जडपणीं जाणिजे सदृढ । वायुमाजी पृथिवी ॥ ५६ ॥ एवं वायूचे हि ठाईं पंचभूतें । देखिलीं परिछिन्न साळंकृतें । आतां तेजीं पंचभूत स्पष्ट तें । करूनि दाऊं आद्यंत ॥५७॥ तेजीं अवकाशरूपें आकाश । देखिजतसे सहजें सविशेष । तेजीं चंचळपणेंसिं वायूस । सहजें देखिजेत ॥ ५८ ॥ तेजीं तेज तरि मूर्त्तिमंत । तें असे प्रत्यक्षचि सिद्ध स्वत । आतां तेज मृदत्वें जें दिसत । तें चि तेजीं उदक असे ॥ ५९ ॥ तवं शिष्यें घेतली आशंका । ह्मणे स्वामी येथ संदेह गमला निका । जी तेजीं मृदत्व लावितां कां । नसतें चि कोठुनी ॥ ६० ॥ तेजीं धगधगीत निघती ज्वाळा । देदिप्यमान अति उष्णकळा । दहदहमान

---

१ खरें.

क्षणमात्रें भूगोळा । जाळूं पाहे निजांशें ॥ ६१ ॥ तेथें मृदत्व जी कैचें काइसेनि । आणी तुह्मीं सांगतां तें सीतळ ह्मणौनि । तरि ये गोष्टीची उपलवणी । करूनि दिधली पाहिजे ॥ ६२ ॥ तवं श्रीगुरु ह्मणती बापा सावध । असतां कां वेडा होसी स्तब्ध । येक चि तेज परि असे विविध । बहुतां प्रकारें ॥ ६३ ॥ अरे परब्रह्म स्वयंप्रकाश सोज्वळ । अस्तोदयरहित उष्ण ना सीतळ । मां तैसें चि आणीक पाहेन निर्मळ । तरि कांहीं आहे कीं काय ॥ ६४ ॥ सूर्यतेज उष्ण धगधगीत । आणि तेथें नित्य अस्तोदय होत । अग्नीचें ही तेज तैसें भासत । परि तें विझे तत्काळ ॥ ६५ ॥ चंद्राचें तेज परम सीतळ । मृद मवाळ सुखकर निर्मळ । नाना नक्षत्रांचें ही तेज केवळ । मृदत्वें चंद्रा ऐसें ॥६६॥ तरि तिंहीं ठाईं येक चि तेज । परि गुणवैषम्यें वेगळी दिसे वोज । तेज ह्मणतां सगट सारिखें भोज । कैसेनि होईल पैं ॥६७॥ हिरा आदिकरूनि रत्नें सकळ । त्याजहीवरि तेज असे सुढाळ । मां अवघें येक चि ह्मणतां केवळ । शाहाणा कीं मूर्ख होसी ॥ ६८ ॥ शस्त्रांतील हि अति निर्मळ पाणी । तें तृषाक्रांतासी देईजे काय आणुनी । तरि हे बापा समजावयाची बुझावणी । काय स्थूळदृष्टि देखिजे ॥ ६९ ॥ मोतियांतील ही पाणी सुढाळ । त्याची शुक्राऐसी दिसे झळाळ । मां तें आणि शुक्र येक ह्मणतां केवळ । मूर्ख कीं शाहाणा तो ॥ ७० ॥ जेव्हां सूक्ष्मत्वें भूतें निर्माण । प्रथम जालीं अति गहन । तेथें सूर्य चंद्र शीत उष्ण । हें कैंचें आणिजे पैं ॥ ७१ ॥ कैंची नवलक्ष तारांगणें । कैंचा अग्नि आणि नवरत्नें । परंतु हें समजावयासी उभीं करणें । येऱ्हवीं हें मुळीं कैंचीं ॥ ७२ ॥ तुझी सूक्ष्म दृष्टि न पावे ह्मणौन । नाना सायासें उद्ग्राह कारण । तेथ तुवां पुसिलें तेजीं मृदत्व कैसेन । यतांनिमित्य बोलणें पडिलें ॥ ७३ ॥ असो तेजीं मृदत्वें भासला भास । तें चि उदक तेजीं सारद्रांश । आतां दृश्यत्वें

१ वर्णना. २ सप्रमाण प्रत्युत्तर.

देखिजे रूपआभास। ते चि पृथ्वी जडत्वें ॥ ७४ ॥ येवं तेजीं परिछिन्न भूतपंचक । तुज कळों देईं पां सम्यक । आतां उदकीं पंचभूतें पृथक। कैसीं असतीं तें दाऊं ॥ ७५ ॥ उदकीं आकाश अवकाशरूपें । उदकीं वायु चंचळस्वरूपें । स्वरूपाभासेंसीं तेज साक्षपें। उदकीं स्वतसिद्ध देखिजे ॥ ७६ ॥ उदकीं उदक सहजें चि। जडपणें पृथ्वी हि विलसे साची। एवं उदकीं पंचभूतांची। उभारणी ते ऐसी ॥ ७७ ॥ आतां पृथ्वीचे ठाईं आकाश। अवकाशरूप सावकाश। निरोधरूपें तया वायूस। राहाणें पृथ्वीचां ठाईं ॥ ७८ ॥ पृथ्वीचे ठाईं दृश्याभासें तेज। मृदत्वें उदक असे सहज। पृथ्वीचे ठाईं गंधरूपें निज। पृथ्वी असे स्वतसिद्ध ॥७९॥ एवं पंचभूतें पंचभूतीं। परस्परीं वेष्टूनि आद्यंतीं । सृष्टिक्रम सहजस्थिति । गुणभूतसंगें होतसे ॥ ८० ॥ आतां आकाशीं सछिद्रता हा चि धर्म। आकाशीं अवकाशत्व हें कर्म। आकाश कृष्णवर्ण निःसीम। शब्दगुण मुख्यत्वें ॥ ८१ ॥ आकाशीं आहार असे शब्दाचा। तैसा चि स्वाद कडवट असे साचा। आकाशीं शस्त्रामाजीं बाणाचा। शब्द उमटे ॥८२॥ आकाशीं अंतःकर्ण घर व्यान घोडें। श्रोत्र प्रवेशद्वार निर्गम वाचाद्वारें उंबडे। शब्दविषयेंसीं जाणिजे उघडें[1]। आद्यंत आकाश ॥ ८३ ॥ आतां वायूचे ठाईं चांचल्य धर्म। स्पर्श गुण वाहनादि कर्म। नीळ वर्ण आहार परिमळ स्वाद निभ्रम। अंबीळ आणि शस्त्र खड्ग ॥ ८४ ॥ मन घर समान घोडें त्वचा प्रवेशद्वार। हस्त निर्गमद्वार स्पर्श विषय साचार। येवं आद्यंत वायूचा प्रकार। सांगितला यथानिगुति ॥ ८५ ॥ तेजाचा उष्णता स्वधर्म दहन स्वकर्म। रूप गुण आरक्त वर्ण दृश्याहार निभ्रम। तिखट स्वाद भाला शस्त्र दुर्गम। बुद्धि घर उदान घोडें ॥ ८६ ॥ चक्षु प्रवेश पदें निर्गम। रूपविषयाचा संभ्रम। एवं तेजाचें स्वधर्मकर्म। सांगितलें यथानिगुति ॥ ८७ ॥ आतां उदकाचा द्रवत्व स्वधर्म। क्लेदनादि कर्म रूप

१ उपडें, पालथें.

गुण निसीम । श्वेतवर्ण रेत आहार निभ्रम । मधुर स्वाद शस्त्र सुरी ते ॥ ८८ ॥ चित्त घर प्राण वहन जिव्हा प्रवेश । शिस्न निर्गमद्वार विषय रस । एवं उदकाचिया स्वधर्मकर्मास । सांगितलें आद्यंत ॥ ८९ ॥ आतां पृथ्वीचा कठीणत्व हा चि धर्म । गंध गुण धारणादि कर्म । पीतवर्ण षड्रस आहार निभ्रम । क्षार स्वाद शस्त्र फरश ॥ ९० ॥ अहंकार घर अपान वहन । घ्राणें प्रवेश गुदीं निर्गमन । गंध विषय येवं आद्यंत मिळोन । पृथ्वी स्वधर्मकर्मेंसीं ॥ ९१ ॥ येवं पंचभूतांचे स्वधर्मकर्म । परस्परानुप्रवेशक्रम । सांगितला प्रकृतिपुरुषेंसीं उद्गम । स्वानुभवदिनकरीं ॥ ९२ ॥ आतां त्रिगुणांचीं स्वभावकर्मे । पुढीलिये कीर्णी स्ववर्मे । दिनकररामीरामदासीं संभ्रमें । निरोपिलीं यथान्वयें ॥९३॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये चतुर्दश कळापे पंचभूतपरस्परानुक्रमधर्मकर्मकथन निरूपणं नाम तृतीय कीर्ण प्रकाशः ॥ ३ ॥ राम ॥

---

॥ श्रीराम ॥

ऐकोनि पंचभूतांचें नाम रूप गुण कर्म । शिष्य सर्वांगें सुखावोनि परम । ह्मणे स्वामी त्रिगुणाचें कैसें वर्म । तें सांगितलें पाहिजे ॥ १ ॥ यांची समजली[1] निर्माण होती कळा । हे असती पंचभूतां जवळा । नामरूपकर्माचा जिव्हाळा । तदंगें चि यांचा दिसे ॥ २ ॥ परंतु बाह्य क्रियेचें आचरण । त्याची कैसी जाणावी वोळखण । आणि सृष्टीमाजीं कार्यकारण । तें यांचेनि कैसें जी ॥ ३ ॥ काय हे पिंडब्रह्मांडीं व्यापले । कीं हे येकदेशी असती संचले । यांचें कर्म धर्म आचरण विहिलें[2] । मज सांगितलें पाहिजे ॥ ४ ॥ इतुकी आइकोनि शिष्यविनति । स्वामी सर्वांगें संतोषले चित्तीं । ह्मणती तुवां जे पुसिली गुणसंभूति । ते यथाक्रमें सांगिजेल ॥ ५ ॥ तरि त्रिगुणा आणि पंचभूतांचें । वोतलें शरीर प्रकृतिपुरुषाचें । तेथूनि ऐलिकडे प्राणिमात्राचें । शरीर येहीं व्यापिलें ॥ ६ ॥ ब्रह्मा आदिकरूनि हरि हर । हे हि त्रिगुणपंचभौतिक साचार ।

---

१ त्रिगुणांची उत्पत्ति कशापासून आहे हें कळलें. २ वहिलें=सत्वर.

इंद्र सूर्य चंद्र देव ऋषीतरें[१]। त्रिगुणपंचभौतिक ॥ ७ ॥ जितुकें कांहीं आकारासी आलें । तितुकें आधीं च येहीं व्यापिलें । सचराचर अवघें भरलें । यांचेनि गुणकर्मेंसीं ॥ ८ ॥ च्यारी खाणी च्यारी देह च्यारी वाणी । तथा चौऱ्यासी लक्ष जीवयोनी । पिंडब्रह्मांडात्मक सकळ उभारणी । यांची च दिसतसे पैं ॥ ९ ॥ अणुरेणापासूनि सर्वेश्वरपर्यंत । हे चि सगुणत्वें वर्तती आद्यंत । सकळ कांहीं जें होत जात । तें यांचेन चि कीं ॥ १० ॥ हे ऐक्यतेसीं वर्तती भिन्नता । तें साकल्य सांगिजेल त्रिविधता[२]। निजावधानीं अव्यग्रता[३]। श्रोतीं असिलें पाहिजे ॥ ११ ॥ मुळीं प्रकृति पांचां आणि तींची । त्यांमाजीं चाळकसत्ता आत्मयाची । सत्तायोगें शरीरमात्राची । उत्पत्ति स्थिति प्रळय ॥ १२ ॥ यांचियायोगें आत्मयासी । सुख भोगणें अहिर्निशीं । चाळक पाळक पोषणेंसीं । परस्परानुयोगें ॥ १३ ॥ आत्मसत्ता जे असे शरीरीं चाळक । त्यासी अज्ञानयोगें बोलिजे जीव नामक । ज्ञानविचारें तो चि शिव निष्टंक । नामरूपकर्मेंसीं ॥ १४ ॥ जेवि कां दरिद्री रंकपणें । घरोवरीं हिंडत होता भिक्षेकारणें । तवं प्राक्तनयोगें अकस्मात लाधणें । जालें सार्वभौमपद प्राप्त ॥ १५ ॥ मग त्यासी नामरूपकर्मेंसीं । कोण पाचारी रंकपणेंसीं । तो सर्वमान्य जाला दिग्मंडळासी । श्रेष्ठत्वें तो जगद्वंद्य ॥ १६ ॥ असो सांगायासी हें चि कारण । आत्मयासी प्रकृतिसंगें ये जीवपण । ते चि प्रकृतिनिरासें ब्रह्म पूर्ण । स्वसंवेद्य शुद्धत्वें ॥ १७ ॥ परंतु त्रिगुणसंगें आत्मयासी । बद्धमुक्तता होय निश्चयेंसीं । त्यांत दोनी बद्धक येक मुक्त करावयासी । सामर्थ्य धरी निजांगें ॥ १८ ॥ तेथ मुक्त करावयासी सामर्थ्यवंत । तो येक सत्वगुण चि असे विख्यात । येर दोवे बद्धक असती सतंत । रजोगुण तमोगुण हे ॥ १९ ॥ त्यांत प्रथम सत्वगुणाची उपलवर्णी[४]।

१ मूळच्या व चाफळ प्रतींत 'ऋषीतर' असें च आहे. कदाचित् 'षी' पुढें 'पि' अक्षर गळालें असावें; किंवा ऋषि + इतर=ऋषीतर असें असावें. २ त्रिगुण आणि पंचभूतें हीं वास्तवीक एकत्र असून स्वतंत्रपणानें कर्में करतात. ३ एकाग्र चित्त. ४ वर्णना.

सांगिजेल यथासांगत्वें कार्यकारणी । पुढें अनुक्रमें उरले येर दोनी । ते सांगिजतील यथान्वयें ॥ २० ॥ सत्वगुण प्रकाशवंत निर्मळ । सुखकारक ज्ञानदानी केवळ । सद्विद्याविलास होय प्रबळ । सत्वगुणाधिकतेनें ॥ २१ ॥ सत्वगुणें ज्ञान होय अधिक । देव धर्म तीर्थ व्रत पुण्यश्लोक । वेदशास्त्र पुराणचर्चा सम्यक । न्यायनीतिमर्यादेसीं ॥ २२ ॥ सत्वगुणें घडे उत्तमपदप्राप्ति । सत्कर्मधर्मी प्रवर्ते मति । स्वाहास्वधादि नाना यज्ञसंभूति । तप दान विहिताचरण ॥ २३ ॥ सत्वगुणें जो सात्विक प्राणी । त्याचा आहार सौम्य सर्वा गुणीं । सुरस सारद्र मधुर भक्षणीं । अत्यंत प्रीति जयासी ॥ २४ ॥ ज्या आहारें आयुष्यवृद्धि होय । आधि[1] व्याधि[2] नाना रोगांचा क्षय । होऊनि बुद्धि प्रज्ञा बळ वेलीं जाय[3] । सात्विका मतीसीं ॥ २५ ॥ ज्ञान होय असाधारण । विवेक वैराग्य वाढे गहन । पुष्टि तुष्टि सौभाग्यसंपन्न । सात्विकां लक्षणीं ॥ २६ ॥ तरि तो सात्विक आहार कोणे प्रकारीचा । प्रथम सांगिजेल सुलक्षण साचा । तेथ पंचविध प्रकारें अन्नाचा । उपक्रम दाऊं संक्षेपें ॥ २७ ॥ लेह्य पेह्य चोष्य खाद्य भक्ष्य । पांचां प्रकारें अन्नाची साक्ष । पांचां आंगुळीं भक्षावें तें भक्ष्य । चौं बोटीं खाद्य जाणिजे ॥ २८ ॥ चोष्य बोलिजे तीं बोटेंसीं । पेह्य आंजुळी कां अन्य पात्रेसीं । लेह्य ह्मणिजे दुरूनि टाकणें अंतरेंसीं[4] । मुख हस्त असतां ॥ २९ ॥ यांत उत्तम सुरस आणि मधुर । रहितकट्वाम्लतिक्षणक्षार । आणि तें यथायुक्तीनें साचार । भक्षणें सत्वगुणाचें ॥ ३० ॥ असो यानंतर सात्विक यज्ञ । सांगिजेल यथान्वयें सुयज्ञ । विहिताचरणें आइकोनि सूज्ञ । तदनुसार वर्त्तती ॥ ३१ ॥ तरी श्रौतस्मार्तादि नित्य यज्ञ । अग्निष्टोमादि नैमित्य यज्ञ । अश्वमेधादि काम्य यज्ञ । आचरिजे यथोक्त ॥ ३२ ॥ परी फळास्थारहित कर्म करणें । अकांक्ष[5] यज्ञ-

---

१ मनोव्यथा. २ शरीरव्यथा. ३ वेलीं जाय=वाढ होईल, वेलाप्रमाणें फोफावत जाईल. ४ अंतर्मुखांत. ५ निरिच्छपणानें.

विधि आचरणें । काया वाचा आणि अंतःकरणें । समाधानपूर्वक ॥ ३३ ॥ तैसें चि सत्वगुणाचें तपाचरण । काया वाचा इंद्रियें आणि मन । अष्टांगेंसीं प्राणायाम संयमून । देव ब्राह्मण पूजिजे ॥ ३४ ॥ श्रीगुरु कां संत महंत । यांचें पूजन करणें यथोक्त । सर्वेंसीं आर्जव शौचाचार विहित । ब्रह्मचर्य सदैव ॥ ३५ ॥ आणि जें जें करणें तें अहिंसक । या नांव तप बोलिजे काइक । आतां अनुद्वेगपर[1] वाक्य तें वाचिक । परहितकर्तें जें ॥३६॥ बोलणें तें हि अति सत्य । जेणें सहज घडे महत्कृत्य । आणि वेदाध्ययन करणें नित्य । कां रामनामजप ॥३७॥ तैसें चि मन ज्याचें सदा प्रसन्नरूप । आत्मनिग्रहीं[2] अति साक्षेप । निजभावशुद्धीसीं मानसिक तप । सत्वगुणी[3] विलसे ॥ ३८ ॥ एवं काइक वाचिक हो मानस तप । जें करणें तें श्रद्धानुरूप । फळास्थाकांक्षारहित साक्षप । केला चि करणें ॥ ३९ ॥ तैसें चि दान हि देणें जें यथानुशक्ति । तें प्रत्युपकारफळास्थारहिती । देश काळ पात्र पाहोनि शास्त्रयुक्ति । स्वधर्मानुसार ॥ ४० ॥ देश पाहोनि अति पुण्यभाजन[4] । काशी कुरुक्षेत्र कां गंगाभागीरथीकृष्णास्नान । ज्योतिर्लिंग कां विष्णुप्रतिमादर्शन । काळविश्ववादि[5] मन्वतिथि ॥ ४१ ॥ चंद्र सूर्य ग्रहण कां पार्वणें[6] । व्यतिपात कन्यागत कां सिंहस्थागमन । तैसें चि उत्तम सत्पात्र योग्य पाहोन । यथाविधि दान सात्विक तें ॥ ४२ ॥ आतां सात्विक त्यागाचें लक्षण । करूनियां विध्युक्त सत्कर्माचरण । फळास्थेसीं संगत्याग करून । संशयरहित अंतरीं ॥ ४३ ॥ कर्मकुशळाकुशळीं[7] संतोष द्वेष । करणें नाहीं देहाहूनि विशेष । कर्माचा फळत्याग करणें सावकाश । हा सात्विक त्याग बोलिजे ॥४४॥ आतां सात्विक ज्ञान तें किमात्मक । तरि प्राणिमात्रीं अंतर्भावना येक । अवयवत्वें येकात्मता निष्टंकें[8] । आब्रह्मअणुरेणांत ॥ ४५ ॥ तैसें चि

१ शांत, संतोषवृत्तिपर. २ नेहमीं आत्मसंयमन करण्याचा प्रयत्न करणें. ३ हें मानासिक तपाचें विशेषण. ४ पुण्यपात्र. ५ विश्व=दहा प्रकारचीं दैवतें आहेत, त्यांपैकीं 'काल' हें एक आहे. ६ पार्वणी, पर्वणी. ७ बऱ्या वाईट कर्माबद्दल. ८ निश्चयेंकरून.

सात्विक कर्म संगरहित । कामक्रोधलोभविवर्जित । यथाशास्त्रें कांक्षा फळास्था करूनि त्यक्त । नित्य नैमित्य कर्म करणें ॥ ४६ ॥ आतां कर्मकर्ता जो कां सात्विक । तो मुक्तसंग अनहंकारी धैर्य सुखकारक । सिद्धिअसिद्धींसीं समत्वें निश्शंक । उत्साहयुक्त सदा ॥ ४७ ॥ तैसी चि सात्विक जे कां बुद्धि । तयेसी प्रवृत्तिनिवृत्तीसीं कार्याकार्य शुद्धि । जाणोनि बंधरहित मोक्षाची सिद्धि । करूनि घेणें निश्चयें ॥ ४८ ॥ आतां सात्विक धैर्य अव्यभिचारी । मन प्राण इंद्रियांचिया उर्जेरी । अष्टांग योगसाधन कां आत्मसाक्षात्कारीं । प्रवर्त्ते ते सात्विक धृति ॥ ४९ ॥ आतां सात्विक जें कां सुख । तें आत्मसाक्षात्कारीं अमृतोपम सम्यक । जेवि निंब जिव्हे कडु परी सर्वांगीं सुख । तेवि सात्विक सौख्य जाणिजे ॥ ५० ॥ एवं सत्वगुण सांगितला आद्यंत । आतां रजोगुण सांगिजेल संकाळित । श्रोतीं अत्यादरें दत्तचित्त । त्यागार्थ श्रवण करावें ॥ ५१ ॥ या रजोगुणाचा सांगतां विलास । ब्रह्मादिक मानिती त्रास । ज्याचा आयास असमसाहास । मर्यादेवेगळा ॥ ५२ ॥ काम क्रोध आणि लोभ । हे रजोगुणाचे सांगाती स्वयंभ । तृष्णेवासनेचा कोंभ । रजोगुण मूर्त्तिमंत ॥ ५३ ॥ रजोगुणाची जालियां वृद्धि । आशापाश तत्काळ बाधी । नाना संसाराचिया आधि । या रजोगुणाकरितां ॥ ५४ ॥ रजोगुणी प्राणियासी । पाविजेना उत्तम गतीसी । नाना कर्मबंधाचे पाशीं । तत्काळ पडे रजोगुण ॥ ५५ ॥ रजोगुणाचें क्षुद्र दैवतीं भजन । फळास्थेसाठीं कर्म कारण । दैवतीं नानाविध पूजन । कामनापरत्वें ॥ ५६ ॥ तीर्थव्रतदेवधर्मीं अनास्था । कामफळप्राप्तीची परम आस्था । प्रपंचाची परोपरीं करी संस्था । देहगेहदाराधनपुत्रीं ॥५७॥ ज्यासी आहार भक्षणें अति कठीण । कट्वाम्ल क्षार तुरट तिक्षण । जळत करपलें अत्यंत उष्ण । जें दुःखशोकामयप्रद ॥ ५८ ॥ असो

---

१ यशापयशाच्या ठिकाणीं. २ स्वस्थता, उत्कर्ष. ३ धैर्य. ४ खटाटोप. ५ अनिवार. ६ सोबती. ७ अंकुर. ८ आमय=रोग. ज्या आहारामुळें दुःख, शोक व रोग हे उत्पन्न होतील.

रजोगुणी प्राणियासी । करणें चि नाहीं तपपुरश्चरणासी । तथापि केलें तरी अति सत्कारेसीं । पूजामानार्थ आरंभीं ॥ ५९ ॥ धरूनियां अंतरीं अवष्टंभ । मांडूनि जीविकार्थ नाना दंभ । चंचळतेसीं करी कार्यारंभ । प्राप्त होतां चि विसर्जन ॥ ६० ॥ अनीश्वरतेसीं तप अध्रुव । करूनि आस्थेची बहुत चि हांव । तें तप जाणिजे स्वयमेव । तया रजोगुणाचें ॥ ६१ ॥ तोंवरि दान तवं देणें चि नाहीं । यद्यपि दिधलें तरी साकांक्ष देहीं । फळास्था धरूनि प्रत्युपकार हि । चित्तीं इच्छी रजोगुण ॥ ६२ ॥ जरि कांहीं अतितासी देणें पडिलें । तरि जाणों घरींचें कोण्ही गळलें । आणि जरि कोण्ही स्तुतिमिसें वाखाणिलें । तरि त्या देतसे सर्वस्वेंसीं ॥ ६३ ॥ जरि रजोगुणासी यज्ञ करणें पडे । तरि निरपेक्षेचें परम सांकडें । फळप्राप्तीचिया उत्तरोत्तर सुरवाँडें । यज्ञ करणें दंभार्थ ॥ ६४ ॥ फळप्राप्ति देखोनि कर्म सांग । अभावीं निपटूनि कर्मत्याग । किंवा कर्माचें कठिण देखोनि आंग । तें टांकणें येकसरें चि ॥ ६५ ॥ पृथग्भावें रजोगुणी ज्ञान । नाना भावना पृथग्विधान । आणि भूतमात्रीं देखणें वेगळेपण । रजोगुणी ज्ञान तें हें ॥ ६६ ॥ आतां रजोगुणाचें कर्माचरण । अहंकारयुक्त कामना धरून । परम क्लेशें मानूनि सीण । कर्म कर्तव्य रजोगुणी ॥ ६७ ॥ आतां रजोगुणी कर्त्तयासी । कर्त्तव्यकर्म तें फळास्थेसीं । हिंसालुब्धता अशुचि पैसीं । करणें हर्षशोकान्वित ॥ ६८ ॥ तैसी च रजोगुणी चंचळ बुद्धि । न जाणोनि कार्याकार्यसिद्धि । न कळोनि धर्माधर्माची विद्धि । तैसी च धृति हि जाणिजे ॥ ६९ ॥ कामनेनिमित्य धैर्यधारणा । लौकिकासाठीं भाव भावना । फळप्राप्ति जालियां धैर्यावसाना । देणें सोडूनि तत्काळ ॥ ७० ॥ आतां रजोगुणी सुख किमात्मक । तें

१ सभेमध्यें सत्काराचा प्रथमचा मान आपला असावा, आपली प्रथम पूजा व्हावी, हा हेतु धरून तप किंवा पुरश्चरण करावयाचें, ही रजोगुणी माणसाची प्रवृत्ति. २ अहंकार. ३ उदरभरणार्थ. ४ क्षणभंगुर. ५ निवर्तलें. ६ निरपेक्षतेचें= निरिच्छपणाचें, फलेच्छा न धरण्याचें. ७ स्वाधीन होऊन. ८ मुळांत व चाफळप्रतींत अशीं च अक्षरें आहेत; अर्थ कळत नाहीं. ९ विधि या अर्थानें.

सांगिजैल सकौतुक । तरि इंद्रियाचें मुख[1] । विषयसुखें सुखावणें ॥७१॥ आधीं अमृतोपम विषयसुख । परिणामीं सुखाचें चि होय दुःख । ह्मणौनि रजोगुणाचें क्षणभंगुर सुख । परि दुःख होय आकल्प ॥ ७२ ॥ मुख्य रजोगुण चि दुःखमूळ । जैसें मूळ तैसें चि त्यासीं फळ । हें असो आतां तमोगुण सकळ । स्वरूप दाऊं उभारूनि ॥ ७३ ॥ तमोगुण विकल्पाचें भरींव । तमोगुण अनर्थाचें पेंव । नाना दुःखाचा गौरव । तमोगुण देखिला ॥ ७४ ॥ अहंकार बळदर्पेसीं तमोगुण । कामक्रोधाचें यया मांजवण[2] । परिग्रहा[3]चें सरसपण । यया तमोगुणासी ॥७५॥ कामना कल्पना दुष्ट वासना । असूया निंदा तिरस्कार तृष्णा । येहीं तमोगुण बळसत्राणा । सरसावे क्षणामाजीं ॥ ७६ ॥ येथ कदाचित कोण्ही ह्मणेल । ऐसा अनर्थकारी जरि हा असेल । तरि आयकिलियां उपेगां जाईल । काइसेन तन्हि ॥ ७७ ॥ तरि याचें आयकावयाचें प्रयोजन । जे कोण्हीयेकें त्यागावे अवगुण । हा अति अनर्थकारी असे ह्मणौन । सांगणें पडिलें अगत्य ॥ ७८ ॥ अवगुण आइकिलियांवांचून । सहसा न कळती किंलक्षण । ह्मणौनि अवश्यमेव आयकोन । अवगुण त्यागावे ॥ ७९ ॥ तमोगुण अज्ञानाचें कारण । प्रमादां[6]चें केवळ येकायतन । आणि आळस्याचें अधिष्ठान । निद्रा गाढी तमोगुणें ॥ ८० ॥ तमोगुण मोहाचें वसौटें । तमोगुण शोकाचें माजिवटें । तमोगुण नाना भयांचें सांटे । कीं संसारें साजणें ॥ ८१ ॥ तमोगुण निजांगें प्रकाशरहित । अप्रवृत्तिकारक अविद्याभरित । तमोगुणी प्राणियासी होतां अंत । नरकप्राप्ति निश्चयेंसीं ॥८२॥ तमोगुणाचें फळ अज्ञान । तमोगुणासी तत्काळ अधःपतन । सांगतां तमोगुणाचें आहारभक्षण । वीट येईल श्रोतयांसी ॥ ८३ ॥ न सांगतां श्रोते रागासी येती । सांगतां तरि तत्काळ क्षोभती । ऐसी

---

१ द्वारानें. २ उन्मत्त द्रव्य. ३ खालील ओवींत सांगितलेल्या परिवारामुळें. ४ थोर वेगानें. ५ उपयोग होईल. ६ अतिशय मोहाचें, असावधपणाचें. ७ अधिष्ठान. ८ वसतिस्थान. ९ उत्कर्ष. १० साठा, संचय. ११ मैत्री. १२ कर्मांचे ठायीं प्रवृत्ति न ठेवणारा, आळसास उत्तेजन देणारा.

दोहींकडूनि संकटोत्पत्ति । आरंभली असे कीं ॥ ८४ ॥ ऐसियासी करावें काय आतां । ह्मणौनि विचारारूढ जाला वक्ता । तवं श्रोते ह्मणती जी स्वभावता । निरूपण आलें तें बोलिजे ॥ ८५ ॥ इतुकी संतांची आज्ञा होतां । तमोगुणी प्राणियांचा पैं तत्वता । आहार सांगता होय वक्ता । चिळसलेनि चित्तें ॥ ८६ ॥ तें असे षडरसाहूनि वेगळें । सर्व हि विटलेंपणापासूनि आगळें । कुहिजेलियाचें तें सगळें । अंतर चि होय जें ॥ ८७ ॥ ज्यासी हात लावितां वाख निघती । तें क्लेशोनें हि परि न धरवे हातीं । त्याची दुर्गंधी साहों न शकती । श्वान-शुकरादिक हि ॥ ८८ ॥ ऐसें हि वरि किडेनि चुळबुळिलें । वरि मुंगियांनीं हि परिवारिलें । तें भक्षितां तमोगुणी विहिलें । सुख मानी अत्यंत ॥ ८९ ॥ त्याहिवरि पोरांचें उंसिटें । कडु तिखट आंबट कीं खारटें । हें कांहीं तें न विचारूनि करंटें । वरि भक्षित चि असे ॥ ९० ॥ परि तें खाय अत्यंत चि गोडिया । सभंवतीं मेळऊनि स्त्रिया मेहुणिया । गोतांबील कीरतां तमोगुणी प्राणिया । ते मानी अति श्लाध्यता ॥ ९१ ॥ असो आतां तामस नरासी यज्ञ कर्त्तव्य । तें विधिहीन आणि मद्यमांस हर्व्य । कां तें श्रद्धाविरहित अदक्षिण अभाव्य । असृष्टान्नेंसीं ॥ ९२ ॥ तैसें चि तपाचरण हि मूढतेसीं । आत्मशरीरपीडा करूनि प्रयासीं । दुस-ऱ्यासी साधावें प्रयत्नेंसीं । तामसी तपाचरण येवंविध ॥ ९३ ॥ तैसें चि तमोगुणी दान विचाररहित । पात्रापात्र न जाणोनि अकाळोद्यत । दुर्विधिभावना जें द्रव्य सांवित । तें देणें भाट कां वेश्यांसी ॥ ९४ ॥ कर्मकर्तव्याचा चि जेथें पांगं । तेथें काय पैं सांगावा कर्मत्याग । आतां तमोगुणी ज्ञान जें कां अति अव्यंग । तें चि सांगों संकळिती ॥९५॥ जें कां पहिलें चि अति अल्पक । ज्ञानाचा अभाव चि जेथ निष्टंक ।

---

१ अधिक, विलक्षण. २ कुजट पदार्थांचें. कुहिजक=कुजट. ३ दशी ( हंसकोश ). अन्न नासलें ह्मणजे तें हाताला चिकट लागतें व तारा निघतात, तो अर्थ असावा. ४ कष्टानें, प्रयासानें. ५ विस्तारलें. ६ उच्छिष्ट. ७ एका ताटांत सर्वांनीं मिळून जेवणें. ८ हवन करण्याचे पदार्थ. ९ अकालीं दान देण्यास तयार होणें. १० पराधीनपण. ११ अल्पकु=दरिद्री.

केवळ जें अज्ञान संम्यक । तें चि ज्ञान तामसाचें ॥ ९६ ॥ आतां मोहाचेनि सावेंयें तमोगुणें । हिंसात्मक अविधि कर्म करणें । बंधनकर्तें आणि क्षयासी धरणें । जें बेसणार वळें ॥ ९७ ॥ आतां तमोगुणी कर्त्ता चि अयुक्त । शठ स्तब्ध आळसी प्राकृत । विषादी दीर्घसूत्री निष्ठत । दुष्ट कृतघ्न कुकर्मी ॥ ९८ ॥ आतां तामसी बुद्धि धर्माधर्मी । न जाणोनि कार्याकार्य भूमि । सर्वार्थेंसीं विपरीत कर्मी । तामसी बुद्धि ते ऐसी ॥ ९९ ॥ तैसी च धृति हि स्वप्नासारिखी । भयशोकविषादमदेंसीं अति दुःखी । दुर्मेधाकारें जें अशेखीं । तें तमोगुणी धैर्य पैं ॥ १०० ॥ सांगतां साकल्य तमोगुणी सुख । सांगतियांसी च होय परम दुःख । निद्रा आळस्य प्रमाद दुःख शोक । तामसी सौख्य दुःखजन्य ॥ १ ॥ एवं सांगतां तमोगुणलक्षण । चित्तासी होतसे परम सीण । परि न सांगतां श्रोते क्षोभती ह्मणोन । सांगणें पडिलें अगत्य ॥२॥ असो एवं आद्यंत त्रिगुण । सत्व रज तम सलक्षण । स्वानुभवदिनकरीं संपूर्ण । यथामति सांगितलें ॥ ३ ॥ दिनकर रामीरामदासीं शरण । रिघोनि निवेदील पुढील कीर्ण । श्रोतीं कूटांचें करूनि विवरण । साकल्य अर्थ विचारिजे ॥ १०४ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये चतुर्दश कळापे त्रिगुणस्वरूपलक्षणविवरणं नाम चतुर्थ कीर्ण प्रकाशः ॥ ४ ॥ श्रीरामचंद्रसमर्थ ॥

---

॥ श्रीराम ॥

ब्रह्म निर्गुण निर्विकार । नित्य शुद्धबुद्ध निरंतर । स्वसंवेद्य सनातन परात्पर । स्वानुभवैक ॥ १ ॥ पंचभूतें आणि त्रिगुण दळैवाडें । सारूनि मीममत्वेंसीं येकीकडे । पाहे जवं आद्यंत निजनिवाडें । तवं मी तें चि तें ॥२॥ ऐसें दोंविण ऐक्यसुखवाडें । लाधोनि स्वानुभवदिनकरीं

१ साक्षानें. २ बद्धक. ३ नाशास. ४ जें धैर्य शेवटीं आपल्या बुद्धीस फसवितें तें तमोगुणी जाणावें. ५ सांगणारास. ६ पुढील किरणांत घातलेल्या कोड्याचें. ७ समुदाय. ८ निजस्वरूपभाव. ९ अहंब्रह्मास्मि. १० अभिन्नपणाचें सुख.

गोड । स्वानंदसुख समसाम्यता पाड । परब्रह्मैक्यत्वें ॥ ३ ॥ परब्रह्मीं स्वानुभवदिनकर । ऐक्यत्वें समरसला सत्य साचार । रामींरामदासकृपा दिनकर । ब्रह्माकार सहजस्थिति ॥ ४ ॥ तिये सहजस्थितीचेनि बिकें[2] । सस्वरूपीं समरसतां निकें । तवं अकस्मात येका कौतुकें। अति चमत्कारला ॥ ५ ॥ चमत्कारलेंपणें ब्रह्मारण्यांत । पाहों बैसे जवं निवांत । तवं नपुंसकें[3] येक अकस्मात । तेथें देखिलें पैं ॥ ६ ॥ त्यासी मान मांज ना हातपाये । नाक डोळे ना तें इंद्रियें । अनंगपणें पाहातां सोये । अवेवहीन साजिरें ॥ ७ ॥ धरितां तें हातीं लागेना । पीळपेंचीं सांपडेना । पाहें तेणें बहुता जना । दगा दिधला सर्वस्वें ॥ ८ ॥ बहुतीं बहुत केले उपाय । परि कोण्हां हि न लागे त्याची सोय । म्यां हि ऐसी याची जाणोनि भोयें । शब्दफांसा[6] घातला ॥ ९ ॥ तो फांसा गळां पडे जवं । तवं हातीं लागलें स्वयमेव । पाहे तवं अनंगें चि अपूर्व । स्वरूप दिसे तयाचें ॥ १० ॥ त्यासी जवळी आणूनि पाहिलें । तवं तें उगें चि येऊनि बैसलें । जेथें ठेऊं तेथें संचलें । तें चि दिसे अवघें ॥११॥ सभंवतें पाहाती त्यासी लोक । कित्तेक करिताती त्याचें कौतुक । ह्मणती हें अपूर्व नपुंसक । कोठें सांपडलें पैं तुह्मां ॥ १२ ॥ यासी बाप माय ना माउसी । हें उपजलें कवणाचे कुसीं । यासी पाहातां वाटतसे खुशी । मनाचेनि अवकाँशें ॥ १३ ॥ ऐसें लोक तर्कें चि बोलती । परि त्यासी डोळां कोण्ही न देखती । कित्तेकांची तेणें फजिती । क्षण न लागतां केली असे ॥ १४ ॥ ज्याचा ध्वनिमात्र लाधतां सावावो । वेदशास्त्रपुराणा आला आंवो । बंडापाशांडासी सुटला भेवो । नाम ऐकतां चि जयाचें ॥ १५ ॥ ऋषि मुनि सुर सिद्धसमुदाव । संत महंत महानुभाव । ज्याचा घेती नित्य स्वानुभव । दिनकर रामींरामदास ॥ १६ ॥ ऐसें

---

१ थोरी, मोल. २ शोभेमुळें, तेजानें. ३ आकाश. ४ कंबर. ५ भूमि. ६ शब्दब्रह्म असा. ७ सामर्थ्यानें. ८ साह्य. ९ आकार, डौल.

तें अत्यंत सुंदर । परि नपुंसक असे साचार । श्वेत पीत ना रक्त कृष्ण प्रकार । न दिसती कांहीं ॥१७॥ त्याचा येक गुण उत्तम असे । जेथें ठेविलें तेथें उगें चि बैसे । आणि बसलेंपणें चि दिसे । सकळां ठाईं ॥ १८ ॥ परि सदाचें तें असें निश्चळ । आणि निवांत असोनि निर्मळ । तव त्यापासूनि परम चंचळ । पोरं[1] जालें अकस्मात ॥ १९ ॥ तें होतां चि चहुंकडे पसरलें । अन्हाडपण[2] करूं लागलें । कोण्हा आकळितां नाकळे वहिलें । तें लाबाड फार पैं ॥ २० ॥ लातरें डसरें अन्हाड डिवरें । अखंड फिरे होऊनि बावरें । त्यासी धरूं टपती थोरथोरें । परि तें कोण्हा हि नाकळे ॥ २१ ॥ ब्रह्मा इंद्र चंद्र हरि हर । संत सनक मुनेश्वर । सिद्ध साधु राजे थोर थोर । धरितां नाटोपे कोण्हासी ॥ २२ ॥ हटयेोगीं आणि ज्ञानयोगीं । दर्शनीं उपदर्शनीं वैरागीं । वंडीं पाषांडीं अनेगीं । धरितां कोण्हा नाकळे ॥२३॥ चंचळपणें अति सैरॅाट[3] । अनंत ब्रह्मांडें पायवाट । क्षणें गुप्त क्षणें प्रगट । होतां हि पारि दिसेना ॥ २४ ॥ परि जालें बापाहूनि स्याहाणें । ह्मणौनि जे ते करिती त्यासी साजॆणें[4] । येकुलतें येक कोडिसवाणें[5] । लाडिकें जें सकळांचें ॥२५॥ ज्यासी हात पाय ना मान माज । सर्वांगेंसीं अनंग सहज । पाहतां प्राणिमात्राचें होय निज[6] । परि प्राणिमात्रा वेगळें ॥ २६ ॥ दिसेंदिस पोर मोटें जालें । तेणें आपण चि वळावलें । कोण्हां मानीनासें देखिलें । चंचळपणें दुस्तर ॥ २७ ॥ तेणें आपण चि थोरावलें । निज पितियासी आछादिलें । मग आपण चि प्रगटलें । परि न दिसे कोण्हासी ॥ २८ ॥ आंगा स्पर्शे तेव्हां आडळे । क्षणार्द्धेंसीं उठोनि पळे । येकांग उष्ण येकांगें सीतळें । नेटकें सुंदर ॥ २९ ॥ रागेजतां तें तत्काळ रुसे । येके कोनीं जाऊनि तेव्हां चि बैसे । सवें चि समजोनियां आँपैसें । लोकांमाजीं लागे फिरों ॥ ३० ॥ ज्याचें वळ स्वानुभवदिनकरासी । लाधोनि दिनकररामदासी । तन्मय ज्याचिया स्वरूपासी । पाहात ठेला

---

१ वायु. २ उनाडपणा. ३ मोकाट. ४ मैत्री. ५ कौतुकास्पद. ६ स्वस्वरूप. ७ आपलें आपण.

स्वानंदें ॥ ३१ ॥ तवं तें हि स्वानुभवदिनकरीं । सुखावलेंसे[1] सपरिवारीं । सगुण परि निर्गुणत्वाची उंजरी । न मोडे आंगींची ॥ ३२ ॥ निजांगें दिसे उष्ण ना सीतळ । सघन साजिरें अळुमाळें[2] । स्वरूपें स्वयंप्रकाश सोज्वळ । सगुण निर्गुण समांगें ॥ ३३ ॥ पाहातां ज्याची आद्यंत थोरी । अनंत ब्रह्मांडें ज्याचे उदरीं । रची खची क्षणाभीतरीं । लपे प्रगटे स्वलीळा ॥ ३४ ॥ निरावयवें चि जें साव-यव । निर्गुणें चि सगुण स्वयमेव । निर्विकारें चि जें विकारी सर्व । निराधारें चि आधार जें ॥ ३५ ॥ संभवें चि जें असंभवनीय । वचनें चि जें अनिर्वचनीय । प्रमयें चि जें अप्रमेय । सर्वांगेंसीं अनंग जें ॥ ३६ ॥ पारि असे मुळाचा जिनसें[3] । ह्मणौनि बोलतां न ये कोण्हास । नाहींपणें चि बहुवंस[4] । वर्त्तणें जयासी ॥ ३७ ॥ आंगें तरि दिसे जो पुरुष । परि आंगीं स्त्रीनपुंसकाचा साहासें[5] । येऱ्हवीं पाहातां स्त्रीनपुंस-कास । वेगळें दिसे सर्वस्वें ॥ ३८ ॥ जो दाटलासे त्रिभुवनामाजीं । ज्याकारितां शरीरमात्रें साजीं[6] । जो या चराचराचिया काजीं । धांवतसे सर्वस्वें ॥३९॥ आब्रह्मापासूनि अणुरेणांत । पाहातां येक तो चि दिसत । उष्णसीतळतेसीं विलसत । निरंगें चि दोहीं आंगीं ॥ ४० ॥ कर्त्ता[7] धर्त्ता तो चि हर्त्ता । त्रिविध वर्तणें स्वभावता । त्यासी दोनि पोरें[8] जालीं तें तत्वता । नपुंसकें सर्वांगें ॥ ४१ ॥ त्यांत येक असे अत्यंत रागीट । येक तें बहुत चि पोंचट । दोघांसी परस्परें जाला फांट । तें खाऊं डंखूं करिती ॥ ४२ ॥ येक दिसे खावरें डिवरें । येक तें अति स्वगुण गोजिरें । येक आकाशामाजीं वावरे । दुजें लोळे भूतळीं ॥ ४३ ॥ येक तीव्र वैराग्यें कठोर । येक तें अत्यंत सकुमार । येका आंगीं क्रोध फार । येक शांत सर्वस्वें ॥ ४४ ॥ येक संव्हारी देखे त्यासी । येक जीववी प्रयत्नेंसीं । येकाच्या साहों न शकती दृष्टीसी ।

१ स्वस्थता, उत्कर्ष. २ किंचित्. ३ गोष्ट. केवळ मूळ असल्यामुळें. ४ सर्वत्र. ५ साहस ? ६ जिवंत, टवटवीत. ७ रज, सत्व व तम या त्रिगुणांचीं हीं तीन कार्यें जो एकदा करतो. ८ तेज आणि आप.

सर्वांगीं धरिती येक तें ॥ ४५ ॥ येक तें नाना जिनस बहुरंग । येक येकें जिनसें येकरंग । येकाचें कोण्ही न सिवे आंग । पोटीं धरिती येकासी ॥ ४६ ॥ येक तें हिरवें तांबडें पिवळें । येक दिसे निखळ काळें । येकासी दिसती सर्वांगीं डोळे । येक केवळ अचक्ष ॥ ४७ ॥ येक जिकडे चाले तिकडे संव्हारी । येक तें सर्व चि पुन्हां उभारी । विश्वाचें आधण येकावरी । येक आधर्णी उकडे ॥ ४८ ॥ येकासी ग्रासामाजीं विश्व न पुरे । येक विश्वासी राखे आंत बाहिरें । येक दिव्यदेही अति तेजाकारें । येक सर्वांगें सीतळ ॥ ४९ ॥ येक सर्वांगें दिसे भरवंटे । येक अंतर्बाह्य असे पोंचट । ऐसीं दोनि पोरें ज्याला तो येकट । अनंगें चि सर्वांगेंसीं ॥ ५० ॥ पोरें जालीं पारि नपुंसकें । दोन्ही हि विषमें चि वर्त्तती कौतुकें । डंखूं धांवती येकासी येकें । परस्परें भक्षिती ॥ ५१ ॥ येकयेकावरी उलाळती[२] । परस्परें झोंबी घेती । क्षणामाजीं नाहींसें करिती । येरयेरांसी पैं ॥ ५२ ॥ सखीं भावांडें पारि सम विषम । परस्परें वैर चाळिती परम । दोघें हि कामोटीं[३] दिसती उत्तम । आणि निकामी दोघें हि ॥ ५३ ॥ येकयेकपारि विश्वीं व्यापलीं । अंतर्बाह्य विश्वामाजीं भरलीं । तारक मारक होऊनि वहिलीं । परस्परें वर्त्तती ॥ ५४ ॥ दोघें विषमें चि ऐक्यासी आलीं । स्वानुभवदिनकरीं थिरावलीं[४] । दिनकरें रामदासीं पाहिलीं । ऐक्यस्थिति सहजें ॥ ५५ ॥ मग तें उभयतां येकवटलीं । परस्परें समवायें[५] मिळालीं । रूपरसयोगें मिश्रित जालीं । निरावयवेंसीं सावेव ॥ ५६ ॥ तयां उभयांचेनि ऐक्ययोगें । कुमारी[६] येक जन्मली सर्वांगें । संपूर्ण सुलक्षण निजांगें । अति सुंदर नेटकी ॥ ५७ ॥ तयेचें अवलोकितां लावण्य । ब्रह्मादि हरिहरा जे अगण्य । जयेकारितां विश्वमान्य । प्राणिमात्र

---

१ भरींव. २ उल्लाळती=उड्या घेती. ३ कामाचीं. ४ स्थिर झालीं. ५ व्यापकतेनें, समुदायानें. ६ पृथ्वी.

होतसे ॥ ५८ ॥ जे निजांगीं विलसे पंचगुणेंसीं । परि अनंत गुण असती जयेपासीं । यया स्थावर आणि जंगमासी । आश्रय जे निजांगें ॥ ५९ ॥ पिंडब्रह्मांडीं जे येक व्यापली । जयेकरितां तें आकारासी आलीं । जियेच्या अंगसंगें विराजलीं । संपूर्ण अवघीं ॥ ६० ॥ चहूं वाणीसीं च्यारी खाणी । तथा चौऱ्यासी लक्ष जीवयोनी । सकळ चराचर हें व्यापूनि । राहिलीसे निश्चळ ॥ ६१ ॥ सर्व वर्णेसीं सर्व सौगंध्य । जयेपासीं सकळ पदार्थ साध्य । सकळांसीं जे असोनि सांनिध्य । येकपणेंसीं अनेक ॥ ६२ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध । पांचा विषयांसीं जे सावध । सर्वां हि परिस विशेष गुण विविध । सर्वलक्षणसाजिरी ॥ ६३ ॥ वस्तुमात्र जयेसी अनुकूळ । येकांगें व्यवसाय करी सकळ । स्थावरजंगमेंसीं जे केवळ । सुंदरत्वें विराजली ॥ ६४ ॥ नाना पदार्थ निर्माण करी । जीवमात्रासी पाळी परोपरीं । सर्वांगें विलसे सम साजिरी । सगुण गुणें नेटकी ॥ ६५ ॥ इयेचा अंतरीं जो अभिळाश धरी । तयासी हे तत्काळ चि संव्हारी । चक्रवर्ती राजे थोरी । अभिळाशें नाशिजे ॥ ६६ ॥ ऐसी जे सर्वांगेंसीं सुंदर । चांपे गोरटी सकुमार । पाहातां प्राणिमात्र जयेवर । आसक्त होती तत्काळ ॥ ६७ ॥ जो निष्कामता वर्त्ते तयेसीं । तयासी प्रसन्न होय सर्वस्वेंसीं । जो अभिळाश धरी तयासी । भस्म करी क्रोधोनि ॥ ६८ ॥ शरीरें अत्यंत चि स्थूळ दिसे । परि निराळी चि जे बैसली असे । जियेचें आयुष्य मापारी मवितसे । अहर्निश दिनकर ॥ ६९ ॥ तियेनें चौघें वडिलें बाहिलीं । आपणांजवळी आणूनि बैसविलीं । ऐसीं पांच हि मिळोनि आरंभिली । बोली परस्परेंसीं ॥ ७० ॥ त्यांत कोण्ही शब्द गुणें चि वरिष्ट । कोण्ही शब्दस्पर्शेंसीं विशिष्ट । कोण्ही शब्दस्पर्शरूपेंसीं स्पष्ट । विचारासी आलीं ॥ ७१ ॥ कोण्ही शब्दस्पर्शरूपरसेंसी । विचारासी आलीं चहुं गुणेंसीं । हे शब्दस्पर्शरूपरसगंधेंसीं । पंचविषईं

---

१ गंध गुण स्वतःचा व रस, रूप, स्पर्श आणि शब्द हे अंशात्मक गुण मिळून पांच हि गुण पृथ्वीचे ठायीं आहेत. २ स्थूलरूपानें. ३ माप करणारा. ४ मोजत आहे. ५ सूर्य. ६ आकाश, वायु, तेज व आप. ७ बोलाविलीं. ८ ही पृथ्वी.

प्रसिद्ध ॥ ७२ ॥ मिळोनि सांगती सुखदुःख येकमेकां । येकासी येकें देताती आवांका । समविषमेंसीं सुखदुःखा । वरपडीं होती ॥ ७३ ॥ क्षणामाजीं येताती गोडीसी । तेव्हां येकवटती परस्परेंसीं । सवें चि आलियां विषम कळीसी । कळवांडती येकमेकें ॥७४॥ येक तें मुळीचें चि असे नपुंसक । त्यासी पुढें जाला येक लेंक । त्यापासूनि पुढें दोनि नपुंसक । निर्माण जाले संयोगें ॥ ७५ ॥ त्या दोघांसी जाली येकी कुमारी । ते सर्वांगेंसीं सम साजिरी । येकुन पांच हि जणें परस्परीं । संवादती जवं ॥ ७६ ॥ तवं यांचे चि मुळीचे नातलग । विषमत्वें असती पुरुष तिघ । येक भेंला येक नष्ट येक द्व्यंग । मिळोनि भेटले पांचासी ॥ ७७ ॥ तीन आणि पांच येकवटलीं । तें परस्परें भांडों बोलों लागलीं । भांडतां भिडतां ऐक्यासी आलीं । स्वानुभवदिनकरीं ॥ ७८ ॥ ऐसीं तें आँठ हि ऐक्यासी येऊन । तिहीं येक कौतुक केलें गहन । अति अकळ करूनियां विंदान । पुंतळा येक निर्मिला ॥ ७९ ॥ त्या पुतळ्याची सांगतां बाजीगोरी । परम कौतुक स्वानुभवदिनकरीं । सर्वांगेंसीं समता साजिरी । विळासे अंगप्रतिभा ॥ ८० ॥ त्याचा येक येक पदार्थ अनुपम्य । सर्वांगेंसीं साजिरें समसाम्य । सर्वावयवेंसीं अभिगम्य । प्रकृतिपुरुषेंसीं ॥ ८१ ॥ ययां आठा जणां मिळोनि । आणिक सेंभर मेळऊनि । बत्तीसां कोशीं उभारूनि । बाहुलें निर्मिलें ॥ ८२ ॥ तें बाहुलें परम सुंदर । रमणीय वेषें मनोहर । त्यामाजीं मुळींचा जो साचार । तो प्रवेशला गुप्तरूपें ॥ ८३ ॥ प्रवेशोनि नाना खेळ करी । रंग तरंग नाना प्रकारीं । ऐसी सज्जूनियां बाजीगारी । अनंत ब्रह्मांडें भरिलीं ॥ ८४ ॥ इतुकी बाजीगारी उभारूनि । आठजणें पाहाती दुरूनि । तवं येक हि बाहुलें न दिसे नयनीं । तेणें चाकाटलीं सर्व हि ॥ ८५ ॥ मग करिती नाना विस्मय ।

---

१ धैर्य किंवा द्वैत, विकल्प. २ गुंतलीं जातात. ३ निकरावर येऊन भांडतात. ४ सत्व. ५ तम. ६ रज. ७ पंचभूतें आणि त्रिगुण. ८ दुर्बोध, कठिण. ९ कौशल्य. १० ब्रह्मांडात्मक. ११ गारुडविद्या. १२ पिंडरूप. १३ अंतरात्मा.

आपआपणामाजीं असंभवनीय । ह्मणती हें येकायेकीं जालें काय । खेळ मोडला कैसेन ॥ ८६ ॥ मग येकावरी येक घालिती । परस्परें कळवांडती । सहजस्थिति निकुंरा जाती । घातपातें येकमेकां ॥ ८७ ॥ पितां रक्षी निज कन्येसी । प्रपितां संव्हारी पौत्रासी । सेवटीं कन्येसगट निज पुत्रांसी । सगळें चि खाये ॥ ८८ ॥ मग आपण चि प्रगटे निःसीम । तवं त्याचा पितां त्यासी देऊं धांवे क्षेम । तो येतां चि प्राण टाकी निभ्रम । निःशेष नाहीं चि होये ॥ ८९ ॥ जवं दोन्ही नपुंसकें निज कन्येसीं । नाहीं चि होतीं येक-सरिसीं । तवं आगांतुकां हि तिर्धांसी । पळ सुटे सत्राणें ॥ ९० ॥ तें तिघें हि येकामाजीं येक । परस्परें लपों जाती नावेकें । तवं तो मूळें-पुरुष धांवोनि सम्यक । तयांसी पोटीं सामावी ॥ ९१ ॥ मग आपण चि अवघा होय । सर्वे चि विरोनियां जाय । येकायेकीं नाम रूप ना कर्मसोय । कोठें कांहीं दिसेना ॥ ९२ ॥ मग नपुंसकासी नपुंसक । ह्मणावया उरेंचिना कोण्ही निष्टंक । सहजें चि मुळींचें येकलें येक । अनायासें चि उरलें ॥ ९३ ॥ तेणें पहा तयाचा हि ग्राश केला । पाहातां त्रिपुटीसहित विराला । येकुन समग्राचा लोप जाला । उरलें येक परब्रह्म ॥ ९४ ॥ उरलें हें हि ह्मणावयासी । कोण्ही न दिसे चि पैं त्रिपुटीसीं । स्वानुभवदिनकररामदासीं । सहजस्थिति ऐक्यता ॥ ९५ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये चतुर्दश कळापे परब्रह्मविवक्षाकूटविवरण नाम पंचम कीर्ण प्रकाशः ॥ ५ ॥श्रीरामचंद्र॥ येकुन कळापवोवी ॥ ४६८ ॥

---

## ॥ मनउन्मनस्थिति मोक्षलक्षण कूटाविवरण चतुर्धाकळाप ॥१५॥

॥ श्रीरामचंद्र ॥

ॐ नमो सद्गुरु सच्चिदानंद । स्वानुभवदिनकरीं तूं चि प्रसिद्ध ।

---

१ निश्चयावर. २ आप. ३ पृथ्वीस. ४ वायु. ५ आप आणि तेजास. ६ वायु प्रगटे. ७ आकाश. ८ त्रिगुणांस. ९ वेगानें. १० क्षणभर. ११ आत्माराम, परमेश्वर. १२ चतुर्विध.

भिन्नत्वें चि अभेद त्रिपेद । ब्रह्मैक्यबोधेंसीं ॥ १ ॥ सत्पद चित्पद आनंदपद । तिन्ही मिळोनि महावाक्य शुद्ध । याचा विचारितां अर्थ-भेद । स्वरूपसिद्धि साधका ॥ २ ॥ मुळीं ब्रह्म निर्गुण निर्विकार । अनाम अरूप तें अगोचर । त्याचा कळावया अनुभव साचार । नामें ठेविलीं विश्वजनकें ॥ ३ ॥ विश्वजनक जो कां वेद । जेणें संपादिले त्रिविध भेद । कर्म उपासनाभक्ति ज्ञान शुद्ध । आत्मसाक्षात्कारेंसीं ॥ ४ ॥ तो चि अनुग्रह स्वानुभवदिनकरीं । लावोनियां ब्रह्मसाक्षात्कारीं । सच्चि-दानंद या नामविचारीं । श्रीगुरुकृपा समर्थ ॥ ५ ॥ तेथ सत्शब्दें बोलिजे ब्रह्म अद्वय । चित्शब्दें बोलिजे माया चिन्मय । दोहींचे संधी-माजीं साम्यता उभय । तो आनंदपद सर्वेश्वर ॥ ६ ॥ तरि हें निश्चळ चंचळ आणि जड । त्रिविध पदभेदेंसीं हा अगड । भेदूनि निश्चळपद-साम्राज्यसुरवाड । शिष्यें भोगिजे गुरुकृपां ॥ ७ ॥ आतां निश्चळ तें जाणिजे सत्पद । चंचळ तें जाणिजे आनंदपद । जड बोलिजे तें चित्पद । अविद्या मायाभेदेंसीं ॥ ८ ॥ तेथ ब्रह्म जाणिजे केवळ निश्चळ । सर्वेश्वर तो स्वयें चंचळ । माया जडरूपें केवळ । अष्टधा प्रकृति ॥ ९ ॥ तरि जड बोलिजे क्षर भागासी । चंचळ बोलिजे अक्षरासी । उत्तम ते निश्चळ ब्रह्मासी । नामसंज्ञा बोलिजे ॥ १० ॥ अहो या जड चंचळ निश्चळाचा निश्चय । क्षराक्षर उत्तमत्वें केला अन्वय । पंचदश कळापीं चतुर्थ कीर्णान्वय । तेथ सांगिजेल परिछिन्न ॥ ११ ॥ असो ब्रह्मीं सर्वेश्वर कैसा जाला । जैसा गगनीं वायु अक-स्मात प्रगटला । मग तो मूळमायेसीं विस्तारला । पिंड ब्रह्मांड अवघें ॥ १२ ॥ तेथ पृथ्वी आप तेज वायु व्योम । तया त्रिगुण सत्व रज तम। मिळोनि अष्टधेसीं सृष्टिक्रम । मायायोगें विस्तारला ॥ १३ ॥ ते अष्टधायोगेसीं मूळप्रकृति । अविद्यात्मक देहाकारें आली व्यक्ती । तयेंत सर्वेश्वरांश बिंबती । सूर्यप्रतिबिंबाऐसे ॥ १४ ॥ सर्वेश्वर स्वयें निजप्र-

---

१ सत्+चित्+आनंद हीं तीन पदें. २ ज्ञानस्वरूप. ३ लवणीची वाट. ४ याचें कर्म ' अगड. ' ५ नाशिवंत.

कृतीमाजीं । बिंबला जीवपणाचा समोजीं । मग प्रकृतिवशें अविद्येचिया काजीं । तीअधीन वर्त्ते तदनुसार ॥ १५ ॥ जेवि कां लोहसंगें अग्नि पिटे । तेवि प्रकृतिसंगें जीवत्व प्रगटे । नाना सुखदु:खेंसीं चढे वोहटे । परि प्रकृतिहूनि वेगळा ॥ १६ ॥ ते प्रकृति देहचतुष्टयात्मक । अवस्थाभिमानेसीं भोगमात्रा सम्यक । स्थानें गुणशक्तीसी सकौतुक । निराश केला गुरुमुखें ॥ १७ ॥ जेव्हां अविद्यात्मक अष्टधेचा । निराश जालिया बंध तुटे जिवाचा । जेवि उदकनाशें प्रतिबिंबाचा । ठाव चि पुसे तत्काळ ॥१८॥ तेवि प्रकृतिनिराशें जीवपण लोपे । मुळींचें शिवपण तें उंदिपे । जड भाग होता जो अविद्यारूपें । तो समरसला ऐक्यत्वें ॥ १९ ॥ तें चित्पद सर्वेश्वरीं समरसलें । तेव्हां आनंदपद चंचळत्वें देखिलें । सर्वे चि मायालोपें चंचळपण समरसलें । निश्चळ ब्रह्मीं सत्पदैक्यें ॥ २० ॥ तो सच्चिदानंदेंसीं ब्रह्मानुभव । स्वयें देतां येक सद्गुरुराव । स्वानुभवदिनकरीं स्वयमेव । सच्चिदानंदस्वरूप ॥ २१ ॥ एवं सच्चिदानंदस्वरूप सद्गुरु । ब्रह्मानुभव देता स्वयें साचारु । सत् चित् आनंद त्रिपदप्रकारु । स्वानुभवदिनकरीं यथोक्त ॥ २२ ॥ लाधोनि ब्रह्मानुभव परिपूर्ण । दिनकर रामींरामदासीं निमग्न । होतां चि मनाचें जालें उन्मन । चित्त चैतन्यीं विरमलें ॥ २३ ॥ स्वानंदासीं समाधी लागली । स्वात्मानुसंधानीं वृत्ति समरसली । निज स्वसुखासी सींगें चढली । परब्रह्मेंसीं सहजस्थिति ॥२४॥ इतुकें शिष्य स्वानंदाचेनि भरें । वाक्य ऐकोनि परमादरें । ह्मणे स्वामी बोलिले चमत्कारें । तेणें अति सौख्य जालें मज ॥२५॥ परंतु स्वामी बोलिले येक वचन । जे मनाचें जालें उन्मन । तरि तया मनाचें कैसें लक्षण । आणि तें ठाईं वसे कवणे ॥२६॥ मन ह्मणिजेते अति चपळ । अधीरपणें परम चंचळ । क्षणार्द्धेंसीं पृथ्वी फिरे सकळ । पाहोनि ये देखिला ठाव ॥ २७ ॥ पाहातां हा वायु हि असे चंचळ । परि मनापुढें अल्पगति केवळ । वायु सहजगतीनें फिरे सकळ ।

१ नाना प्रकारच्या जीवरूपानें. २ उदय पावतें. ३ देणारा. ४ सुख परिमितीपेक्षां जास्त जालें. ५ कीं. ६ ह्मणतात. ७ याचा कर्ता ' मन '.

चंचळत्वें मन नाकळे ॥ २८ ॥ ऐसें जें मन अत्यंत दुस्तर । अपूर्णत्वें परम अधीर । तें येकायेकीं होऊनियां स्थिर । येईल कैसें उन्मनत्वासी ॥ २९ ॥ या मनाचेनि योगें बहुतांसी । दगे होताती पैं अनायासीं । ब्रह्मादिकांसी अति कासाविसी । क्षणमात्रें केलें येणें ॥ ३० ॥ शंकरादिक योगी प्रसिद्ध । असतां या मनें केले विविध । नारदासारिखे योगीवृंद । छळिले तत्काळ पैं ॥३१॥ येणें इंद्रासी भगरूप[1] केलें । विश्वामित्र याचेनि श्वान[2] जाले । सुंदोपसुंदादि[3] प्राणें गेले । याचिया छळनोक्ती ॥३२॥ रावणासी येणें केलें अति फजित । चौदा चौकडिया आयुष्य भस्मभूत । पतिव्रतेसी[4] पाषाणवत । येणें केलें निमिष्यार्द्धे ॥ ३३ ॥ येणें महायोगी पछाडिले । तपी येणें आपटिले । सिद्ध साधुजन भले भले । ते छळिले येणें प्रतापें ॥ ३४ ॥ येणें अनुष्ठाते[5] बळें च्यवविलें । आत्मज्ञानी अपभ्रंशीं पाडिले । सत्कर्मनिष्ठ संत्रासिले[6] । कर्मव्यवहारापासूनि ॥ ३५ ॥ येणें पदप्राप्ति[7] होतां ढकलिले । येणें पुण्यवंत नर्कीं पाडिले । आणि कोण्हाकोण्हासी निजकृपां रक्षिलें । तें हि येणें पैं ॥ ३६ ॥ या मनापासूनि निखळ सुटला । ऐसा कोण्ही प्राणी नाहीं आडळला । तथापि जो ईश्वरानुग्रहीत असेल भला । तो चि सखा ययाचा ॥ ३७ ॥ असो ऐसें जें मन परम दुर्ष्कर[8] । आणि चंचळपणें अति दुस्तर[9] । त्यासी उन्मनत्वाचा प्रकार । केवि घडों शके जी ॥ ३८ ॥ ऐसे शिष्यप्रश्नचंद्रकर निगुति । जाऊनि झगटले श्रीगुरुकर्णसोमकांतीं । तेणें द्रवते जाले परमामृतीं । संवादसुखाचेनि मिसें ॥ ३९ ॥ तरि तो संवाद कैसा किमात्मक । तो सांगिजैल अति सकौतुक । श्रोतीं अव्यग्र होऊनि नावेक[10] । श्रवण केलें पाहिजे ॥४०॥ श्रीगुरु महत्ब्रह्म अति चोखडें ।

---

१ गौतमऋषिशापामुळें इंद्राच्या शरिरास हजारों भोकें ( डोळे ) पडलीं असें वर्णन आहे. २ मेनका अप्सरेनें विश्वामित्र ऋषीस आपल्या कह्यांत आणून श्वानरूपानें इंद्रसभेंत नेलें. ३ हे राक्षस तिलोत्तमेच्या लोभामुळें एकमेकाशीं भांडून मेले. ४ अहल्या शिळारूप झाली. ५ अनुष्ठान करणारे. ६ सोडाविले (?) ७ मोक्षपदप्राप्ति. ८ कठिण. ९ जिंकण्यास असमर्थ. १० क्षणभर.

तेणें सत्‌शिष्यासी परम निर्वाडें । परब्रह्म करूनि ठेविलें सुरवाडें । निजकृपामृत सिंचोनियां ॥ ४१ ॥ तेथें मनाचें व्हावया उन्मन । काय विलंब असेल गहन । परब्रह्मापुढें मनाचें थोरपण । केतुलें असेल जी ॥ ४२ ॥ हरिण होय खरें अति चंचळ । परि सार्वभौमापुढें काय चालेल बळ । चहुंकडूनि सैन्यें वेढितां तुंबळ । तेमाजीं सांपडे आपण चि ॥ ४३ ॥ तेवि साधक ब्रह्मप्राप्तीसी आला । चहुंकडूनि साधनाचा पेलें जाला । तेव्हां मनाचिया चंचळपणाला । कोण पुसतसे जी ॥४४॥ तेथ श्रीगुरु ह्मणती सावध होईं । तुवां जे सांगितली मनाची असमोई । तरि गा मन हें तैसें चि असे अनुपाईं । हें आह्मी हि ह्मणतसों ॥४५॥ परि मनाचें लक्षण येक निकें । हें सोंकविलिये ठाईं सोंके । जरि यासी देइजे विषयभातुकें । तरि हें तैसें चि होये ॥ ४६ ॥ जरि हें लाविजे सत्कर्माकडे । तरि हें तेथें चि बहुत सुरवाडे । अथवा यासी देवपुजेचें घालितां कोडें । तरि हें तेथें चि लिगटे ॥ ४७ ॥ कां हें तीर्थाकडे लाविलें । तरि हें तिकडे चि चालिलें । अथवा राग्यामाजीं सोडिलें । तरि तें चि घेऊनि उठे ॥ ४८ ॥ किंवा हें विवेकारूढ करूनि । जरि लाविलें प्राणायामसाधनीं । तरि यमनियमेंसीं समासनीं । बैसे उंगलें चि हें ॥ ४९ ॥ किंवा सत्संगाचें सन्निधान । जाऊनि श्रीगुरूसी शरण । केलियां देहचतुष्टयनिर्शन । हें राहे उगलें चि पैं ॥ ५० ॥ केलियां महावाक्यविवरण । तेथें अर्थीं प्रवेशे हें आपण । यासी लागलियां तें चि अनुसंधान । हें तद्रूप होय तत्काळ ॥ ५१ ॥ जरि मनासी केवळ निंद्य चि ह्मणावें । तरि हें ईश्वरासी न माने स्वभावें । थोर थोर सामर्थ्यवंत जाले जाणावें । या मनाचिकरितां ॥ ५२ ॥ देवासी देवपण या मनाचिकरितां । सिद्ध साधु याचेनि थोर तत्वता । सनकादि ज्ञाते संत महंत पाहातां । या मनें चि केले समर्थ ॥ ५३ ॥

---

१ निजस्वरूपभावानें. २ स्वाधीनपणानें, स्वतंत्रपणानें. ३ कठिण. ४ जोर, वजन, मारा. ५ समावण्याचा अशक्यता. ६ अपायकारक. ७ बरें आहे. ८ दु:खी, असंतुष्ट होतें. ९ सुख पावतें. १० रागज्ञानी किंवा तामसी लोकांत. ११ उगें.

परि मन असे येकरोंहकी[1] । जिकडे गोड वाटे तेथें चि धरी आशकी । ह्मणौनि हें पहिलें चि धरूनि समधातुकीं[2] । सोडावें ना धरावें ॥५४॥ या मनाचा येक असे पैं अवगुण । हें आपल्या धन्यासी तात्काळ सोडून । विषयांसाठीं इंद्रियांअधीन होऊन । तदनुसार हों लागे ॥५५॥ तंव श्रोता ह्मणे वक्तयासी । कोण धनी असे जी या मनासी । ऐकतां वक्ता देतसे प्रतिवचनासी । तें श्रवण केलें पाहिजे ॥ ५६ ॥ हें देहदुर्ग असे अत्यंत सुंदर । याचा दशम कळापीं असे विस्तर । येथील राजा पराक्रमी थोर । अंतरात्मा राम असे ॥ ५७ ॥ त्याचें मन हें असे मुख्य प्रधान । प्रतिनिधि तें अंतःकरण । चित्त चैतन्येंसीं कार्यकारण । लेखनक्रिया संपादी ॥ ५८ ॥ अहंकार तो असे सेनापति । पंचप्राण हे सैनिक बोलिजती । पंचज्ञानेंद्रियें हें कीरती । उपकार्य[3] प्रधानाचें ॥ ५९ ॥ पंचकर्मेंद्रियें त्यांचीं वहनें । पंचविषय हे भोग्य बोनें[4] । वरकड देहत्रयाचीं तत्वें सकळ सेने–। माजीं मिरविलीं तें ॥ ६० ॥ असो श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । हे पांच हि मनाचे उपप्रधान । सुखदुःखासी हे चि कारण । प्रधानसंगें आत्मयासीं ॥ ६१ ॥ आत्मयाचें प्रधान मन । यासी पंचें[5] हि घातक असती परिछिन्न । या पांचांचिया योगें पंचविषय लालन । करूनि यासी पछाडिती ॥ ६२ ॥ श्रोत्रद्वारें शब्दविषय ऐकतां चि । तत्काळ उडी उठे या मनाची । स्तुतिनिंदा ऐकोनि हे तैसें चि । हर्षविषादारूढ होये ॥ ६३ ॥ कां तें गीतप्रबंधादि नाना गायनें । ऐकोनि तेथ आसक्त होइजे मनें । पुढें कामक्रोधलोभाचिया व्यसनें । फासां पडिजे अनायासें ॥ ६४ ॥ तैसें चि त्वचाइंद्रियें स्पर्शविषयें । मृदकठिणाचिया समवायें[6] । कामक्रोधलोभाचिया अन्वयें । मनें अपाईं पडिजे ॥ ६५ ॥ चक्षुइंद्रियद्वारें रूपविषय । पाहोनि सुंदरकुरूपाचा अन्वय । तदनुसार मन हि कामक्रोधान्वित होय । तेणें पडे नाना

---

१ एकरोंखी, एकमार्गी. २ समतोलपणानें. ३ किरकोळ कामें. ४ खाद्य, नैवेद्य. ५ पांच उपप्रधान. ६ व्यापकतेनें, कारणानें.

अपाईं ॥ ६६ ॥ परस्त्री सुंदर पाहोनि दृष्टी । मनासी अत्यंत अभिलाष उठी । तेणें कामक्रोधलोभें वनितापाठीं । नाना उपाय साधनार्थ ॥६७॥ तैसें चि जिव्हाइंद्रियें रसविषय । चाखोनि मधुरकटूचा अन्वय । कामक्रोधलोभेंसीं करी उपाय । मनसंगें जिव्हा शिस्नार्थ ॥ ६८ ॥ घ्राणइंद्रियें गंधविषय । मन सुगंधदुर्गंधादि घेतें होय । मग कामक्रोधलोभें अपाय । तदनुसार भोगितसे ॥६९॥ ह्मणौनि सांगावयासी हें चि कारण । मन होऊनि पंचज्ञानेंद्रियाधीन । तदनुसार करी कार्यकारण । तेणें पडे नाना अनर्थीं ॥७०॥ तरि जेणें पहिलियापासूनि । मन सैरें हातींचें दिल्हें सोडूनि । तरि तें इंद्रियसंगें भर्वसेनि । विषयअपाईं पडेल ॥७१॥ ह्मणौनि त्यासी पहिलिया लागूनि । साधकें साधनाची करावी पुरवणी । ह्मणिजे तें अवश्यमेव स्वरूपानुसंधानीं । न लैवि लावितां आपण लागतसे ॥७२॥ यदर्थीं वेदांतशास्त्रकारें । दृष्टांत सूचिला असे परमादरें । जेवि कां स्त्रियेसी न शिक्षापितां भर्त्तारें । सैराट हिंडों लागतसे ॥ ७३ ॥ जरि तियेसी बाळपणापासूनि । मायबापांची असे दडपणी । पुढें सासुसासऱ्याची मुग्धपणीं । शिक्षा असे यथोक्त ॥ ७४ ॥ त्यावरि तरुणपणीं भर्त्तारसिक्षापण । स्त्रियेसी यथायुक्त असलियां जाण । ते दिवसेंदिवस धरूनि उत्तम गुण । गृहस्थाश्रमामाजीं निर्वडे ॥ ७५ ॥ तेवि या मनासी जेव्हां मुळींहूनि । साधक साधनांची करी दाटणी । तरि हें मन स्वरूपीं लागे भर्वसेनि । आत्मानुसंधानयोगें ॥ ७६ ॥ जेव्हां होय हें आत्मानुसंधाना वरपँडें । तेव्हां स्वानुभव दिनकरीं सुरवाडे । मग हळु हळु परब्रह्माचेनि पाडें । समतुंकासी ये स्वानंदेंसीं ॥ ७७ ॥ तें ब्रह्मानुभवें जेव्हां ऐक्यासी आलें । तेव्हां त्यासी इंद्रियांचें भय कितुलें । आणि पंचविषय हि आले । आज्ञेमध्यें त्याचिया ॥ ७८ ॥

---

१ स्त्री मिळविण्याकरितां. २ स्वैर, स्वच्छंदपणानें. ३ जोड. ४ हीं अक्षरें जास्त असावीं, किंवा लव=क्षण, यापासून क्षणभर या अर्थानें. ५ लग्न होऊन ऋतु प्राप्त होईपर्यंतच्या स्थितींत. ६ इतर स्त्रियांपेक्षां चांगल्या रीतीनें उमटून पडते. ७ गुंतलेलें. ८ सुखावतो ९ साम्यतेनें. १० बरोबरीस.

मग श्रोत्रद्वारें शब्द जो आयके। स्तुति निंदा कां गीतप्रबंधादिकें। तें सकळ आइकोनियां सकौतुकें। ब्रह्मार्पण करी निजांगें ॥ ७९ ॥ तैसा चि त्वचेसी स्पर्श मृद कठिण। होतां चि सर्वांगें करी ब्रह्मार्पण। चक्षुइंद्रिईं पाहातां कुरूपसुंदरपण। ब्रह्मार्पण करी तत्काळ ॥ ८० ॥ परस्त्री सुंदर देखतां चि दृष्टीं। मातृभावें मानूनि परम संतुष्टीं। तृष्णा दुर्भावना कदापि नुठी। सहजस्थिति स्वानंद ॥ ८१ ॥ असो जिव्हें-द्रियें कटु मधुर रसपान। जालियां करी सर्व हि ब्रह्मार्पण। नाना गंध सुगंध घेइजे घ्राणेंकरून। परि अन्वय[1] ब्रह्मार्पणाचा ॥ ८२ ॥ ब्रह्मात्मक जालियां निजवृत्ति। साधकासी विषय सहसा उबगती[2]। जेवि पुण्यवंताचिया दर्शनें पळती। नाना दोष दशदिशा ॥ ८३ ॥ तेंवि साधक जालियां ब्रह्मस्वरूप। त्याचा दुर्विषय त्रास घेती आपेंआप। त्याचिये आज्ञेमाजीं कार्यकारणरूप। वर्त्तती भयभीतपणें ॥ ८४ ॥ तोंवरि बाष्कळ शब्द ऐकणें चि नाहीं। ऐकिला तरि सुखदुःख नुपजे देहीं। ज्याची वृत्ति ब्रह्माकार जाली पाहीं। त्यासी कांहीं चि हें सुचेना ॥ ८५ ॥ तयासी स्वरूपस्वानंदापुढें। त्वचेंद्रिईं मृदु कठिण नावडे। कां तें डोळां पाहावें सुंदर रूपडें। याचें हि स्मरण नाठवे ॥८६॥ किंवा जिव्हेनें उत्तम रस सेवावे। हें हि नाठवे तयासी स्वभावें। शरीररक्षणार्थ मात्र भक्षावें। पोटासी लागेल तितुकें ॥ ८७ ॥ तें हि जे समईं जेव्हां जैसें। अनुकूळ होईल प्राक्तनवशें। तें यदृच्छा[3]-योगें मानूनि अमृताऐसें। ब्रह्मभावनां निमग्न ॥ ८८ ॥ कां ते घ्राणें नाना परिमळ सेवावे। हें हि नाठवे तयाचिया जीवें। एवं ब्रह्मस्थिती-चिया पुरुषासी स्वभावें। विषय कांपती चळचळां ॥ ८९ ॥ येऱ्हवीं प्राणिमात्रीं विषय सुटेना। विषईं व्यापिलें सर्व हि जना। ज्ञात्यासी विषयांचें भय बाधीना। कां जे त्यांचे ठाईं अनास्था ॥ ९० ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध। ज्ञात्यासी हे बाधूं न शकती विविध।

---

१ व्याप्ति. २ कंटाळा करतात; त्रास घेतात. ३ स्वेच्छेनें किंवा एक प्रसंग ह्मणून.

जेवि पंचाक्षरियासी भूतबाध । कल्पांतीं हि हों न शके ॥ ९१ ॥ जेव्हां ज्ञात्यासी विषय छळूं न शकती । तेव्हां ज्ञानेंद्रियें धारणेसी सहजें चि येती । मग आपैसें मन बैसोनि विश्रांती । उन्मनत्वासी ये स्वानंदें ॥ ९२ ॥ जेवि लवण पाणियावेगळें असे । तवं लवणपणें त्यासी भेलता चि पुसे । तें चि पाणियासीं मिळतां कोण्ही न पुसे । नामरूपकर्मेंसीं ॥ ९३ ॥ तेवि मन जोंवरि विषयेंद्रियें घारलें होतें । तोंवरि तें करी नाना संकल्पविकल्पातें । तें चि मन परब्रह्मीं होतां सरतें । उन्मनत्वासी ये सहजें चि ॥९४॥ कां जेवि आम्रफळ पाडासी जान्हि आलें । तन्हि अंबीळेपण सहसा न जाय वहिलें । तें चि तृणसेजेसंगें जेव्हां मुरालें । तैं ये पक्वतेसी सहजें चि ॥ ९५ ॥ तैसें मन विषयें-द्रिईं घारलें होतें । तें गुरुकृपेचें लाहोनि उंजितें । तेणें स्वानुभवदिनकरीं होऊनि सरतें । उन्मनत्वा आलें सहजें चि ॥ ९६ ॥ ऐसें श्रीगुरुवाक्य ऐकतां चि । शिष्यमन उन्मनत्वा आलें सहजें चि । ह्मणे जी जी स्वामी आजी थोर सुखाची । धणी लाधलों येकसरीं ॥९७॥ परि त्या मनाचें असे कोणतें स्थळ । आणि तें काय करितसे सर्वकाळ । नाना सुखदुःखादि व्यापार सकळ । हें करितसे कैसें कोठूनि ॥९८॥ मज पाहातां यया विश्वासी । तारक हें मन चि निश्चयेंसीं । जें करूं ह्मणेल तें कृतकार्येंसीं । निःसंदेह करील ॥ ९९ ॥ हें मन लागे जोंपर्यंत हातीं । तोंवरि नाना साधनें काय करिती । तीर्थ क्षेत्र देव धर्म हे सार्थकरूप होती । या मनाचेनि योगें ॥ १०० ॥ वेदशास्त्र-पुराणश्रवण । भगवत्कथा अध्यात्मनिरूपण । नाना संवादसुखें ग्रंथ-विवरण । या मनाचेनि सार्थकरूप ॥ १ ॥ यया मनासी द्यावया साम्यता । पदार्थमात्रीं न दिसे स्वभावता । या मनाचिया कर्तृत्वासी जी तत्वता । सीमा न करवे सहसा ॥ २ ॥ पाहातां या मनाऐसें

---

१ स्थिरतेस. २ कोण वाटेल तो. ३ लहरी होऊन इकडे तिकडे भटकत होतें. ४ पुढें. ५ आंबटपणा. ६ पेट, आगटी. ७ तृप्ति. ८ विषयेंद्रियादि.

सोयरें । त्रिभुवनीं आणिक न दिसे दुसरें । जें महत्कार्य करी तें चि खरें । येर सर्व हि निरर्थक ॥ ३ ॥ प्रपंचिक कांहीं व्यवहार । मन वाष्कळलें तरि न घडे साचार । तें चि स्वस्थळीं असलियां सादर । कार्यसांगता सहजें चि ॥ ४ ॥ हो प्रपंच अथवा परमार्थ । परंतु या मनाचेनि होय जी कृतार्थ । या मनासारिखें कोण्ही समर्थ । आणीक न दिसे सर्वथा ॥ ५ ॥ परंतु हें मन असे कोणे स्थळीं । आणि हें काय करितसे सर्वकाळीं । याचिया स्वरूपाची नव्हाळी । कैसी काय असेल जी ॥ ६ ॥ ऐसें बोलतां निजशिष्य । संतोषोनि श्रीगुरु सादृश्य । पुढीलिये कीर्णीं करितील भाष्य । या मनाचिया स्थळाचें ॥ ७ ॥ तें दिनकर रामदासी श्रवण । स्वानुभवदिनकरीं करील संपूर्ण । श्रोतयांचें सावध असलियां मन । उन्मनत्वासी येईल ॥१०८॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये पंचदश कळापे सच्चिदानंदपदत्रय-व्याख्या मनउन्मनत्वलक्षणविवरण निरूपणं नाम प्रथम कीर्ण प्रकाशः॥ १॥

॥ श्रीराम ॥

पूर्वकीर्णप्रासादकळसीं । कथारत्नप्रभा आहे ऐसी । जे मन चि आलें उन्मनत्वासी । श्रीगुरुकृपाप्रसादें ॥ १ ॥ आतां वक्ष्यमाण कीर्णीं निरूपण । शिष्यें जो केला पूर्वीं प्रश्न । त्याचें श्रीगुरु देताती प्रतिव-चन । निजकृपाप्रसादें ॥ २ ॥ तरि ऐक गा शिष्या सावधान । तुवां पुसिलें मनाचें लक्षण । स्वरूप कर्तृत्व आणि राहातें स्थान । तें यथा-क्रमें सर्व हि ॥ ३ ॥ तरि प्राणियांचें जें निज नाभिस्थान । तें सकळ शरिराचें मध्य प्रमाण । तेथें वायु वसतसे समान । नाभिस्थानप्रदेशीं ॥ ४ ॥ नाभिस्थानीं अवकाश गहन । त्या अवकाशीं वृत्तिरूप शब्द-स्फुरण । तें चि परेवाचेचें अधिष्ठान । तेथूनि शब्द उच्चारे ॥ ५ ॥ प्रथम अर्द्धमात्रात्मक ध्वनि । परेसी उच्चार होय नाभिस्थानीं । संकल्प-रूपें वृत्ति उठोनि । चाले भेदित ऊर्ध्वा उंजु ॥ ६ ॥ ते पश्यंतीचें लाहोनि सन्निधान। भेदित चाले हृदयभुवन । ते हृदयभुवनीं कमळ असे

१ वाहवलें. २ कार्याचा शेवट. ३ प्राप्ति. ४ पुढें सांगणार त्या. ५ नीट वर.

गहन । तें अष्टदळात्मक ॥७॥ हृदयाचा मध्य परिवेरीं । तया अष्टदळाची आहे उभौरी । संकल्परूपें वृत्ति येऊनि त्यामाझारीं । विश्राम पावे क्षणेक ॥ ८ ॥ मुळीं नाभिस्थानीं वृत्ति उठावे । तयेसी अंतःकरण ऐसें ह्मणावें । ते चि वृत्ति हृदईं अभिभवे । तेव्हां मन ह्मणती तयेसी ॥ ९ ॥ ते चि वृत्ति जेव्हां ये कंठासी । तेव्हां बुद्धि ऐसें ह्मणती तिसी । ब्रह्मरंध्रीं प्रवेशतां चित्त ह्मणती तियेसी । द्विदळीं अहंकार बोलिजे ॥ १० ॥ असो हृदयकमळीं असतां निजवृत्ति । अष्टदळीं घेतसे सुख विश्रांति । तयासी मन ऐसे नामसंकेतीं । विद्वज्जनीं पाचारिजे ॥ ११ ॥ मुळीं शुद्धसंकल्पात्मक जें स्मरण । तयासी नाभिस्थानीं जनन । त्याचें नाम अंतःकरण । प्रथम तत्त्व आकाशीचें ॥ १२ ॥ ते चि वृत्ति हृदयासी येतां । विकल्पात्मक होय स्वभावता । तेणें त्यासी मन हें अभिधान तत्वता । ठेविलें विद्वज्जनीं ॥ १३ ॥ मग तें तये हृदयभुवनीं । विश्रांति घेतसे सुखासनीं । हिंडे फिरे बाह्य प्रदेशीं अनुदिनीं । पुन्हां तेथें चि येऊनि बैसे ॥ १४ ॥ त्या मनाचें जेथ विश्रांतिस्थळ । तें असे अष्टदळ कमळ । हृदईं अनाहत चक्राजवळ । पश्चिम भागेंसीं ॥ १५ ॥ त्या कमळासी शोभे ब्रह्मकंद । आत्मज्ञानाचें नाळ अति सुखद । ऐश्वर्याष्टदळेंसीं प्रसिद्ध । शोभायमान ॥ १६ ॥ तेथ पूर्वदळकार्णिका असे । ते श्वेतवर्ण अति मनोरम दिसे । ते स्थानीं मन विश्रामासी येऊनि बैसे । तेव्हां धर्म पुण्यात्मक ॥ १७ ॥ तैसें चि अग्नकोनीं दळकर्णिका असे । ते आरक्तवर्ण सुंदर दिसे । तेथें मन जेव्हां विश्रांतीसी बैसे । तेव्हां प्रगटे अळस चिंता ॥ १८ ॥ दक्षिण दळकर्णिका कृष्णवर्ण । तेथ विश्राम घ्यावया जेव्हां बैसे मन । तेव्हां द्वेषक्रोधमय मति होऊन । तिरस्कारीं मन प्रवर्त्ते ॥ १९ ॥ नैरुत्य कोनीं कर्णिकादळ वर्ण नीळ । तेथें जेव्हां मनासी विश्रांतिवेळ । तेव्हां पापहिंसात्मक मति होऊनि केवळ । नाना घातपातीं प्रवर्त्ते ॥२०॥ पश्चिम कर्णिकादळ पीतवर्ण । तेथें विश्रांतीस जेव्हां बैसे मन । तेव्हां क्रीडाविनोदीं

---

१ घरांत. २ स्थिरता. ३ अभिभवणें=पराभूत होणें. ४ तांबुस रंगाचें.

मन प्रवर्त्तोन । रंळिया[1] विलास नाना करी ॥२१॥ वायव्य कर्णिकादळ स्फटिकवर्ण । तेथें विश्रांतीसी बैसे जेव्हां मन । तेव्हां वैराग्येंसीं होय उच्चाटनें[2] । सर्व हि वाटे त्यागावें ॥२२॥ उत्तर कर्णिकादळ माणिक्यवर्ण । तेथें विश्रांतीसी जेव्हां बैसे मन । तेव्हां सुखशृंगारीं मति प्रवर्त्तोन । विलास करी बहुत ॥२३॥ ईशान कर्णिकादळ सुवर्णवर्ण ।तेथ ज्या काळें विश्रांतीसी बैसे मन ।तेव्हां मतीं[3] दया धर्म कृपा दान । करावें वाटे ते समई ॥२४॥ एवं अष्टदळीं विराजित कमळ । त्यावरी मन बैसोनि करी नाना खेळ । मनाची शक्ति मति होय केवळ । क्रीडा करी तैये[4] संगें ॥२५॥ जेव्हां कर्णिकांचे संधीस बैसे । तेव्हां वातपित्तकफाचे वेळसे[5] । नाना आधि-व्याधि दुष्ट रोगांचे फांसे । पडतातीं प्राणियांसी ॥ २६ ॥ जेव्हां कमळाचिया मध्यभागीं । मन मतीसीं करी क्रीडा सुरंगी । तेव्हां जागृ-दवस्था होऊनि सर्वांगीं । इंद्रियें स्वेछा वर्त्तती ॥ २७ ॥ मन जातीचें तरि असे नपुंसक । परि भोगितां न पुरती तिन्ही लोक । मति-भार्येसीं करीत क्रीडाकौतुक । क्षणमात्रें ब्रह्मांड फिरे ॥ २८ ॥ मन बाह्य प्रदेशीं गेलियां । प्राणी टकमकां पाहे बैसोनियां । परि सांगितली गोष्टी पुसिली फिरोनियां । तरि उगा चि राहे चाकाटला[6] ॥ २९ ॥ ह्मणे स्वामी म्यां आइकिलें नाहीं । माझें मन नव्हतें जी ठाईं । ह्मणौनि सांगितली गोष्टी पुन्हा हि । सांगा ह्मणे मागुतीं ॥ ३० ॥ मन गेलें असतां बाहेरि । डोळां पाहे सुंदर कुरूप जन्हि । त्यांचा भास नाहीं अंतरीं । उगा चि पाहे टकमका ॥ ३१ ॥ जिव्हेनें नाना रस जन्हि चाखे । तन्हि मन ठाईं नसतां तें सर्व पारिखें । कडु गोड सहसा न वोळखे । तिखट आंबट कीं खारें ॥३२॥ मन जालें असतां बाष्कळ[7] । घ्राणें हुंगे जन्हि नाना परिमळ । तान्हि परिमळ न कळोनि होय विकळ । मन आलिया स्वस्थळासी ॥ ३३ ॥ मन गेलें असतां बाहेरी । त्वचे कोण्ही जन्हि शस्त्रमार करी । तन्हि यासी न कळे ते

१ विनोद. २ वायव्य कर्णिकादळापासून वैराग्य एकदम निराळें होऊन प्रगट झालें. ३ मतीला. ४ मती किंवा बुद्धिबरोबर. ५ वेढे. ६ चकित होऊन. ७ अप्रमाणिक.

अवस्वरीं । मन स्वस्थानीं येतां चि कळे ॥ ३४ ॥ जो जो दशेंद्रियादिक व्यवहार । तो मनाकरितां होय साचार । मन स्वस्थळीं नसतां विचार । बाष्कळ होय सर्व हि ॥ ३५ ॥ मन जेव्हां नाहीं सावध । तेव्हां भोग भोगी जन्हि विविध । परि ते यासी अवघे चि होय स्तब्ध । कांहीं च गोड न वाटे ॥३६॥ मनाची दुसरी भार्या चिंता । तियेसीं मनासी संग करितां । नाना अरिष्टें दुःख शोक वार्त्ता । निजदेहीं उठती ॥ ३७ ॥ मतीसीं जेव्हां संग करी । तेव्हां भोगी सुखाची उजेरी । जेव्हां पहुडे चिंतेचा सेजारीं । तेव्हां होय दुःखा वेरपडें ॥ ३८ ॥ असो या मनाचे विलास सांगतां । ग्रंथ विस्तारेल पैं तत्वता । ह्मणोनियां तें असो आतां । कथार्थ चि चालऊं ॥ ३९ ॥ या मनाचें जें विश्रांतिस्थळ । तें असे अष्टदळ कमळ । त्याचे मध्यभागीं कल्हार असे कंवळ । त्रिरेखान्वित साजिरें ॥ ४० ॥ त्याची प्रथम रेखा आहे स्फटिकवर्ण । वळयांकित साजिरी सघन । तेथ मन जेव्हां होय निमग्न । तेव्हां स्वप्नावस्था प्रगटे ॥ ४१ ॥ तेथ स्वप्नामाजीं देखे नाना पदार्थ । दृष्ट श्रुत अनुमानिक त्र्यर्थ । त्यांचिया योगें सुखदुःखादि व्यर्थ । घडमोडी करी निजांगें ॥ ४२ ॥ तेथ दृष्ट ह्मणिजे जें डोळां देखिलें । श्रुत ह्मणिजे कानीं ऐकिलें । अनुमानिक तें उगें चि स्वप्नीं दृष्टी पडिलें । दृष्टश्रुतावेगळें ॥ ४३ ॥ ऐसें नाना प्रकारें असंभाव्य देखे । क्षणें सुखावे क्षणें पारुखे । तदनुसार भोगी सुखदुःखें । क्षणिक पदार्थेसीं ॥ ४४ ॥ तेथ नाना प्रकारीच्या कल्पना करी । परि त्या व्यर्थ चि होती क्षणाभीतरीं । इतुके प्रथम रेखेवरी मन करी । स्वप्नविळास बहुत ॥४५॥ त्यापुढें द्वितीय रेखा जे असे । ते इंद्रगोपासारिखी आभासे । तिजवरी मन जाऊनि जेव्हां बैसे । तेव्हां सुषुप्ति अवस्था प्रगटे ॥४६॥ सुषुप्ति ह्मणिजे निद्रा केवळ । जे स्वप्नजागृतिहूनि असे वेगळ । तेथ मन होऊनियां निवळ । विश्रांति पावे क्षणेक ॥४७॥ तेथें मनपँव-

---

१ उत्कर्ष. २ स्वाधीन. ३ कमल. ४ कंकणासारखी वाटोळी. ५ सुखापासून विन्मुख होई. ६ इंद्रधनुष्याप्रमाणें. ७ प्राणवायूसीं.

नासी गांठी पडे । तेन्हां वायु सुषुम्नेमाजीं बहुंडे । ते समई मन अत्यंत चि सुरवांडे । सुखें घोरे घरावरां ॥ ४८ ॥ तेथें ज्ञानअवस्था गुप्तरूपें । अज्ञानगर्भी समारोपे । येवं द्वितीय रेखाभिप्राय संक्षेपें । यथाशास्त्र निरोपिला ॥ ४९ ॥ जें जें शास्त्रीं असे सांगितलें । तें चि स्वानुभवदिनकरीं बोलिलें । विनाशास्त्र बोलतां खंडण केलें । पाहिजे जिन्हेचें ॥ ५० ॥ असो तृतीय रेखा असे कमळकल्हारीं । ते सर्वांवैरटिक समत्वें साजिरी । सकळां हि वर्णेसी तिची रंगकुंसरी । क्षणें अवर्ण हि दिसे ॥ ५१ ॥ तेथें जेन्हां मन सुरवाडे । तेन्हां तुर्यावस्थेसी प्रगटणें घडे । जेथें आत्मज्ञानाचें सांकडें । कदापि न दिसे पैं ॥५२॥ तुर्यावस्था ह्मणिजे सर्वसाक्षिणी । जे अवस्थांतर जाणे अनुभवोनि । जागृति स्वप्न निद्रावसानीं । त्रैअवस्थीं जे सावध ॥ ५३ ॥ जागृतिमध्यें जें कार्यकारण घडे । तें चि मिथ्या परि स्वप्नामाजीं उबेडे । सुषुप्तिमाजीं कदापि दृष्टीसी न पडे । हें तिन्ही लक्षणें जाणे तुर्या ॥५४॥ अवस्थांतर ज्ञानाज्ञान । तें तुर्या चि जाणतसे संपूर्ण । त्यांत जें केवळ ज्ञानाचें लक्षण । ते चि तुर्या जाणावी ॥ ५५ ॥ जाणे स्वप्न जाणे सुषुप्ति । जाणे अवस्था मुख्य जागृति । ह्मणौनि सर्वसाक्षिणी ह्मणती । खरें चि ये तुर्येसी ॥ ५६ ॥ अवस्था पंचमी नास्ति । ऐसें बोलतसे श्रुति स्मृति । ज्ञानी उन्मनी जे कां ह्मणती । ते मनाची पक्कदशा ॥ ५७ ॥ ह्मणौनि सर्वांत वर्त्तोन सर्वसाक्षिणी । चाळकरूपें जे सकळ जनीं । मनाची पक्कदशा जे उन्मनी । तें चि रूप तियेचें ॥ ५८ ॥ जे सुषुम्नेमाजीं संचरोनि । इडा पिंगळा मध्य समासनीं । स्वासोस्वासाची करी मवणी । तें चि रूप तियेचें ॥ ५९ ॥ षोडश महावाक्येंसीं स्मरण । नित्य चालवी जे अनुसंधान । सोहं हंसीं जे करी नर्त्तन । तें चि रूप तियेचें ॥ ६० ॥

---

१ मागें फिरतो. २ आनंद पावतें. ३ उद्भूत किंवा स्थापित होते. ४ (?) ५ उद्भवतें. ६ गणना, गणती.

जियेसी ह्मणती सतरावी । जे केवळ विश्वसंजीवनी बरवी । चाळकरूपें विश्वीं वर्ते आघवी । तें चि रूप तियेचें ॥ ६१ ॥ जे येक असोनि दोघांसी खेळवी । येकपणें दोघां समजावी । नामें ठेऊनियां जीवशिवी। तें चि रूप तियेचें ॥ ६२ ॥ असोनि ब्रह्मीची आघवी । आपणा मूळमाया ह्मणवी । सेवटीं अष्टधा होऊनि बरवी । तें चि रूप तियेचें ॥ ६३ ॥ जे ऋग्वेदामाजीं समरसोन । प्रज्ञानमानंदं ऐसें महावाक्य प्रमाण । अहर्निश जे करी स्मरण । तें चि रूप तियेचें ॥ ६४ ॥ प्रज्ञान ह्मणिजे उत्कृष्ट ज्ञान । अहं ब्रह्म ऐसें जें स्मरण । अहर्निश जें कां अनुसंधान । तें चि रूप तियेचें ॥ ६५ ॥ जें यजुर्वेदीं समरसोन। ब्रह्माहमस्मि करी स्मरण । महावाक्याचें करूनि विवरण । तें चि रूप तियेचें ॥ ६६ ॥ सामवेदीं महावाक्य प्रमाण । तत्वमसि ब्रह्मैक्यविवरण । अहं ब्रह्म हें अनुसंधान । तें चि रूप तियेचें ॥ ६७ ॥ जिया अथर्वण वेद प्रमाण । अयमात्मा ब्रह्मैक्यवचन । चतुर्वेदीं महावाक्यविवरण । तें चि रूप तियेचें ॥ ६८ ॥ यावेगळीं द्वादश गणन। महावाक्यांचें प्रमाण । त्यांचा विचारितां अर्थ गहन । तें चि रूप तियेचें ॥ ६९ ॥ विज्ञानमानंदं ब्रह्म । सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म ।पुरुषः स एव खं ब्रह्म। तें चि रूप तियेचें ॥ ७० ॥ ॐमित्येकाक्षरं ब्रह्म । तत्तदसि तादात्म ब्रह्म । सर्व खलु इदं ब्रह्म । तें चि रूप तियेचें ॥७१॥ परोरजसे सावदों ब्रह्म । येकमेवाद्वितीयं ब्रह्म । परात्परतरं ब्रह्म । तें चि रूप तियेचें ॥ ७२ ॥ चैतन्यमात्रममूर्तं ब्रह्म । तथा सच्चिदानंद ब्रह्म । सोहंहंसाक्षरं ब्रह्म । तें चि रूप तियेचें ॥ ७३ ॥ असो शुद्धसत्वीची जे इछाशक्ति । प्रणवींची ध्वनिरूप अर्द्धमात्रा व्यक्ति । सर्वेश्वराची जे मूळमाया प्रकृति । तें चि रूप तियेचें ॥ ७४ ॥ चौथें देह महाकारण । तुर्यावस्थेचें परिमाण । प्रत्यगात्मा अभिमान । तें चि रूप तियेचें ॥७५॥ अर्द्धमात्रा मूर्ध्निस्थान । आनंदावभास भोगा-

---

१ जे सतरावी जीवनकळा।. २ जीवशिवास. ३ ध्यान. ४ दासबोध द० ७ स० ३ यांत ब्रह्माचीं चौदा नांवें दिलीं आहेत.

यतन । इच्छाशक्ति शुद्धसत्वगुण । तें चि रूप तियेचें ॥ ७६ ॥ स्वानुभवदिनकरीं संपूर्ण । षोडश महावाक्यांचें विवरण । दिनकर रामदासीं अभिन्न । तें चि रूप तियेचें ॥ ७७ ॥ असो मनाचें सांगतां उन्मन । प्रसंगें तुर्येचें आठवलें लक्षण । तूं आम्हां आवडसी गहन । ह्मणौनि न पुसतां सांगितलें ॥ ७८ ॥ इतुकें बोले जवं गुरुराणा । तवं शिष्य लागे गुरुचरणा । ह्मणे स्वामी लीळा तुमची कळेना । मज पामरासी ॥ ७९ ॥ मी येकदेशी अतुर[1] पामर । तुह्मी सर्वज्ञ जी सर्वेश्वर । हेळामात्रें[2] ब्रह्मसाक्षात्कार । केला स्वसंवेद्य मज ॥ ८० ॥ जी काय माझी तुह्मां असे भीड । जे तुह्मी मज सांगतसां हें घबाड[3] । येकायेकीं अविद्याझुंबाड[4] । निरशिलें माझें सकळ ॥ ८१ ॥ आतां यासी कांहीं हों ह्मणे उत्तीर्ण । तवं पहिलें चि ठेविलें पोटीं मज सांठऊन । आतां त्रिपुटीसहित मीतूंपण । सगळें चि नाहीं जी ॥ ८२ ॥ स्वामीनें बोलिलें निरूपण । तेणें आह्मी येकसरी[5] चि ब्रह्मसंपन्न । हें सामर्थ्य नव्हे असाधारण । यासीं ब्रह्मांड न तुळे ॥ ८३ ॥ परि येक असे जी अनुमान[6] । तेणें मी बहुत असंक्षीण । तो संदेह फेडावया समर्थ कोण । स्वामीवेगळें आणिक ॥ ८४ ॥ जी मनाचें जालियां उन्मन । देहीं सकळ चाळणा करी कोण । आणि शरिराचें पाळण पोषण । हें चाले कैसेन जी ॥ ८५ ॥ ऐकोनि शिष्याचा प्रश्नादर । सद्गुरु करुणाघन अति उदार । कृपामृतें वर्षोनि अपार । स्वानुभवदिनकरीं ॥ ८६ ॥ शिष्यासी ह्मणे श्रीगुरुराव । काय तुझा असे अभिप्राव । तो बोल पां तूं स्वयमेव । स्वसुख आपुलें ॥८७॥ ऐसी गुरुआज्ञा होतां शिष्यासी । सुखावोनि बोले संतोषीं । ह्मणे स्वामी मन आलियां उन्मनत्वासी । पुढें स्थिति होय कैसी ॥ ८८ ॥ ज्याचें मन जालें उन्मन । त्याचें कोण करी कार्यकारण । या शरिराचें पाळणपोषण । होय कैसेनि तयाचें ॥८९॥ वाक्य ऐकतां चि प्रश्नाचें । श्रीगुरु निधान निजकृपेचें । ह्मणे सगया

१ आतुर, उतावीळ. २ क्षणमात्रांत. ३ अलभ्य गोष्ट, अतिशय मोठी गोष्ट. ४ अविद्येचा गड्डा. ५ एकदम, एकाएकी. ६ शंका, संशय.

काय कौतुकाचें । पुसणें पुससी ॥ ९० ॥ अरे जो स्वयें अमर जाला । लोकमरणाची काय चिंता त्याला । जो स्वयंतृप्त ब्रह्मसाम्यतेसी आला । त्यासी अविद्याभय कायसें ॥ ९१ ॥ बैसोनियां सार्वभौमपदीं । झोळी-काठीची कायसी आधि । तारुं जें तरणार उदधी । त्यासी मृगजळाचें भय काय ॥ ९२ ॥ तेवि शुद्धसंकल्पात्मक जें अंतःकरण । तें विकल्परोधें जालें होतें मन । त्या विकल्पाचें जालियां दहन । संकल्प सहजें निमाला ॥ ९३ ॥ कापुस शुद्धबुद्ध असतां । त्यासी स्पर्श नाहीं पैं तत्वता । त्यास चि पीळ भरलियां स्वभावता । स्पर्श मानी भलता चि ॥ ९४ ॥ तो चि पीळ पुन्हां उकलतां । कापुस चि तो स्पर्शे भलता । तेवि वृत्तीसी जालियां निर्विकल्पता । ब्रह्म शुद्ध होय सहजें चि ॥ ९५ ॥ जेव्हां हा ब्रह्मसाम्यतेसी आला । तेव्हां देहपणें कोठें राहिला । आणि त्याच्या पाळणपोषणाला । चालवणें कायसें ॥ ९६ ॥ आधीं तेथ देहपण खरें असावें । मग त्याचें पाळण पोषण सत्यत्वें करावें । तरि पहिलें आधीं देहाच्या चि नावें । शून्याकार दिसे ॥९७॥ तथापि जैसें असेल देहप्राक्तन । तैसें चि घडेल पाळणपोषण । त्याची सोसणी इतुकी आपण । कासयासी करावी ॥ ९८ ॥ इतुकें श्रीगुरूचें वाक्य ऐकतक्षणीं । शिष्य सुखावला निज अंतःकरणीं । वृत्ति गेली सस्वरूपीं समरसोनि । मन आलें उन्मनत्वासी ॥ ९९ ॥ परब्रह्म जें सत्य सनातन । स्वसंवेद्य निर्विकार निर्गुण । आत्मा तदाकारें लयगत होऊन । ब्रह्मैक्यबोधें सहजस्थिति ॥ १०० ॥ तेथ समाधीसी पडिलें ठर्क । निजमोक्षपदासी आलें बीक । स्वानुभवदिनकरीं कौतुक । सुख-संतोषीं ऐक्यता ॥ १ ॥ निजशांतीचें कवच ल्याला । सहजस्थिति सुखासनीं आरुढला । क्षमेचिया खड्गें सरसावला । निर्दळिलें जन्ममृत्यु ॥ २ ॥ मग कार्यकारणता स्वात्मसुखेंसीं । येणें जाणें सहजस्थितीसीं ।

---

१ मनोव्यथा, चिंता. २ समुद्र. ३ मध्यें विकल्पानें रोधल्यामुळें. ४ मूळच्या स्थितींत झ० सरकी न काढलेला. ५ स्पर्शाचा विटाळ. ६ झावरेपणा ७ निद्रिस्त. ८ कमीपणा झाला, बंद झाली. ९ सौंदर्य, शोभा.

स्वानंदाचिया सामराज्येंसीं । स्वानुभवदिनकरीं ॥ ३ ॥ असो ऐसा स्वानुभव लाधोन । दिनकर रामदासीं सुखसंपन्न । ह्मणे स्वामी मोक्ष असे किंलक्षण । तो सांगितला पाहिजे ॥ ४ ॥ इतुकी शिष्यप्रश्नोक्ति ऐकोन । श्रीगुरु सुखावोनियां संपूर्ण । ह्मणती स्वानुभवदिनकरीं परिछिन्न । पुढील कीर्ण अनुवादेल[1] ॥ १०५ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरु-शिष्यान्वये पंचदश कळापे मनउन्मनस्थिति तुर्यालक्षण षोडश महावाक्य-निरूपणं नाम द्वितीय कीर्ण प्रकाशः ॥ २ ॥ श्रीराम जयराम जयजयराम ॥

## ॥ श्रीराम ॥

तेथ द्वितीय कीर्णप्रांतअस्ताचळीं । शिष्यप्रश्नरूप मावळलीयां अंशुमाळी[2] । तो अकस्मात वक्षमाण कीर्ण उदयाचळीं । प्रतारण[3]प्रकाशें उदेला ॥ १ ॥ नों[4] तो शिष्यमुखीं मोक्षप्रश्नचंद्रोदय गहन । होतां श्रीगु-रुक्षीरार्णवीं भरितें चढोन । कृपामृतें अमर्याद उचंबळोन । शिष्यचंद्रा आळंगिजे ॥ २ ॥ श्रीगुरु ह्मणतिलें निजशिष्यासी । तुवां पुसिलें मोक्ष-लक्षणासी । तरि बद्धतेचें लक्षण आधीं आह्मांसी । साकल्य सांगें झड-करीं ॥ ३ ॥ तरि बद्ध ह्मणिजे पहिलें काय । याचा आधीं तूं समजोनि अन्वय । मग सहजें चि मोक्षाचा अभिप्राय । न सांगतां तूं जाणसी ॥ ४ ॥ इतुकें स्वामीचें निग्रहवाक्य ऐकोनि । शिष्य विचारूनि पाहे अंतःकरणीं । तवं बद्धता कैसी आहे ते यासी स्वप्नीं । पाहातां न दिसे कदापि ॥ ५ ॥ ह्मणे मी देहपणें होता बांधला । वरि माझेपणें गुंडा-ळला । तो तत्वनिराशें मोकळा जाला । महावाक्यविवरणेंसीं ॥ ६ ॥ तेथ महावाक्याचा जेन्हां विवर[5] जाला । आत्मानुसंधानें स्वरूपीं समर-सला । तेन्हां चि मोक्षासगट बंध निरशला । श्रीगुरूचिये कृपादृष्टीं ॥ ७ ॥ ऐसें बंधमोक्षाचें लक्षण असोनि । मी श्रीगुरूसी काय पुसे

---

१ व्याख्यान करील. २ सूर्य. ३ प्रतारण=फसवणुकीचा, चढाओढीचा. ४ किंवा. ५ विवरण.

वेडेपणीं । तथापि असेल कांहीं विशेष करणी । तरि ते पुसों स्वामीप्रति ॥ ८ ॥ ऐसें विचारूनियां मानसीं । स्वानंदें बोले श्रीगुरूसी । ह्मणे नाइकतां स्वामीचिया वचनासी । संदेह न फिटे आमुचा ॥ ९ ॥ ऐकोनि शिष्यवाक्य करुणापर । श्रीगुरु कृपाघन बोळला साचार । ह्मणे बापा मोक्षलक्षणाचे प्रकार । बहुतीं बहुत केले असती ॥ १० ॥ तरि ते आपसिद्धांत दर्शनें । पृथुकाकारें कीजतील निर्शनें । श्रोतीं सावध होऊनि आकर्षणें । अर्थान्वयातें आद्यंत ॥ ११ ॥ येक ह्मणती मोक्ष आपला आपण । येक ह्मणती कर्मीं चि मोक्ष प्रमाण । येक ह्मणती करावें देवभजन । येक सहजमोक्ष ह्मणती ॥ १२ ॥ येकीं मुक्त केले यथेष्टाचार । येकांचा येकदेशी विचार । येक ते स्वसिद्धांतानुसार । वेष चि धरूनि बैसले ॥ १३ ॥ कित्तेक ह्मणती गुरुवचन निश्चयें मोक्ष । कित्तेक ह्मणती सर्वब्रह्म परीक्षणें हा चि मोक्ष । कित्तेक ह्मणती निरावयव वस्तु[2] न पाहातां प्रत्यक्ष । मोक्ष कैंचा प्राणियासी ॥ १४ ॥ कित्तेक ह्मणती साकारासी नाश आहे । आणि निराकारा शून्यत्वें निर्गुण पाहे । या उभयपक्षविहीन वस्तुज्ञान न लाहे । तववरि यासी मोक्ष कैंचा ॥ १५ ॥ कित्तेक बोलताती वचन । सकळागमशास्त्र पाहिल्याविण । मोक्ष काय जाणे बापुडें अवित्पन्न । व्याकरणसिद्धिवांचूनि ॥ १६ ॥ कित्तेक बोलताती आपुले ठाईं । अहो ज्याचा पडदा[3] चि फिटला नाहीं । स्वाचार नानाचार त्यागेंविण कांहीं । मोक्षप्राप्ति न घडे ॥ १७ ॥ कित्तेक ह्मणती नाना वांछा विकल्प । दुरी न होतां मोक्ष कैसा जाला स्वरूप । येक ह्मणती कासया करितां वाग्जल्प । मनपवनरोधेंविण[4] मोक्ष कैंचा ॥ १८ ॥ कित्तेक ह्मणती महावाक्याचें विवरण । साकल्य कीजे तो चि मोक्ष प्रमाण । हा प्रत्यक्ष चि प्रमाण याचा अनुमान । काय करणें लागलें ॥ १९ ॥ येक ह्मणती मद्यमांसस्वादनोन्माद । हा चि मोक्ष होय पैं स्वतसिद्ध । येक ह्मणती सुरतक्रीडा विभ्रमानंद[5] ।

---

१ शास्त्रांतील सिद्धांत. २ निराकार ब्रह्म. ३ संशय. ४ प्राणायामावांचून. ५ विभ्रम=चेष्टा.

जालियां मोक्ष सहजें चि ॥ २० ॥ येक ह्मणती मोक्ष ह्मणिजे दृश्यादृश्य-त्याग । येक ह्मणती मोक्ष ह्मणिजे स्वानंदबोधसंयोग । येक ह्मणती मोक्षाचें नाहीं अवगेला[1] सोंग । तोंवरि बोलिल्यां काय होतें ॥ २१ ॥ येक ह्मणती भस्मोद्धळन जटास्थाप मौन । त्या नांव मोक्ष हें प्रत्यक्ष प्रमाणवचन । येक ह्मणती जप तप दान तीर्थाटण । कारितां सहज चि मोक्षप्राप्ति ॥ २२ ॥ येक ह्मणती अहिंसा केशोत्पाटन[2] । हें मुख्य मोक्षाचें लक्षण । येक ह्मणती यज्ञीं केलियां पशूचें हवन । मोक्ष लाभे तत्काळ ॥ २३ ॥ ऐसे दर्शनभेद असंख्यात । संकल्प-विकल्परूप कीरती बहुत । परंतु मोक्ष कोण्ही हि किमपि न पावत । तत्वज्ञानेंवांचून ॥ २४ ॥ सांख्य[3] वैष्णव पूर्वमीमांसकें[4] । शैव पाशुपत संन्यासी स्नातक[5] । जंगम गाणेश बौद्ध चार्वाक[6] । शाक्त कौळादिक[7] सर्वहि ॥ २५ ॥ आचार्यें दीक्षित नग्नव्रत । तापसी तीर्थाटणी जप-मौनानिरत । अनशनी[8] देहदमनी दत्तावधूत । शास्त्रवेत्ते षड्द-र्शनी ॥२६॥ असो ऐसीं नाना मत्तमत्तांतरें । सांगतां असती असंख्य अपारें । परि मोक्षप्राप्तीचिया समयावसरें । येक हि न थारे जवळी ॥२७॥ तरि जोंवरि हा संकल्पविकल्पें बांधला । मीमाझेपणें भांबावला । तोंवरि खरेपणेंसीं मोक्षाला । जाणितलें पाहिजे ॥ २८ ॥ जेवि समुद्रीं मीठ निर्माण जालें । नसतेपणें चि कठिणत्वें भासलें । तें चि पुन्हा उदकीं जरि मिळालें । तरि मीठपण वाव त्रिपुटीसी ॥ २९ ॥ तेंवि त्रिगुणपं-चभूतांचिया संगें । परमात्मा नसतें जीवपण अव्रगे । तें चि तत्वनि-रासें जीव परमात्मा निजांगें । परब्रह्मीं समरसे ॥ ३० ॥ मी देहपणें जोंवरि होता भ्रमला । तोंवरि बंधमोक्षामाजीं सांपडला । तत्वनिरासें परब्रह्म संचला[9] । तेथ बंधमोक्षेंसीं विगत[10] ॥ ३१ ॥ पांचा भूतांचीं पंच-वीस तत्वें । येकवटलीं होतीं पृथकत्वें । तें विवेकें निरशतां चि ऐक्यत्वें ।

---

१ अवगतणें=अवलंबणें, किंवा अवगणें अथवा अवगमणें=भासणें. २ जैन-धर्मी मत असावें. ३ द्वैतवादी. ४ कर्मश्रुति प्रधान मानणारे. ५ भिक्षु. ६ देहात्मवादी. ७ वैदिकतांत्रिकमिश्र क्रिया आचारणारे. ८ निराहारी. ९ झाला. १० मुक्त.

परब्रह्मीं सहजस्थिति ॥ ३२ ॥ ब्रह्मीं आलियां येका हारी । तेथ कैंची बंधमोक्षाची वारी । स्वसंवेद्य स्वानुभवदिनकरीं । अंतर्बाह्य सहजस्थिति ॥३३॥ ऐसें बंधमोक्षाचें साकल्य लक्षण । शिष्यें ऐकोनियां सहजस्थिति संपूर्ण । तेणें स्वानुभवदिनकरीं सुखावोन । काय उद्गार देतसे ॥ ३४ ॥ जी जी सद्गुरु निष्कामकामा । परमपुरुषा आत्मयारामा । अंतर्बाह्य व्यापक तूं सर्वोत्तमा । शरणागतवत्सला ॥ ३५ ॥ तुझिया स्वरूपाचा विचार । तुजवीण न कळे हा निर्द्धार । ह्मणौनि करावया दीनोद्धार । तुज अमानुषी मनुष्यत्व ॥ ३६ ॥ जी ईश्वरेश्वर आहेसी खरा । परि सुसेव्य आह्मालागीं करुणाकरा । करूनि अद्वयानंदप्रतिकारा । निज-कृपां शिष्य अंगिकारिसी ॥ ३७ ॥ जैसें बाळकाबरोबरी सक्रपें । चालों बोलों लागिजे बापें । खडे मांडूनि लिहिविजे साक्षपें । तैसी करिसी शिष्यसंस्था ॥ ३८ ॥ जी तूं असोनि सर्वसंगपरित्यागी । परि कारुण्यें होसी शिष्यानुरागी । सम्यक् प्रकारें विज्ञानवान् योगी । अयो-गी सांभाळिसी ॥ ३९ ॥ नवल तुमचा कृपाकटाक्ष । प्रत्यक्ष अनुभवि-तसे अपरोक्ष । ब्रह्म चि करणें येकदेशी मुमुक्ष । हें अनुपम्य औदार्य ॥ ४० ॥ इंद्रादि देवांसी जैसें भजावें । तैसें चि तिहीं भजनासारिखें फळ द्यावें । विधानलोपीं दुःखें कां छळावें । ह्मणौनि पदप्राप्तिद तें भजन ॥४१॥ सद्गुरुराया तुझी प्रसिद्ध कीर्ति । भजनीं भावें चि मानिसी पूर्त्ति । भजनाभिमुखँ होतां चि विघ्नशांति । करूनि देसी निजपदा ॥ ४२ ॥ कल्पतरु कामधेनु चिंतामणी । उदारें होतीं वर्णिलीं पुराणीं । परि सायोज्यता आणि पुनर्याचा सिराणी । निरशूं कोण्ही न शकती ॥४३॥ बाप सद्गुरुसमर्थ दाता । शिष्ययाचकां दे निर्गुणसायोज्यता । तो कैवल्यदानी होऊनि स्वता । अनेकांचें याचकत्व निरशी ॥ ४४ ॥

---

१ फेरी. २ ब्रह्मैक्यसुखाचा नित्य अनुभव घेत असतांना केवळ आपल्या शिष्यावर कृपा करण्याकारितां च आपलें तें सुख क्षणभर बाजूस ठेवतोस असा तूं. ३ शिष्य-समुदाय. ४ शिष्यांवर प्रीति करणारा. ५ इंद्रियगोचर. ६ पूर्णपणा किंवा संतोष. ७ भजनाकडे वृत्ति वळताक्षणीं च. ८ श्रेष्ठता, महत्त्व, उपभोग.

मेघीं औदार्य असे परि सामान्य । अनावृष्टीनें तत्काळ दुःख दैन्य । सद्गुरु दानशूर सामर्थ्यें अति धन्य । सदानंदप्रदाता ॥ ४५ ॥ करितां सद्गुरूचें स्तवन । शेषामुखीं निःशेष मौन । परादि[1] परतल्या आणि मनासी उन्मन । होय ऐश्या श्रुति गर्जती ॥ ४६ ॥ ऐसिया सद्गुरु देवादिदेवा । उत्तीर्ण[2] व्हावें कवणिया सेवा । जेणें ब्रह्मरूप केलें प्राकृतां जीवां । कृपाकटाक्षेंकरूनि ॥ ४७ ॥ जो शाश्वत सिंधु दे सकळ । त्यासी काय उतराई व्हावया मृगजळ । किं कल्पतरु देईल त्यासी फळ । वोडंबरी[3] आंबियाचे ॥ ४८ ॥ तथापि शिष्य अवंचेंकस्थितीं[4] । समर्पिजे श्रीगुरूसी सर्व संपत्ति । तें गौण चि होय परि भजनरीतीं । प्रेमभावें संतोषे ॥ ४९ ॥ जैसें बाळक जेवितां बापाबरोबरी । ताटींचें कवळें[5] घाली त्याच्या मुखाभीतरीं । तें त्याचें चि ह्मणौनि स्वीकारी । प्रेमभरें संतुष्ट ॥ ५० ॥ तें चि जरि वंचूं[6] लागे त्यासी । तरि आपण चि मुके सांगातांसी[7] । हे अवंचक स्थिति बाणली ज्यासी । त्यासी जाली गुरुकृपा ॥ ५१ ॥ सद्गुरु औदार्येंसीं परिपूर्ण । होऊनि उपदेशितां हि लक्षांशींचें ज्ञान । परंतु स्वानुभवादिनकरीं पूर्ण समाधान । स्वानुभवें चि कीं शिष्यासी ॥ ५२ ॥ तें स्वतसिद्ध अनुभवनिधान । पावोनि गुरुकृपेचें अंजन । अनन्यभावेंसीं पूर्णपण । गुरुदास्यविषईं ॥ ५३ ॥ ह्मणौनि जी श्रीगुरु महाराजा । कैवल्यदानाचिया भोजां[9] । तुह्मीं माझा निरसिला वोजें[10] । संसारभ्रम अनादि ॥ ५४ ॥ होतों पडिलों शक्तिचक्रें[11]मेळीं । मज येकासी पंचभूतबाधेची आकळी[12] । सद्गुरु तूं पंचाक्षरी अतुबेळी । येकें चि अक्षरें उपचारिलें ॥ ५५ ॥ येकाक्षराची करूनि कडसणी[13] । निःशेष केली भूत-

१ परादि चत्वार वाचा. २ उतराई, ऋणमुक्त. ३ गारुडी विद्येनें उत्पन्न केलेल्या. ४ सरळ बुद्धीनें, प्रामाणिकपणानें ५ ग्रास. ६ फसवूं. ७ सहवासास. ८ सद्गुरुकडून ज्ञानप्राप्ति झाली, तरी त्या गुरूपदेशांतील तत्वाचा स्वतः अनुभव घेतल्याखेरीज शिष्याचें पूर्ण समाधान होणार नाहीं. ९ मला कैवल्यपदप्राप्ति व्हावी या आवडीनें. १० चांगल्या रीतीनें. ११ मायाचक्राच्या संयोगांत. १२ तिडिक आसडा. १३ पिशवी अगर बटवा आवळण्याची दोरी.

झाडणी । मज मी चुकलों होतों निर्वाणीं । त्या भेटविलें मज मातें ॥ ५६ ॥ परि तें माझें सत्यस्वरूप मज नाकळे । कां जे असत्य प्रपंचें मन जालें आंधळें । तरि आतां तें चि निरंतर निवळे । स्वरूपसमावेशेंसीं ॥५७॥ ऐसें मज सांगिजो जी गुरुनाथा । ह्मणौनि श्रीचरणीं ठेविला माथा । तवं कृपासिंधु ह्मणे कृतार्थता¹ । वछासी इछा अनुपम्य ॥५८॥ अरे जें देवादिकांसी दुर्भिळ । जें अनंत जन्मानुष्ठानाचें फळ । तें तूं पावलासी गा निर्मळ । परब्रह्मस्वरूप ॥ ५९ ॥ मोहरी गोशृंगावरी जोंवरि थारे । तवंवरि हि जरि स्वरूपीं मन भरें । तरि उभयकुळपूर्वज निर्द्धारें । उद्धारातें पावती ॥ ६० ॥ तरि तूं गा सुपुत्र पूर्वजत्राता । धन्य धन्य गा तुह्मी माता पिता । तुवां निरशिलें गा पुनरागतां² । ब्रह्मसाक्षात्कारेंसीं ॥ ६१ ॥ परंतु आतां तुझें असे मनोगत । जें ब्रह्म अनुभविलें शाश्वत । तें चि होऊनि राहों चित्त सतंत । ऐसें तुवां प्रार्थिलें पैं ॥ ६२ ॥ तरि परम कल्याण असो तुज । तुवां स्वानंद सखया स्मरविला मज । बा रे तुझेनि योगें प्रगटे सहज । सोहळा³ स्वानुभवदिनकरीं ॥ ६३ ॥ जेवि कां बाळकासी द्यावया स्तनपान । आधीं मातेसी मिळे सावकाश भोजन । किंवा दुजयासी दाखवितां निधान । आधीं आपण देखिजे ॥ ६४ ॥ तरि स्वरूपस्थितीचें मुख्य कारण । आधीं आकळिलें पाहिजे मन । मनोजय होतां स्वरूपसमाधान । सहजस्थिति पावसी ॥ ६५ ॥ या मनाचा स्वभाव परम चंचळ आहे । मन क्षण तें हि निश्चळ न राहे । अवस्तूसी वस्तुत्वें पाहात राहे । आणि वस्तु विसरे तत्काळ ॥६६॥ ह्मणौनि हें चित्त जिंकिलियांविण । जितुकें साधन तितुका सीण । अभिनिवेशासीं च होय कारण । तेथ परमार्थ कैंचा असे ॥ ६७ ॥ पाहा केव्हडा या चित्ताचा चमत्कार । महा तपस्वियां हि तत्काळ करी

१ शिष्यास कृतार्थ करण्याच्या हेतूनें. २ येणें जाणें, जन्ममरणाचे फेरे. ३ उत्साह. ४ या नश्वर देहास चिकटून राहण्याच्या मोहास.

असुर । आणि गृहस्थाश्रमियांसी करूनि योगेश्वर । दैवी संपत्ति त्या देतसे ॥ ६८ ॥ अहो नव्हतां[1] चित्त हें अपवर्ग[2] । त्रिभुवनविजयासी होती उपसर्ग[3] । नहुषें पावलियां हि वारि स्वर्ग । चित्तें तत्काळ पाडिला ॥ ६९ ॥ पाहातां मुळीं ब्रह्म निर्गुण निर्विकल्प । तेथें चित्तें चि कीजे प्रपंचसंकल्प । तें मन वश्य जालियांविण वाग्जल्प । कासयासी वृथा कर्त्तव्य ॥ ७० ॥ असो करावयासी[4] मनोजय । मुख्य पाहिजे संतसंगाची सोय । सत्संगें वासनात्यागाचा अन्वय । सहजें चि साधे ॥७१॥ जालियां वासनेचा शुद्ध त्याग । प्राणायाम साधे सहज अष्टांग । पुढें आत्मानुसंधानें होय अव्यंग । ब्रह्मसाक्षात्कार सहजें ॥ ७२ ॥ येवं मनोजयाचे च्यार प्रकार । साधलियां सहजें मन होय स्थिर । मन स्वरूपीं स्थिर जालियां तदाकार । काय होणें असे पैं ॥ ७३ ॥ जेवि जळीं पडतां ते जळगार । तयेसी विलंब नाहीं होतां नीर । तेवि मन जालियां सस्वरूपीं स्थिर । स्वरूपसमावेशें उन्मन ॥ ७४ ॥ अहो स्वरूपाचिया व्यापकपणापुढें । मनाचें चंचळपण केवढें । मन येकदेशी अल्प बापुडें । तें कुंठित होय तत्काळ ॥ ७५ ॥ जोंवरि पांवे[5] समुद्राचें आंग । तोंवरि गंगेचें चंचळपण चांग । समुद्रीं मिळालियां निश्चळ अभंग । तेवि सस्वरूपीं मन होये ॥ ७६ ॥ ऐसा स्वरूपसमावेश होतां चि । शिष्य स्वानंदीं निमग्न सहजें चि । मनासी उन्मनता होऊनि साची । सहजस्थिति प्रकाशे ॥ ७७ ॥ तया प्रकाशाचये[6] निजलाहें । स्वानुभवदिनकरीं उभऊनि बाहे[7] । ह्मणे स्वामी तुमचिया कृपां आहे । स्वसंवेद्यपणें ॥७८॥ परंतु येक असे जी मनीं संशय । जे जगज्जोति ह्मणिजे काय । आणि सृष्टिक्रमाचा समूळ अभिप्राय । मज सांगितला पाहिजे ॥७९॥ ह्मणती ब्रह्मा सृष्टीची उत्पत्ति करी । विष्णु प्रतिपाळी परमादरीं । तैसा चि शंकर संव्हारी । क्षण न लागतां सकळ ॥ ८० ॥ तरि याची

---

१ न होतां, नसतें तर. २ बंधमोचक, मुक्तिदायक. ३ विघ्नें. ४ अध्यात्मविद्याधिगमः साधुसंगम एव च । वासनासंपरित्यागः प्राणस्पंदनिरोधनम् ॥ हे मनोनाशाचे चार उपाय आहेत. ५ समुद्र गाठीपर्यंत. ६ सहजस्थितीच्या प्रकाशाचा लाभ झाल्यामुळें. ७ बाहू.

कैसी असेल जी गति । काय ते स्वयें चि येऊनि कार्य करिती । किंवा कोण्हा हातीं करविती । कीं हें लटिकें चि अवघें ॥ ८१ ॥ तरि याची कैसी असेल गोष्टी । ते सांगितली पाहिजे परिपाठी । हें शिष्यवाक्य ऐकोनि श्रीगुरु संतुष्टीं । निजकृपां सांगिजेल ॥ ८२ ॥ तेथ प्रथम वृत्तीचें जें स्फुरण । तो चि जाणीवरूपें सत्वगुण । जाणीवनेणीवमिश्रित रजोगुण । केवळ नेणीव तो तम ॥ ८३ ॥ देहीं जाणीवरूपें केवळ सत्वगुण । जाणीवनेणीवेसीं रजोगुण मिश्रलक्षण । केवळ संचलें जें कां नेणपण । तो शरीरीं तमोगुणांश ॥ ८४ ॥ प्राणी जाणीवनेणीवेसीं होतां मिश्रित । शरीरमात्रीं काम निर्माण होत । तेणें सचराचरीं उत्पत्ति चाळत । रजोगुणाचिया आश्रयें ॥ ८५ ॥ सवें चि जाणीवरूपें सत्वगुण प्रगटे । तेणें जाणपणें प्राणी वाढे वेंठे[2] । शरीररक्षणाचिये उत्कंठें । जाणजाणों उपाय करी ॥ ८६ ॥ नानापरी युक्ति चाळणा । जाणपणें करी शरीररक्षणा । सवें चि त्यामाजीं प्रगटतां नेणपणा । शरीर नाशे तत्काळ ॥ ८७ ॥ नेणपणें प्राणी दुश्चित्त । असतां अकस्मात होय घातपात । किंवा नाना आधि व्याधि निर्माण होत । त्याचा उपाय नेणतां प्राणी खचे ॥ ८८ ॥ असो जाणीवरूपें सत्वगुणी अंतःकरण । तें चि या विश्वाचें करी प्रतिपाळण । मिश्र बुद्धीसी उत्पत्ति रजोगुण । अहंकार तमोगुणें संहार ॥ ८९ ॥ तो चि अंतःकर्ण सत्वगुणी विष्णु प्रगटला । मिश्र बुद्धीचे ठाईं रजोगुण ब्रह्मा जाला । अहंकाररूपें तमोगुणी शंकर जन्मला । एवं जाणीव मिश्र नेणीव रूपें ॥९०॥ ह्मणौनि जाणीवनेणीवमिश्रित रजोगुण । यायोगें ब्रह्मा सृष्टि करी निर्माण । जाणीवरूपें जो कां सत्वगुण । तो विष्णुरूपें प्रतिपाळी ॥ ९१ ॥ पुढें केवळ नेणीवरूपें तमोगुण । तो चि शंकर संहारी त्रिभुवन । एवं ब्रह्मा विष्णु आणि त्रिनयन । करिती उत्पत्ति स्थिति प्रळय ॥ ९२ ॥ असो यानंतर प्रथम । जें निर्विकल्प स्फुरण निःसीम । जें कां सूक्ष्मदृष्टि शबळ व्योम । शुद्ध-

---

१ रीत. २ वेंठणें=वेष्टणें.

सत्त्वात्मक ॥ ९३ ॥ तो शुद्धावकाशीं प्रणवरूप । अर्द्धमात्रात्मक मूळमायेचा संक्षेपं । अर्द्धनारीनटेश्वर स्वरूप । जगज्जोति बोलिजे त्यासी ॥ ९४ ॥ ते जगज्जोति चित्कळा ज्ञप्ति । ध्वनिरूप अर्द्धमात्रा गुणसंवित्ति । विश्वसंजीवनी लोकनियंती । जगदीश्वरी जगद्रूपा ॥ ९५ ॥ ज्ञानकळा तुर्या सर्वसाक्षिणी । सत्ता मूळमाया गुणक्षोभिणी । पिंड ब्रह्मांड सचराचर व्यापूनि । येकांशें जे वर्त्ततसे ॥ ९६ ॥ जे पुरुष स्त्री ना नपुंसक । येकास चि त्रिविध नामाचें कौतुक । त्रिविध प्रकारीं भासोनि निष्टंक । वेगळेपणें विलसे ॥ ९७ ॥ जें नपुंसकनामें येकाक्षर ब्रह्म । पुरुषनामें सर्वेश्वर निभ्रम । स्त्रीनामें सर्वसाक्षिणी निःसीम । त्रिविध असोनि भिन्नत्वें ॥९८॥ असो अनंत नामें अनंत गुण । अनंतरूपीं विराजमान । कर्मेंसीं सांगतां असाधारण । न पुरवे वेद बोलतां ॥९९॥ अनंत अवतारीं अनंत शक्ति । अनंत पराक्रम अनंत व्यक्ति । पिंडब्रह्मांडाचिया नाना युक्ति । रची खची स्वलीळा ॥ १०० ॥ जियेपासाव सत्व रज तम । पृथ्वी आप तेज वायु व्योम । अष्टधा कर्दम करूनि उत्तम । आपण खेळवी तयासी ॥ १ ॥ जयेचिया येकांशें सृष्टयादि व्यवहार । स्थावर जंगम सचराचर । अनंत ब्रह्मांडाचे घेऊनि फेर । आपण राहे वेगळी ॥ २ ॥ अंशसत्ता जीपासूनि हेलावे । तियेसी पडलीं पांच नावें । प्रथम शुद्धसंकल्पेंसीं वृत्ति उठावे । तियेसी अंतःकरण ह्मणती ॥ ३ ॥ पुढें संकल्पाचा होय विकल्प । तेव्हां मन ऐसा बोलिजे संक्षेप । पुढें वृत्तीचा निश्चय होतां आरोप । बुद्धिलक्षण बोलिजे ॥ ४ ॥ पुढें वृत्तीसी होतां चेतव्य । चित्त ऐसें ठाके नामपाटव्य[3] । पुढें वृत्तीसी उद्भवे अहंकर्त्तव्य । तो अहंकार बोलिजे ॥५॥ द्विदळीं अहंकाराधिष्ठान । चित्तें आक्रमिलें मूर्ध्निस्थान । विशुद्धीं बुद्धि अनाहतीं मन । अंतःकर्ण तें मणिपुरीं ॥ ६ ॥ ते चि वृत्ति सरसावली । वायुसंगें पंचधा फांकली । व्यानरूपें चाळकपणें व्यापली । सर्व शरीरामाजीं ॥ ७ ॥ समानरूपें नाभिस्थानीं । प्राणरूपें हृदयभुवनीं । अपा-

१ ॐ हें च मूळमायेचें अविस्तृत स्वरूप; यापासून पुढें मायेचा विस्तार झाला आहे. २ चेतना. ३ पटुत्व.

नरूपें गुदीं राहोनि । उदानत्वें कंठगत ॥ ८ ॥ ते चि वृत्ति श्रोत्रीं बैसोनि । शब्दविषय आइके श्रवणीं । वाचेसी बैसे शब्दोच्चारणीं । बावन मातृका ॥९॥ त्वचेसी बैसोनि स्पर्शविषय । हस्तीं करी स्वीकार-त्यागान्वय । नेत्रीं पाहोनि रूपविषय । पदीं जाय तेथवरी ॥ ११० ॥ जिव्हेसी बैसोनि सर्व रस चाखे । शिश्नोपस्थीं शुक्र मूत्र पारुखे[1] । घ्राणीं बैसोनि गंध जाणे सुखें । गुदीं करी मळोत्सर्ग ॥ ११ ॥ ऐसी येक चि वृत्ति पारे पदार्थसंगें । मिश्रित होऊनि नामें अनेगें । पावली अष्टधेचेनि योगें । सर्वसाक्षीपण ॥ १२ ॥ ते चि वृत्ति स्वरूपीं होय जेव्हां विन्मुख । तेव्हां रची पिंडब्रह्मांडाचे लेखे[2] । खरेपणें सोसी सकळांचें सुखदुःख । नाहींपणें चि निजांगीं ॥ १३ ॥ ते चि विवेकेंसीं विचारयुक्त होऊन । खोटेपणें सकळ टाकी मोडून । तेव्हां येकली येकट होऊन । सर्वेश्वरीं समरसे ॥ १४ ॥ मग जियेकारितां सर्वेश्वर होता जाला । तो तिजसगट तिजसाठीं सती निघाला । तेथ दोहींविण येकपणाला । ठाव न दिसे सहसा ॥ १५ ॥ तेथ अकस्मात देखिली नवलपरि । ऐक्यत्वें चि स्वानुभवदिनकरीं । वाच्यांश लक्ष्यांश येकाहारीं । परब्रह्मीं सहजस्थिति ॥ १६ ॥ दिनकर रामदासीं समरसोन । परब्रह्मीं जाला सुलीन । त्रिपुटीरहित भेदभान । सहज-स्थिति ऐक्यता ॥ ११७ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये पंचदश कळापे मोक्षनिश्चय नाना अशंकानिरसन निरूपणं नाम तृतीय कीर्ण प्रकाशः ॥ ३ ॥ ॥ श्रीराम ॥

॥ श्रीराम ॥

ये विश्वरचनेचें कारण । स्वयें परमात्मा चि आपण । होऊनि वर्त्तवी दृश्य दर्शन । द्रष्टेपणेनसीं[3] ॥१॥ दृश्य जड द्रष्टा चंचळ । चंचळ-रूपें वर्तवी सकळ । ह्मणौनि द्रष्टा साक्षी बोलिजे केवळ । अंतरात्मा तो ॥ २ ॥ द्रष्टा कूटस्थ[4] अक्षर । देह चाळी ह्मणौनि क्षर । तो चि

---

१ रहात नाहीं. पारुखणें=स्पर्शणें व पारुषणें=मुकावणें; शिळें, कुईट होणें. २ आकार. ३ ‘ द्रष्टेपणेंसीं ’ असा दुसरा पाठ आहे. ४ देहस्थ प्रत्यगात्मा.

देहभावें निरंतर । बोलिजे जीव ॥ ३ ॥ देहबुद्धीचियायोगें जीव । अंतरात्मा चि होय स्वयमेव । मग भोगी जन्ममृत्युगौरव । लक्ष चौऱ्याऐंसीचे ॥ ४ ॥ येकयेके योनीप्रति । शतानुशत जन्म होती । तऱ्हि न घडे जन्मनिवृत्ति । मनुष्यदेहेंविण ॥ ५ ॥ जन्मजन्मांतरें पुण्यसंग्रहो । अवचटें लाधे जीवांसी पाहा हो । तरि च लाभे नरदेहो । अकस्मात सभाग्यासी ॥ ६ ॥ त्या मनुष्यदेहाची प्राप्ति । अनंतपुण्यें जीव लाहाती[1] । आणि घडे उत्तम देहाकृति । ब्रह्मवर्चस्वेंसीं[2] ॥ ७ ॥ जरि सर्व पुण्याचा संग्रह नसे । कांहीं दुष्ट कर्मांचा लेश असे । तरि व्यंगदेहाकृतीचे मुसे । पडे जीव ॥ ८ ॥ होय गर्भांध अथवा बहिरा । कां मुका दंतहीन बोंचरा । कुब्ज कांना[3] घुळा[4] दातिरा । तिळपुष्पनेत्री[5] ॥ ९ ॥ खुळा थोंटा अर्द्धांगी तिडका[6] । पंगु अंचंगुळ[7] तोतरा घुलका । हृदयशून्य ममतेचा पुळका[8] । अखंड आस्था विषयांची ॥ १० ॥ आधिदैविक आध्यात्मिक । आधिभूतिक अवश्यक । हे त्रिविधताप निःशंक । देहीं दोषास्तव ॥ ११ ॥ असोत ऐस्या प्रकारें नाना दोष । ते देहीं पावती निःशेष । ऐसिया दोषांवेगळें तें निर्दोष । शरीर पुण्याचें ॥ १२ ॥ अव्यंगवाणें सर्वांग । बोलणें चालणें पाहाणें सांग । सद्गुणाभ्यासीं नित्य सत्संग । सारासार विचारेंसीं ॥ १३ ॥ उठणें बैसणें सांग ज्याचें । निजणें जागणें नियमाचें । खाणें जेवणें युक्तीचें । बाष्कळपण नेणे ॥ १४ ॥ जाति धर्म अथवा वर्णाश्रम । वेदाधारें जैसा कुळक्रम । तेणेंप्रमाणें वर्त्तणें अविश्रम । स्वकर्मनिष्ठ अनुतापी ॥ १५ ॥ तीर्थ क्षेत्र तपोवन । वसऊं आवडे आरण्य वन । जळाशय परम गहन । गिरी गुहा दरकुट्या ॥ १६ ॥ मठ मठिका पुण्याळयें । मंडप मढ्या देवाळयें । स्वधर्मरक्षणीय धर्माळयें । करूं जाणे पुण्यात्मा ॥ १७ ॥ कर्मशाळा धर्मशाळा । पुण्यप्रयोजनी पुण्य-

---

१ मिळवितात. २ सर्व देहांमध्यें ब्राह्मण देह हा उत्तम देह. ३ तिरळा. ४ मान धुलविणारा. ५ डोळ्यांत तीळ किंवा फूल पडलेला. ६ तिडतिडणारा. ७ अचुंगळ=कृपण, भ्रष्ट. ८ पुळपुळित.

शीळा । वेदशास्त्रअध्ययनशाळा । निगमागमादिक ॥ १८ ॥ यज्ञशाळा भोजनशाळा । पाकशाळा येकांतशाळा । ज्ञान वैराग्य भजनशाळा । अभ्यासालागि संपादी ॥ १९ ॥ नाना तळघरें भुयेरीं । नाना गुहा गुंफा गडदरीं । नाना विरागस्थळें आदरी । विश्रांतीकारणें ॥ २० ॥ सपर्णित सफळित वनें । सपुष्पित वल्लींचीं उद्यानें । सघनें सुरसें पावनें । अति मनोरमें ॥ २१ ॥ नद नदी विहिरी विहिरे[1] । तळीं टांकीं सरोवरें । डुरे[2] झरे ढोंकें[3] सुंदरें । अवलंबी विश्रांतीसी ॥ २२ ॥ नाना स्थळें अपूर्व पाहे । विश्रांति वाटे तेथें चि राहे । जनपदाची वॉस[4] न पाहे । योगाभ्यासीं अति प्रीति ॥२३॥ आप्तवर्गाची खंति[5] न करी । विषई लोकांची भीड न धरी । अंतर विवरे निरंतरीं । जगदंतरेंसीं ॥ २४ ॥ सत्संगाचा अति आदर । साधनचतुष्टई अंति भर । अखंड सारासारविचार । करितां उसंतें नसे ॥ २५ ॥ नाना मत्तें मत्तांतरें पाहे । नाना साधनें साधूनि राहे । आत्मउपाईं नाना अपायें[6] साहे । साक्षात्कारविषईं ॥ २६ ॥ वेद शास्त्र पुराण पठणें । नाना ग्रंथांतर श्रवण करणें । मननें स्वसमाधान राखणें । नेमस्त राहे सर्वदा ॥ २७ ॥ जन्मामध्यें सार जन्म । तो हा नरदेह उत्तम । जीव पावोनि चाळी स्वधर्म । स्वहितास्तव ॥२८॥ स्वहित आहे सर्व देहीं । परि तें असतां चि जालें नाहीं । कां जे अज्ञानास्तव पाहीं । नेणती जीव ॥ २९ ॥ तेणेंकरूनि अहंकृति । देहीं लागली ते चि प्रवृत्ति । तैसेपरि प्राणी वर्त्तती । नाना यातिकुळक्रमें ॥ ३० ॥ लोमँ आणि अनुलोमँ । विलोमँ तथा प्रतिलोमँ[7] । चौसष्टी यातींचा कुळक्रम । धर्मशास्त्रीं बोलिला ॥३१॥ तो सांगतां असे वाड फार । ग्रंथ विस्तारेल अपार । तेणें श्रोते कोपतील सधीर । याकारणें असो ॥ ३२ ॥ यातीपरिस वर्ण थोर । ते वर्ण मुख्य चत्वार । ब्राह्मण क्षत्री वैश्य शूद्र । आद्य जाणावे ॥ ३३ ॥

---

१ विहरा=मोठा पाणदरा. २ डहुरे, शेवड्या. ३ दगडांची कपार ? ४ वास्तव्य, वाट, मार्गप्रतिक्षा. ५ विसांवा. ६ विघ्नें, अडथळे. ७ वर्णसंकरापासून झालेली उत्पत्ति.

हे च्यान्ही विराटसंभव । प्रसिद्धीसी आले स्वयमेव । तो सविस्तर अभिप्राव । श्रुतिशास्त्रें बोलती ॥ ३४ ॥ मुखापासूनि ब्राह्मण । बाहु-पासूनि राजन्य । जानुपासूनि वैश्य जाण । पदीं शूद्र जन्मले ॥३५॥ ऐसे हे उत्तमाधिकारी । जन्म पावले विराटशरीरीं । आपुलाल्या स्वाधिकारीं । स्वधर्में वर्त्तती ॥ ३६ ॥ असो ब्राह्मणासी मुख्य षट्कर्में । तें कर्मकळापीं सांगितलीं यथाक्रमें । तैसीं च क्षत्री वैश्यासी तीन तीन नियमें । कर्म येक शूद्रासी पैं ॥ ३७ ॥ वरकड यातींचा कुळक्रम । चहुं वर्णापासूनि निभ्रम । प्रगट बोलतां यातिउद्गम । दिवाळीं निघती बहुतांचीं ॥ ३८ ॥ असो आतां हे खट-पट । निरूपण चालऊं सरळ नीट । ये विश्वरचनेचे नाना संघाटें । आत्मयाकरितां ॥ ३९ ॥ विचारितां जड चंचळ निश्चळ । तिहींचा साक्षी आत्मा केवळ । याचें निरूपण करूं प्रांजळ । भाविकां समजे ऐसें ॥ ४० ॥ ब्रह्म निर्गुण निर्विकार निश्चळ । आत्मा सगुण सविकार चंचळ । जडभागें माया अष्टधारूप केवळ । तिहींचा साक्षी अंतरात्मा ॥ ४१ ॥ जितुकें क्षर तितुका जड भाग । अक्षर चंचळ आत्मा अव्यंग । उत्तम निश्चळ परब्रह्म सांग । क्षराक्षरातीत जें ॥ ४२ ॥ तेथ क्षर ह्मणिजे नाशिवंत । पंचभौतिक जें अशाश्वत । त्रिगुणेंसीं अष्टधा जें सतंत । तो क्षर भाग बोलिजे ॥ ४३ ॥ च्यारी खाणी तथा च्यारी वाणी । आणि चौऱ्यासी लक्ष जीवयोनी । सकळ पिंड ब्रह्मांड कार्यका-रणीं । तो क्षर भाग बोलिजे ॥४४॥ पांच भूतें तिन्ही गुण । अष्टधा बोलिजे दोन्हीं मिळोन । देहचतुष्टय पंचीकरण । तो क्षर भाग बोलिजे ॥ ४५ ॥ पंचीकृत पंचभौतिक । तें हें पिंड जाणिजे सम्यक । अपंची-कृत ब्रह्मांड हि निष्टंकें । तो क्षर भाग बोलिजे ॥ ४६ ॥ चाऱ्ही देह चाऱ्ही अवस्था । च्याऱ्ही अभिमानी चत्वार स्थानसंस्था । भोग मात्रा गुण शक्ति व्यवस्था । तो क्षर भाग जाणिजे ॥ ४७ ॥

१ प्रत्येक जाति चहुं वर्णांपैकीं कोणत्यातरी एका वर्णापासून निघाली आहे, तिचें स्वयंसिद्धत्व असें कांहीं नाहीं असें दिसेल. २ संघात, समुदाय. ३ निश्चयें-करून. ४ हे अष्ट कोश मिळून.

आकाश वायु तेज आप पृथ्वी । पांचांचीं पंचवीस तत्वें जाणावीं । स्थूळ देहींची रचना आघवी । तो क्षर भाग जाणिजे ॥ ४८ ॥ काम क्रोध शोक मोह भय । चळण वळण प्रासारण आकोचन निरोधान्वय। क्षुधा तृषा आळस्य मैथुन निद्रामय । तो क्षर भाग जाणिजे ॥ ४९ ॥ लाळ मूत्र शुक्र श्रोणीत घर्म । अस्थि मांस त्वचा नाडी रोम । इतुकें मिळोनि स्थूळ देहींचा तत्वोद्गम । तो क्षर भाग जाणिजे ॥ ५० ॥ स्थूळ देह जागृदवस्था विश्वाभिमानी । अकारमात्रा सुखदुःखभोग नेत्र-स्थानीं । रजोगुण क्रियाशक्तीसी अष्टकोश मिळोनि । तो क्षर भाग जाणिजे ॥५१॥ तैसा चि सूक्ष्म देह पंचभौतिक साचार । अंतःकरण मन बुद्धि चित्त अहंकार । व्यान समान उदान प्राण अपान प्रकार । तो क्षर भाग जाणिजे ॥५२॥ श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । वाचा पाणी पाद शिश्न गुद मिळोन । शब्द स्पर्श रूप रस गंध येकून । तो क्षर भाग जाणिजे ॥५३॥ सूक्ष्म देह स्वप्नावस्था तैजसाभिमानी । प्रविविक्त भोग उकार मात्रा कंठस्थानीं । सत्वगुण ज्ञानशक्ति अष्टकोश मिळोनि । तो क्षर भाग जाणिजे ॥५४॥ तैसें च कारणदेह पंचभूतात्मक । पांचांची पंच-वीस तत्वें अवश्यक । सांगिजती तें यथाक्रमणिक । तो क्षर भाग जाणिजे ॥ ५५ ॥ तरि मद मत्सर दंभ कृत्रिम अनित्यत्व । उन्माद वासना वांछा चिंता चेष्टत्व । निद्रा मरण अभिळाश श्रम विस्मृत्यत्व । तो क्षर भाग जाणिजे ॥ ५६ ॥ करुणा कल्पना भ्रांति प्रमाद अनर्थ । अवकाश[1] अज्ञान अविवेक वंचन[2] मूर्छार्थ । एवं पंचवीसां तत्वीं कारण-देह सार्थ । तो क्षर भाग जाणिजे ॥ ५७ ॥ कारणदेह अवस्था सुषु-प्ति प्राज्ञाभिमानी । मकार मात्रा आनंदभोग हृदयस्थानीं । तमोगुण द्रव्यशक्ति अष्टकोश मिळोनि । तो क्षर भाग जाणिजे ॥ ५८ ॥ तेथ महाकारण पंचभौतिक । पांचांचीं पंचवीस तत्वें संम्यक । पूर्ण अज अदाह्य अक्लेद्य अशोष्य हें खपंचक[3] । तो क्षर भाग जाणिजे ॥ ५९ ॥ असंग अछेद्य ऊर्ध्व जीवन कारण । व्यापक परात्पर प्रकाश ज्योति

---

१ भेद. २ फसविणें. ३ शून्यपंचक.

चिया चंचळपणाचा उभारा । निश्चळ ब्रह्मीं विरमे ॥ ८४ ॥ मग येक-सरें निर्विकार निश्चळ । निर्गुण निराधार निर्मळ । तें स्वानुभवदिनकरीं केवळ । परब्रह्म संचलें ॥ ८५ ॥ एवं जडचंचळातीत निश्चळ । क्षराक्षररहित उत्तम निर्मळ । तें स्वानुभवदिनकरीं केवळ । परब्रह्म संचलें ॥ ८६ ॥ दिनकर रामींरामदास निश्चळ । निर्विकार निःप्रपंच निर्मळ । तें स्वानुभनदिनकरीं केवळ । परब्रह्म संचलें ॥ ८७ ॥ तेथें येकें[1] गुप्त च्यारि[2] प्रगट । चौंमाजीं येक अति सैराट[3] । येक रागीट[4] येक पोंचट[5] । येक क्षमा[6]वंत सघन ॥ ८८ ॥ नपुंसकासी[7] पुत्र[8] जाला । तो सर्वमान्य पवित्र भला । उभयांगीं[9] खेळाया प्रगटला । गुप्तरूपें विलसे ॥ ८९ ॥ तेणें येकी नोवरी[10] पाहिली । ते त्याचे चि पोटीं निर्माण जाली । तीपासाव पोरें[11] जालीं । असंभवनीय ॥ ९० ॥ कोण्ही गुप्त कोण्ही प्रगट । कोण्ही रागीट कोण्ही पोंचट । कोण्ही वाजंट[12] कोण्ही धमकट । कोण्ही अखमै[13] तें ॥ ९१ ॥ कोण्ही चौतोंडी पांचतोंडी । कोण्ही केवळ येकतोंडी । कोण्ही कोण्ही तें नितोंडी । अनेक तोंडें कोण्हासी ॥ ९२ ॥ इतुकें व्याली परि ते वांज । लपे प्रगटे दोहीं सांज । तीलागीं असे बहुत खाज । ते क्षण न सोडी दादुल्यातें ॥ ९२ ॥ परि सदां चि ते करुणकुमारी । अनेक पोरें वी क्षणाभीतरीं । येकां पाळी येका संव्हारी । येका सांटवी पोटांत ॥ ९४ ॥ तियेचें नांव पंचवेडळी[14] । ते येकवेळे पांचें[15] पोरें व्याली । तें येकापासूनि येक जालीं । कोण्ही न धरी तियेतें ॥ ९५ ॥ पित्यापासूनि[16] पुत्रें[17] जाला । भूमंडळीं विस्तारला । त्यास हि येक पुत्र[18] देखिला । अति रागीटपणें ॥ ९६ ॥ त्यास ही पुत्रें[19] जाला परम कष्टीं । परि तो सदा

१ परब्रह्मस्वरूप. २ मूळमाया व त्रिगुण. ३ मोकाट, ओढाळ, अर्थात मूळमाया. ४ तमोगुण. ५ रजोगुण. ६ सत्वगुण. ७ परब्रह्मास. ८ त्रिगुणात्मक सर्वेश्वर, पुरुष. ९ अर्धनारीनटेश्वररूपानें. १० गुणमाया, प्रकृति. ११ पंचभूतात्मक विस्तार. १२ वाचाळ. १३ अक्षम, पंगु. १४ पंचवेडळी=पांच नांग्यांची इंगळी. १५ पांच भूतें. १६ आकाशापासून. १७ वायु. १८ तेज. १९ आप.

पाहे अधोदृष्टि । सकळ लोकांलागीं पुष्टि । करितसे स्वलीळा ॥ ९७ ॥ त्यास हि एक पोर जालें । तें सकळ गुणीं विराजलें । तयायोगें कार्य-कारण चालिलें । सकळ हि पृथ्वीवरि ॥ ९८ ॥ त्यासी जालीं पुत्रकन्या अनेक । नाना जिनसी नाना कौतुक । परि तें मुळींचें येकलें येक । साह्य कोण्ही न ये चि ॥९९॥ असो त्यासी संतति फार जाली । ते पणज्यानें सर्व भक्षिली । पुन्हा आज्यानें यथाक्रमें राखिली । बापासी दटाऊनि ॥१००॥ तेणें कोल्हाळ फार जाला । ब्रह्मांडीं गर्जबु उठिला । कोण्ही चि न मनी कोण्हाला । आप बंडें बळावलीं ॥ १ ॥ तेणें मूळपुरुषांसी क्रोध आला । तयानें अवघियांचा ग्राश केला । अवघियांच्या दुःखें आपण हि निमाला । जेथील तेथें सेवटीं ॥ २ ॥ ऐसे जड चंचळ दोन्ही भाग निर्शले । येकलें परब्रह्म निश्चळ उरलें । तें आद्यंत असे संचलें । स्वानुभवदिनकरीं ॥ ३ ॥ दिनकररामदासीं हें कोडें । उकलूनि पाहेल जो निवाडें । तो ब्रह्मानंदसुखें सुरवाडे । स्वानुभवदिनकरीं ॥ १०४ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये पंचदश कळापे जडचंचळ-निश्चळभाग कूटविवक्षाविवरण निरूपणं नाम चतुर्थ कीर्ण प्रकाशः ॥ ४ ॥ श्रीरामचंद्र ॥

॥ श्रीराम ॥

येकापासूनि च्यारी जालीं । च्यारी मिळोनि येकीं[15] सामावलीं । गुप्त चि असतां प्रगट देखिलीं । नामरूपकर्मेंसीं ॥ १ ॥ आणीक येक कौतुक देखिलें । तिहींचें[16] मिळोनि येक[17] जालें । तंव तें चौथें[18] पाहिलें । त्यामाजीं अकस्मात ॥२॥ चहूंचें वेगळें चि नाम रूप कर्म । च्यान्हीं

१ पाणी नेहमीं जमिनीसरसें असतें ह्मणून. २ सकळांस जीवन कारण. ३ पृथ्वी. ४ त्रिगुण आणि पंचभूतें हीं सर्व तत्त्वें पृथ्वीमध्यें सामावलीं आहेत. ५ चारी खाणी, चारी वाणी, चौऱ्यांसी लक्ष जीवयोनी. ६ ब्रह्मांडप्रलयाच्या वेळीं अग्नीनें. ७ आपानें अग्नि शांत करून. ८ गजबज, घोंटाळा, गोंगाट ९ आपआपसांत. १० त्रिगुणात्मक सर्वेश्वरास. ११ मूळस्वरूपाचें ठिकाणीं. १२ सुखी होईल, आनंद पावेल. १३ गुणमायेपासून. १४ सत्व, रज, तम, व शुद्धसत्वगुण. १५ गुण या नामांत किंवा गुणमायेंत. १६ अकार, उकार, मकार. १७ ॐ. १८ अर्धमात्रा.

उत्तरोत्तर चालवावी । धर्मशास्त्रविचारेंसीं ॥ ४८ ॥ करावें वेद-पारायण । शास्त्रचर्चा अध्यात्मनिरूपण । कां तें श्रीरामगुणानुवादकी-र्तन । यथासांग करावें ॥ ४९ ॥ श्री राम जय राम जय जय राम । नित्य स्मरणाचा ह्या चि असावा नेम । यावांचूनि सकळ मिथ्या श्रम । वायांविणें करूं नये ॥ ५० ॥ श्रीराम शंकराचें ध्येय । श्रीराम वाल्मि-काचें गेयें । श्रीराम रामदासांचें श्रेयें । स्वानुभवदिनकरीं श्रीराम ॥५१॥ श्रीराम योगियांचा विसांवा । श्रीराम ऐक्यता जीवशिवा । श्रीराम राम-दासांचा निजठेवा । स्वानुभवदिनकरीं श्रीराम ॥ ५२ ॥ श्रीराम केवळ सच्चिदानंद । श्रीराम ज्ञानियांचा परमानंद । श्रीराम रामदासांचा मुक्तिद । स्वानुभवदिनकरीं श्रीराम ॥ ५३ ॥ श्रीराम संतांची विश्रांति । श्रीराम महंतांची महंति । श्रीराम रामदासांची गंति । स्वानुभवदिनकरीं श्रीराम ॥ ५४ ॥ श्रीराम सत्पुरुषांचा विश्राम । श्रीराम सज्जनांचें सुखधाम । श्रीराम रामदासांचा नित्यनेम । स्वानुभवदिनकरीं श्रीराम ॥ ५५ ॥ श्रीराम अनाथांची कासी । श्रीराम मुक्ति जडजीवांसी । श्रीराम रामदा-सांची मिरांसी । स्वानुभवदिनकरीं श्रीराम ॥ ५६ ॥ श्रीराम निर्गुण-सायुज्यता मुक्ति । श्रीराम सगुणसायुज्यता भक्ति । श्रीराम रामदासांची भक्ति मुक्ति । स्वानुभवदिनकरीं श्रीराम ॥ ५७ ॥ श्रीराम ध्याता ध्येय ध्यान । श्रीराम कर्ता कर्म कारण । श्रीराम रामदासीं ज्ञाता ज्ञेय ज्ञान । स्वानुभवदिनकरीं श्रीराम ॥ ५८ ॥ निज वाचें श्रीराम गावा । निज हृदईं श्रीराम ध्यावा । निज करीं श्रीराम पुजावा । नेत्रीं पाहाणें श्रीराम ॥ ५९ ॥ श्रवणीं श्रीराम ऐकावा । चिंतनीं श्रीराम चिंतावा । अंतः-कर्णीं श्रीराम जपावा । येकात्मता वृत्ति श्रीराम ॥ ६० ॥ निज पदीं श्रीरामगृहासी जावें । मस्तकीं श्रीरामासी वंदावें । श्रीरामनिर्माल्य घ्राणें जिघ्रावें । बाँहीं आलिंगावा श्रीराम ॥ ६१ ॥ श्रोत्रीं श्रीराम शब्द

---

१ निष्फल. २ श्रीरामचरित्र वाल्मिकांनीं गाइलें म्हणून. ३ इत्यर्थ, शेवटीं मिळवावयाचें तें. ४ रामदासांना गति देणारा. ५ मिरासी हक्क. ६ हुंगावें. ७ बाहूंनीं.

ऐकावा । सर्वांगत्वचें श्रीराम स्पर्शावा । नेत्रीं आद्यंत श्रीराम पाहावा । जिव्हे चाखणें श्रीराम ॥६२ ॥ घ्राणें श्रीरामगंध घ्यावा। वाचें श्रीराम ह्मणत जावा । काया वाचा मनें श्रीराम भजावा । विषयइंद्रियें श्रीराम ॥ ६३ ॥ श्रीरामें विषेबाधेसी हरिलें । श्रीरामें उदकीं पाषण तारिले । श्रीरामें जड जीव उद्धरिले । उँघडा मंत्र श्रीराम ॥ ६४ ॥ श्रीरामें वेद पावन केले । श्रीरामें देव सोडविले । श्रीरामें स्वधर्मासी रक्षिलें । उघडा मंत्र श्रीराम ॥ ६५ ॥ श्रीरामें अहिल्या उद्धरिली । श्रीरामें सीता वरिली । श्रीरामें गणिका तारिली । उघडा मंत्र श्रीराम ॥ ६६ ॥ श्रीरामें ध्रुवासी अढळ स्थापिलें । श्रीरामें गजेंद्रनक्रासी सोडविलें । श्रीरामें अजामिळासी उद्धरिलें । उघडा मंत्र श्रीराम ॥ ६७ ॥ श्रीरामें ऱ्हीस वानर तारिले । श्रीरामें महापापी पावन केले । श्रीरामें अनेक भक्त उद्धरिले । उघडा मंत्र श्रीराम ॥ ६८ ॥ करावें नित्य श्रीराम श्रवण । निजमुखीं श्रीराम कीर्तन । अंतरीं अहर्निश श्रीराम स्मरण । पादसेवन रामांचें ॥ ६९ ॥ नित्य करूनि श्रीराम अर्चन । श्रीरामीं सर्वांगें वंदन । श्रीरामदास्यीं अनन्यपण । सख्य अखंड श्रीरामेसीं ॥ ७० ॥ श्रीरामीं करावें आत्मनिवेदन । एवं श्रीरामचंद्रीं नवविध भजन । करूनि सेवटीं श्रीरामार्पण । मी आणि माझेंपण श्रीराम ॥ ७१ ॥ श्रीरामीं निज आर्त धरून । अनन्यपणें श्रीरामीं जिज्ञासा पूर्ण । श्रीरामचंद्रीं सकळ अर्थ साधून । निजज्ञानप्राप्ति श्रीराम ॥ ७२ ॥ श्रीराम तीर्थ व्रत देव धर्म । श्रीराम स्नान संध्या नित्यनेम । विधि विधान श्रीराम सत्कर्म । श्रीराम श्रौतस्मार्तादि ॥ ७३ ॥ श्रीराम वर्णाश्रमकर्मधर्म । श्रीराम कार्यकारण क्रिया नेम । श्रीराम पूर्णत्वें परब्रह्म । स्वानुभवदिनकरीं आद्यंत ॥ ७४ ॥ स्वानुभव दिनकरीं श्रीराम । रामीं रामदासीं पूर्णकाम । दिनकर रामदासीं निभ्रम । सहजस्थिति ऐक्यत्वें ॥ ७५ ॥

---

१ शंकराच्या हालाहलविषाग. २ गुप्त नव्हे असा गुरुमंत्र. ३ नवविधा भक्तींपैकीं. ४ निरूपिलरूपांतले चार प्रकारचे भक्त; आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी, व ज्ञानी. ५ स्वानुभवसुख कोणीं कोणापासून घेतलें त्याची परंपरा दाखविली आहे.

प्रथमीं करूनियां अभिवंदन । दुजां संसारमय यातना त्रितापलक्षण । तिजां वैराग्य चतुर्थी विवेकनिरूपण । पंचमामाजीं कर्मसंस्था ॥ ७६ ॥ षष्ठामाजीं उपासनानिश्चय । सप्तमीं उपासनारहस्यान्वय । अष्टमीं नानाभक्तिसमुच्चय । नवमदशमीं योगसिद्धि ॥ ७७ ॥ येकादशीं चतुर्विध ज्ञान । द्वादशीं पिंडब्रह्मांडशोधन । त्रयोदशीं मायाब्रह्मविवरण । चतुर्दशीं ते विज्ञानस्थिति ॥ ७८ ॥ पंचदशीं मनउन्मन तुर्यास्थिति । षोडशीं गुरुग्रंथगरिमा परंपराव्यक्ति । एवं षोडश कळाप कीर्णदीप्ति । येकऐंसीं परिपूर्ण ॥ ७९ ॥ दिनकर रामींरामदास । स्वानुभव दिनकरीं स्वयंप्रकाश । रामचंद्रें दिनकर रामदास । त्रिपुटीं ऐक्यता सहजस्थिति ॥ ८० ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरें गुरुशिष्यान्वये पंचदश कळापे स्वात्मस्थिति निजउपासनामंत्ररहस्य निरूपणं नाम पंचम कीर्ण प्रकाशः ॥५॥ येकुन कळापवोवीसंख्या ५१४॥ शुभं भवतु । श्रीरामार्पणमस्तु ॥७॥

## ॥ ग्रंथस्तव श्रीगुरुपरंपरा पूर्णत्वप्रतिपाद्य ॥

## ॥ षोडश कळाप ॥ १६ ॥

### ॥ श्रीरामचंद्रं भजे ॥

ॐ नमो स्वानुभवदिनकर । स्वसंवेद्यत्वें ग्रंथ साचार । शुद्ध बुद्ध परात्पर । स्वयंप्रकाश ॥ १ ॥ स्वानुभवें प्रकाशमय । दिनकराऐसें रमणीय । अस्तोदयरहित निजान्वय । सोज्वळत्वें चि ॥ २ ॥ ध्यान पाहातां अति सुंदर । स्वरूप रूपें मनोहर । केवळ स्वानुभवदिनकर । निजैक्यदृष्टि ॥ ३ ॥ शून्यत्वाचा फेडूनि मळ । स्वानुभवें निजनिर्मळ । अवलोकितां अळुमाळ । ध्यानप्रभव ॥ ४ ॥ तवं अवलोकितें चि जालें वांव । मग अवलोकनासी कैंचा ठाव । तेथ ध्यानाचा हि प्रभव ।

---

१ पहिल्या कलापांत. २ आध्यात्मिक, आधिदैविक आधिभूतिक. ३ महत्व. ४ याप्रमाणें षोडश कळांच्या किरणांचा प्रकाश एकयायशीं अध्यायांत (किरणांत) पूर्ण झाला आहे. ५ दिनकरांचे पुत्र व शिष्य. ६ स्वानुभवरूप दिनकर ह्या० सूर्याप्रमाणें स्वयंप्रकाश असा हा ग्रंथ; किंवा स्वानुभवरूप असा हा दिनकरानें केलेला ग्रंथ. ७ किंचित. ८ व्यर्थ.

येणें चि रीतीं ॥ ५ ॥ जेवि दीपीं झगटतां कर्पूर । तत्काळ चि होय दीपाकार । सर्वे चि दीप ना कर्पूर । जेणें रीतीं ॥ ६ ॥ तेवि स्वानुभवें चि दिनकर । पाहों गेला स्वरूप साचार । तवं पाहातेपणासी थार । नाहीं चि कोठें ॥ ७ ॥ जेथें पाहातेपण चि नाहीं । तेथ पाहावें कोणें काई । पाहाणें हि न दिसे कांहीं । पाहातेपणें ॥८॥ जेवि कां मेघींहूनि सुटली धारा । ते तीक्ष्णत्वें भेदूं गेली सागरा । तवं दुजेपणाचा संसरा । न देखे चि पैं ते ॥ ९ ॥ मग निर्लज्जपणें लाजिली । आपलें निजरूप पाहों गेली । तवं ते आपण नाहींसी जाली । सागरीं तये ॥ १० ॥ तें होणें न कळोनि तिचें तिज । जाली आपलें आपण निज । तेवि स्वानुभवदिनकरीं सहज । निजात्मस्थिति ॥ ११ ॥ हें बोलणें बोलतां सहज । वाटतसे मज चि माझी लाज । जेवि प्रकाशेंसीं प्रतिज्ञा पैज । बोले अंधकार ॥ १२ ॥ कां तें गगनीं मेहुडें । झगटों रिघे वारयापुढें । मग आपण चि वाव तेथ झगडे । कोण कोणेंसीं ॥ १३ ॥ तेवि दिनकर स्वानुभवेंसीं । पाहों गेला स्वरूपासी । तवं जळीं जळगारा जैसी । दुजेपणें न दिसे ॥ १४ ॥ अहो काय जाला तो दिनकर । ह्मणौनि प्रभा पाहों गेली साचार । कीं लहरिया ह्मणती सागर । केवि पावोनं[२] ॥ १५ ॥ कां ते कळा होऊनि घाबिरी । ह्मणे चंद्र देखेन मी कवणेपरी । कीं ते कीळ[३] उतावीळ अंतरीं । रत्न पाहावया ॥ १६ ॥ तेवि स्वानुभवें स्वरूपनिर्द्धार । करूं गेला जवं दिनकर । तवं सुवर्णीं जैसा अळंकार । वेगळेपणें[४] ॥ १७ ॥ अथवा नीळिमा होऊनि समोर । पाहों गेली जवं अंबर । तवं त्रिपुटीसहित समग्र । निजांग चि देखे ॥ १८ ॥ मग दुसरेपणें सरसावोन । अवकाशीं झटगलें गगन । मग जयवंत होऊनि आपण । न दिसे जेवि ॥ १९ ॥ तेवि स्वानुभवें स्वरूपानुभव । पाहातां दिनकर सावेव । तवं दिनकरासहित वाव । स्वानुभव चि पैं ॥ २० ॥

---

१ मेघ. २ पावूं. ३ प्रभा. ४ सुवर्णापासून अळंकार जसा वेगळा नाहीं त्याचप्रमाणें दिनकर स्वस्वरूपापासून निराळा नाहीं.

आतां असो हा प्रकार । वाच्यवाचकपणें साचार । बोलतां स्वानुभवदिनकर । अनुर्वाच्य हा ॥ २१ ॥ बोलतां वाचेसीं स्वरूप । त्रिपुटीसहित जाली निष्पाप । स्वानुभवदिनकराऐसें अमूप । असंभवनीय ॥२२॥ धरूनि बोलकेपणाचा आधार । स्वानुभवीं बोलतां स्वरूपें साचार । तवं जेवि उदेला दिनकर । अस्तोदयरहित ॥ २३ ॥ सोज्वळत्वें देदीप्यमान । अवयवातीत विराजमान । निर्गुणत्वें गुणसंपन्न । त्रितापोपशम ॥ २४ ॥ ऐसा स्वरूपाचा बडिवार । स्वानुभवें बोलतां साचार । तवं बोलकेपण समग्र । हारपोनि ठेलें ॥ २५ ॥ जेवि कां उदधीचें मान । तरंग पाहों गेला आपण । तवं अकस्मात निमग्न । तेथें चि होय ॥ २६ ॥ कीं तो बळाचया त्रौणें साजावेला । गगनावरी पवन चालिला । तवं अवसांत मध्यें चि विराला । नाहींपणें ॥ २७ ॥ तेवि स्वरूपाचा स्वानुभव । बोलतां दिनकर जाला स्वयमेव । जेवि रजरेणु मिळतां गौरव । पृथ्वीसंगें पावले ॥ २८ ॥ किं ते दुजेपणें अंबुकणँ । पाहात चालिले जीवन । तवं निजांगासी अवसात आपण । भुलोनि ठेले ॥ २९ ॥ तेवि स्वरूप बोलतां समग्र । स्वानुभवें आपण दिनकर । जेवि नेतिपणें साचार । निगमवाक्यें ॥ ३० ॥ ह्मणौनि यतो वाचा निवर्तंते । ऐसें बोलिजे वेदमत्तें । कां तें असंभवनीय देखोनि स्वरूपातें । निवांत होइजे ॥ ३१ ॥ ह्मणौनि स्वरूपाचया अपारपणें । न चले वेदादिकांचें बोलणें । जिव्हा चिरालिया गुणें । शेष जेथें निवांत ॥ ३२ ॥ तया स्वरूपाचा निर्द्धार । बोलत स्वानुभवदिनकर । मग तें मुकियों भक्षितां साकर । होय जेणें रीतीं ॥ ३३ ॥ बोलतां स्वरूपाचा पाल्हाळ । दाटला स्वानंद बहळें । स्वानुभवदिनकरीं तुंबळ । प्रगटलों निजांगें ॥३४॥ तया स्वानंदाचिया निजप्रौढीं । स्वरूप बोलों गेला तांतडी । तवं वाचेची वळे बेगडी । अनिर्वाच्यपणें ॥ ३५ ॥

१ हा स्वानुभवदिनकर ग्रंथ. २ वाचा जाली. ३ ग्रन्थाचें स्वरूप. ४ आधारानें, शक्तीनें. ५ सज्ज झाला. ६ अकस्मात. ७ पाण्याचे तुषार. ८ वेदवाक्य. ९ मुक्यानें गुळ खादला । गोडी न ये सांगायाला ॥. १० बहुत. ११ स्वानंद प्रगटला. १२ बोबडी.

मग क्षणेक होऊनि निवांत । मनीं आठऊं पाहे स्वरूपसंकेत । स्वानुभवाचा धरूनि हात । स्वरूपोन्मुख ॥ ३६ ॥ तवं स्वरूप सघन अति साजिरें । अरूप रूपें रम्य गोजिरें । तेथें मन करूनि चेईरें । संलग्न करी जवं ॥ ३७ ॥ तवं मनासी जाहालें कैसें । उदकीं पडतां लवण जैसें । कां तें दीपीं दीप समरसें । होय जेवि ॥ ३८ ॥ कां तो वेगळेपणें स्फुलिंग । सिवतां चि अग्नीचें आंग । कां तें घटभंगीं अव्यंग । आकाश होय ॥ ३९ ॥ तेवि स्वानुभवीं होऊनि संलग्न । दिनकर स्वानुभवीं निमग्न । होतां चि मन जालें उन्मन । सहजस्थिति ॥ ४० ॥ एवं दृष्टी वाचा आणि मनें । घेतां स्वानुभव दिनकरपणें । तेथ खपुष्प तुरंबणें । वंध्यापुत्रें जेवि ॥ ४१ ॥ कीं तें घेऊनि शशकविषाण । टोंचिलें गगनाचें प्राण । तेवि दृश्य द्रष्टा दर्शन । स्वरूपोन्मुखें ॥ ४२ ॥ अथवा वाच्य वाचकता वाचन । किंवा ध्येय ध्याता ध्यान । याचें जालयां समूळ मिथ्यापण । स्वानुभवदिनकरीं ॥ ४३ ॥ मग सहजस्थितीचिया समता । स्वानुभवदिनकरीं ऐक्यता । गुरुकृपा लाधलियां भिन्नता । सहज चि न दिसे ॥ ४४ ॥ तेथ सहज गुरुकृपेचें अंजन । अभंग लेती जयाचे नयन । मग तया स्वरूपनिधान । श्रमेंविण सांपडे ॥ ४५ ॥ तरी जें मना वाचे अगोचर । नव्हे जें इंद्रियां गोचर । जें सर्वी सर्व सर्वांपर । तें आंतुडे येकायेकीं ॥ ४६ ॥ मग भेदूनि भेद अभेद । सुख सांपडे विशद । टोंकतसे जयासी वेद । नांतुडे पुराणासी जें ॥ ४७ ॥ ऐसें सुख परिपूर्ण । स्वानुभवदिनकरीं गहन । लाधलीयां गुरुकृपाविंदान । विरूढे भावबळें ॥ ४८ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये षोडश कळापे ग्रन्थस्तवन निरूपणं नाम प्रथम कीर्ण प्रकाशः ॥ १ ॥

॥ श्रीराम ॥

आतां होतां भक्तिभावसंपन्न । लाधे सहज चि गुरुकृपानिधान ।

---

१ जागृत, सावध. २ विस्तवाची ठिणगी. ३ आकाशपुष्प. ४ पूजणें. ५ गाढवाचें शिंग. ६ घेतात. ७ आकांक्षदृष्टीनें टकमका पाहतो. ८ सांपडत नाहीं. ९ निग्रह, लक्षण.

कृपायोगें आठवे ध्यान । नाठवितां हि ॥ १ ॥ जेवि परीस लागतां चि कनक । नाटितां हि लोह होय अवश्यक । कां ते वेधमात्रें चि सम्यक । अळिका भ्रमर होय ॥ २ ॥ अथवा चुंबकाचेनि सन्निधानें । लोह चाले बळसत्राणें । तेवि गुरुकृपाबळें लाहाणें । स्वानुभव दिनकरीं ॥ ३ ॥ असो आतां हा वाच्य प्रकार । लाधोनि कृपाबळ साचार । कांहींयेक बोलिजेल परिकरें । ध्यानप्रभव ॥ ४ ॥ बोलतां श्रीगुरुध्यानप्रभव । तवं नाम आठवलें स्वयमेव । सच्चिदानंदत्वें सावेव । आत्मारामरूप ॥ ५ ॥ जेवि वृक्षाग्रीं अवलोकितां । मुळीं दृष्टि पडे तत्वता । तेवि ध्यान श्रीगुरूचें वर्णितां । आठवलें नाम ॥ ६ ॥ तें नाम वाचें वदों जाये । तवं चित्त स्वरूपीं चाकाटेलें ठाये । जाणों स्मृति बुडाली होये । आनंदजळीं ॥ ७ ॥ सर्वांग जालें कंपायमान । अश्रु स्रवती सजळ नयन । रोमांच थरकोनि संपूर्ण । घर्मबिंदु बोरेले ॥ ८ ॥ सगद्गद जालें हृदय । अंतरीं होतसे विस्मय । वाटे नृत्य करावा थैयथय । श्रीगुरुपुढां ॥ ९ ॥ नामाचा होतां आठव । दिनकरीं प्राप्त स्वानुभव । होऊनि हास्ययुक्त नामगौरव । निज वाचा वदत ॥१०॥ श्रीरामदास हें चि नाम । सकळ चराचरैक आराम । आकल्प कल्पनीय निष्काम काम—। कल्पद्रुम ॥११॥ निजांगीं असोनि सामर्थ्य सर्व । निजनामीं धरिली सानीव । दास या नामाचें गौरव । मानी जे श्रेष्ठत्वें ॥१२॥ जेवि त्रैलोक्यपावन असोनि गांगें । दर्शनस्पर्शनें जे नाशी अघ । अणुप्रमाणें प्राशितां अभ्यंग । मोक्षप्राप्ति जीवां ॥ १३ ॥ आणि सदाशिवाचे मस्तकीं । विराजमान हि असोनि सम्यक्कीं । परि अगर्वता निष्टंकीं । जे अध चि चालणें ॥ १४ ॥ तेवि सर्वश्रेष्ठत्व असोनि आंगीं । परि सानीव धरूनि

---

१ न तापवितां अगर मुसेंत न घालतां म्हणजे कांहीं प्रयत्न न करतां. २ लोखंड लोहचुंबकाच्याजवळ येतां च. ३ चांगली. ४ उत्पत्ति. ५ चकित झालें. ६ घामानें डबडबला. ७ इच्छा पुरविणारा कल्पवृक्ष. ८ लघुता. आंगीं श्रीरामचंद्राचें सर्व सामर्थ्य असून हि श्रीरामाचा दास असें नम्रतादर्शक नांव धारण केलें. ९ गंगा. १० पापें.

निजांगीं । केवळ रामचंद्र असोनि अभंगीं । रामदास मिरविजे ॥१५॥ आणीक येकी नवलपरि । पूर्वीं रामचंद्रनामाची धेणी पुरी । घेऊनि विटलेपणें बोहरी । तयासी करूनि ॥ १६ ॥ मग परम प्रीतीचया योगें । राहिलें सर्वांच्या निष्काम उबगें । तें दासनाम अति भूषणयोगें । धरिजे कैसें स्वलीळा ॥ १७ ॥ थोरपण परीक्षावया सलगीनें । विष्णूसी उरीं हाणितलें भृगूनें । तें श्रीवत्सलांछन या अभिधानें । भूषण मिरविजे ॥ १८ ॥ तेवि दासनामाचें मानूनि थोर बीक । चंद्रान्वित त्यजिलें कीं तें सकळंक । मग रामदास हें नाम निष्कळंक । ह्मणौनि स्वेछां धरिलें ॥ १९ ॥ अहो रामचंद्र आणि रामदास । हे उपाधियोगें भिन्नता आभास । परि पाहातां मुळींच्या अभिधानास । तवं तें अखंड अभिन्न ॥२०॥ जेवि गुळ नाबेंद रार्यपुरी । तिहींमाजीं गोडी येकी खरी । तेवि उपाधियोगें भासे परि । मुळींचें रामनाम खरें ॥२१॥ परंतु सुलीनतेचा देखोनि लाभ । दासान्वित नामाचें मोठें वालभ । जेवि कां नीळिमा निजांगीं नभ । अंगिकारी प्रीतीं ॥ २२ ॥ तेवि निजनाम तवं आदिनारायणें । असतां साक्षात् अवतार पूर्ण । मग स्वेछा रामदास हें अभिधान । स्वलीळा धरिजे ॥ २३ ॥ असो बोलों गेलों ध्यानप्रभव । तवं वाचें उदेला नामप्रस्ताव । जेवि परब्रह्मीं प्रणवोद्भव । अकस्मात जाला ॥ २४ ॥ कीं ते गगनीं वायूची झुळुक । अवसात देखिली सम्यक । तेवि श्रीगुरुनाम अवश्यक । स्वानुभवीं देखिलें ॥ २५ ॥ मग स्वानुभवरूप दिनकर । होऊनि रामींरामदास निरंतर । स्वानुभवीं तृप्त दिनकर । श्रीरामदास ॥ २६ ॥ ह्या नामाची

१ मागील पानावरील ८ वी टीप पहा. २ तृप्ति, इच्छा. ३ रामचंद्र नामाचा वीट येऊन त्याची बोहरी ह्म० राख केली; ह्मणजे समूळ नाहींसें केलें. ४ ज्या नामाचा सर्व लोक कंटाळा करतात, त्रास घेतात. ५ महत्व. ६ रामनामापुढें चंद्राचें नांव धरलें होतें, तें कलंकयुक्त असल्यामुळें टाकून देऊन दास हें निष्कलंक नाम धरलें. ७ खडीसाखर. ८ रायपुरी गांवची विशेष प्रकारची साखर. ९ श्रीसमर्थांचें जन्मनांव नारायण असें होतें. १० श्रीरामाच्या ठिकाणीं रामरूप होऊन गेलेले असे जे श्रीरामदास, त्यांचा हि दास ह्मणून दिनकर रामींरामदास झाला असें ह्मटलें आहे. ११ स्वानुभवसुखामध्यें दिनकर व श्रीरामदास हे अभिन्नपणें आहेत.

धरूनि सोय । लाधों श्रीगुरुकृपापसाय । मग तैसा चि स्वरूपान्वय । स्वानुभवदिनकरीं ॥ २७ ॥ कदापि ऐसें ह्मणतील अभक्त जन । जे दास हें अनुचित विप्राभिधान । तरि हा आक्षेप चि करी अज्ञान । जयाचा तयासी ॥ २८ ॥ अहो शूद्र सेवक जैसा तिहीं वर्णासी । तैसें मनुष्यदास्य अनुचित ब्राह्मणासी । तें दूषण योजील रामदासासीं । तो चतुर कीं मूर्ख ॥ २९ ॥ दास व्हावया सर्वेश्वराचे । संचित पाहिजे कीं अनंत जन्मांचें । नारदादिक ह्मणविती जयांचे । दासांचे दास आपण ॥ ३० ॥ ह्मणौनि अंतरात्मया रामाचे दास । ब्रह्मादि हरिहर ह्मणविती आपणास । इंद्र चंद्र दिनकर रामदास । ह्मणविती आपणा ॥ ३१ ॥ संत महंत सिद्ध साधुजन । सकळांसी रामदास्याचें भूषण । स्वानुभवदिनकरीं विराजमान । रामदास आद्यंत ॥ ३२ ॥ एवं रामदास श्रीगुरु सर्वाद्य । परि जगदुद्धरणार्थ स्वसंवेद्य । धरूनि सगुणरूप सद्य । साकार सकळ ॥ ३३ ॥ मूर्ति साजिरी अवयवाळंकृत । नाम श्रीरामदास इत्थंभूत । अवतारचरित्र अति विख्यात । न बोलवे वाचें ॥ ३४ ॥ आतां ते अवतारचरित्रगरिमाँ । बोलतां च्यांही वाचा निःसीमा । परि श्रीगुरु बोलविती निजमहिमा । वैखरीयोगें ॥ ३५ ॥ तो आद्यंत पुढीलिये कीर्णीं । बोलिजेल यथाक्रमेंकरूनि । स्वानुभँवदिनकररूप सज्जनीं । श्रवण कीजे ॥ ३६ ॥ दिनकर रामीं-रामदासकृपां । स्वानुभवदिनकरीं अति सोपा । श्रोतीं सादर होऊनि सस्वरूपा । विचार कीजे ॥ ३७ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये षोडश कळापे रामदासनामव्याख्या निरूपणं नाम द्वितीय कीर्ण प्रकाशः ॥ २ ॥

---

१ प्रसाद. २ शूद्राप्रमाणें ब्राह्मणानें दास हें नाम स्वीकारणें गैर आहे असा आक्षेप. ३ २८, २९ व ३० या तीन ओंव्या ह्मणजे श्रीश्रेष्ठांचे सुगमोपायाच्या १० व्या प्रकरणांतील ५३, ५४ व ५५ या तीन ओंव्या जवळ जवळ शब्दशः होत. अर्थात् दिनकरांनीं ह्या ओंव्या सुगमोपायांतून घेतल्या असल्या पाहिजेत. ४ हें 'ह्मणविती' याचें कर्म. ५ महत्व. ६ परा, पश्यंति, मध्यमा आणि वैखरी. ७ स्वानुभवदिनकर ग्रंथ आतांपर्यंत ज्याप्रमाणें शांतपणें श्रवण केला त्याप्रमाणें; किंवा स्वानुभवदिनकराप्रमाणें जे सज्जन त्यांनीं.

॥ श्रीराम ॥

आतां शुद्धदृष्टीचा करूनि साक्षप । पाहे जवं निखेळ[1] स्वरूप । तवं नित्य शुद्ध बुद्ध अमूप । सनातन ॥ १ ॥ परि पाहातेपणें न करवे ठी[2] । तेणें दृष्टि जाली उफराटी । मन तैकितां[3] सदेठीं । उन्मन जालें ॥ २ ॥ वाचेसी पडिलें मौन । वृत्ति गेली समरसोन । इंद्रियांचें चंचळपण । सहज चि ठेलें[4] ॥ ३ ॥ ऐसें जवं हों न सरे । तवं कृपाळुत्वें श्रीगुरुदातारें । मम मस्तक स्वकरें । स्पर्शिजे कृपां ॥ ४ ॥ लाहोनि कृपापसाय । वृत्ति होऊनि तन्मय । पाहात ठेलों मूळान्वय । शुद्ध स्वरूपाचा ॥ ५ ॥ जेवि कां ब्रह्म अपार अनुपम्य । असंभवनीय अगाध अगम्य । निर्गुण निरामय समसाम्य । सघन साजिरें ॥ ६ ॥ तैसें चि श्रीगुरूचें स्वरूप । असंभवनीय अगण्य अमूप । यासी पदार्थमात्र दृष्टांतारोप । न चले चि कांहीं ॥७॥ यासी दृष्टांतीं योजावया येक । परब्रह्म चि पाहातां संम्यक । त्याविण सर्व हि निरर्थक । पदार्थमात्र ॥८॥ मैंज पाहातां श्रीगुरूचें ध्यान । तें वस्तुपरिस देखिलें सघन । कां जे ब्रह्मासी देतां[6] ब्रह्मपण । तो येक श्रीगुरु समर्थ ॥९॥ जवंवरि न घडे श्रीगुरुकृपा । तोंवरि शिष्यासी ब्रह्मानुभव कैसेनि पां । जन्ममृत्यूचया आरोपा । चुकवी कवण ॥१०॥ ह्मणौनि गुरुकृपायोगें ब्रह्मानुभव । अनुभवें कळे श्रीगुरुगौरव । उभयतां[7]योगें समसाम्यत्व । श्रीगुरु परब्रह्म ॥११॥ तेथ शून्यपण सारूनि मागें । जेवि आकाश राहे निजांगें । तेवि मस्तक शोभला अव्यंगें । निजात्मस्थिति ॥ १२ ॥ गगनीं भासत जो वर्ण नीळ । ते चि मस्तकीं नीळ कुंतळ[8] । मग शुद्धसत्व जैसें निर्मळ । त्रिगुणातीत पैं ॥ १३ ॥ तेवि निजभाळ शोभलें । निजसमता विशाळ भलें । त्रिरेखान्वितें[9] विराजलें । त्रिगुणरूप ॥ १४ ॥ गगनीं जैसी वायूची झुळुक । कीं स्वरूपीं प्रणवोद्भव संम्यक । तेवि श्रीमुखीं सरळ नासिक । निजशोभा

१ निष्कल, शुद्ध. २ स्थिति, ठिकाण. पाहातेपणाच्या स्थितींत सारखें राहवेना. ३ कदाचित् 'तुकितां' असावें. ४ स्थिर झालें. ५ मी या अर्थानें. ६ देणारा. ७ श्रीगुरुकृपा आणि ब्रह्मानुभव हीं दोन्हीं हि सारख्या च योग्यतेचीं, ह्मणून श्रीगुरु आणि परब्रह्म यांत भिन्नता नाहीं. ८ केश. ९ कपाळावरील तीन रेघा.

शोभलें ॥१५॥ प्रवृत्तिनिवृत्तीचिया समता । भवंया शोभल्या तत्वता । अर्धमात्रांक भ्रूस्थान पाहातां । निवाले मानस ॥ १६ ॥ जेवि कां ब्रह्मीं सगुण आणि निर्गुण । तैसे शोभले निज श्रवण । मुक्तमोतियांचें भूषण । कुंडलें साजिरीं ॥ १७ ॥ मग प्रणवीं जेवि मात्रात्रय । अकार उकार मकारान्वय । तेवि इडा पिंगळा सुषुम्ना त्रय । शोभलिया समता ॥१८॥ जेवि हटयोग आणि ज्ञानयोग । उभयता स्वरूपाचें देखणें चांग । तैसे नयनद्वय शोभले अव्यंग । अति सतेजपणें ॥ १९ ॥ स्वधर्म आणि सत्कर्म । तैसे गल्लयुग्म शोभलें निःसीम । मग स्वरूपीं जेवि निजानंद सम । पूर्णभरित ॥ २० ॥ तेवि निजानंदें आनंदमय । मुख विराजलें रमणीय । सत्‌चिदत्वें अधरद्वय । समत्वें साजिरें ॥ २१ ॥ मग षोडश महावाक्य द्विधाकृति । माजीं शोभल्या दंतपंक्ती । जिव्हा तत्त्वमसि निजयुक्ती । साजिरी हनुवटी ॥ २२ ॥ षोडश स्वरयुक्त प्रणवपीठ । तेवि शोभा शोभला कंबुकंठ । स्कंदोन्नत अति बरवंट । समत्वें शोभती ॥ २३ ॥ जेवि कां ब्रह्मप्राप्तीचा समई । होतसे भोग-मोक्षनवाई । तेवि समतायोगें भुजाद्वई । निजरूप शोभत ॥ २४ ॥ इहपरत्रभोगदानीं सामर्थ्य । तो येक जाणिजे श्रीगुरु समर्थ । मोक्षदानें करी कृतार्थ । शरणागतासी ॥ २५ ॥ मोक्षदानें अभयंकर सव्य । वामहस्तीचें देणें असंभाव्य । एवं भोगमोक्षकरूनि वाम सव्य । विराजले कर ॥ २६ ॥ मग आब्रह्मादि सकळ । अनंत ब्रह्मांडात्मक खेळ । तैसें दिसतसे हृदय विशाळ । असंभवनीय ॥ २७ ॥ नाभी सखोल अति साजिरें । जाणों परब्रह्म चि हें गोजिरें । निजनाभीं चतुरानन वेदाधारें । लपे प्रकटे स्वलीळा ॥ २८ ॥ मग सघनत्वें जैसें शब्दब्रह्म । तैसा कटी शोभतसे मनोरम । निजगुह्याचा संभ्रम । न बोलवे वाचा

१ अर्धमात्रेच्या आकाराचें. २ वामनासापुट नाडी, चंद्रनाडी. ३ दक्षिण नासापुट नाडी, सूर्यनाडी. ४ इडा व पिंगळा यांचे मध्यसंधीस जी तिसरी नाडी आहे ती. ५ शंखाकृती कंठ. ६ एका च वेळीं कधीं हि अनुभवास न येणाऱ्या दोन गोष्टी ह्म० भोग अर्थात् स्वानंदाचा भोग, व मोक्ष ह्म० मुक्ति या दोन्हींचा हि अनुभव ब्रह्मप्राप्तीच्या प्रसंगीं येतो असा हा चमत्कार आहे.

॥ २९ ॥ आणि ते ब्रह्मीं जैसे जीवशिवाकारें । दोन्ही कोंभ निघती साकारें । तैसे पदद्वय समता साजिरें । समासनीं[1] विराजित ॥ ३० ॥ तेथ आठा भावांची[2] अष्टपद चवाई[3] । नवरसीं रत्नखचित नवाई । वरि स्वानुभवनिजासनसोई । स्वेछां आरोहण ॥ ३१ ॥ मग जेवि कां परब्रह्मासी आछादून । मूळमाया प्रगटे आपण । तेवि निजरूपीं दिव्य वसन परिधान । पीतांबर तडिद्दंत[4] ॥ ३२ ॥ सद्वस्तूचा मुगुट स्वर्णमंडित । नव हि भक्ति नवरत्नखचित । सत्कार सतेजें लखलखित । निज मस्तकीं शोभला ॥ ३३ ॥ अहं सोहं उगाळूनि केशर कस्तुरी । निज भाळीं गंधाक्षत रेखिलें कुसरीं[5] । तांबूळ रंगलें मुखाभीतरीं । सच्चिदानंदत्वें ॥ ३४ ॥ कंठीं माळा शोभती मुक्तांचिया । निर्गुणसायुज्यपदक येकावळिया[6] । कटीं मेखळा[7] षड्दर्शनाचिया । क्षुद्रघंटिकान्वित ॥ ३५ ॥ भुजीं धर्म अर्थ केयुरें शोभत । करकंकणें काममोक्षमंडित । पदीं तोडर[8] मिरवत । दशनादात्मक ॥ ३६ ॥ स्वानुभवाचें येकछत्र । येकात्मता आतपत्रें[9] । वैराग्यचामरें स्वतंत्र । आगळिक शोभेची ॥ ३७ ॥ विवेकाचें सिंहासन । वरी श्रीप्रभूचें आरोहण । दैवीसंपदा सुरगण । कर जोडूनि उभे ॥ ३८ ॥ ब्रह्मा विष्णु शंकर । इंद्र चंद्र यम कुबेर । अग्नि वरुण गणेश दिनकर । यथाक्रमें उभे ॥ ३९ ॥ सिद्ध साधु ऋषेश्वर । संत महंत मुनेश्वर । गण गंधर्व किन्नर । यथाक्रमें उभे ॥ ४० ॥ असो ऐसियापरी श्रीगुरुमूर्ति । शोभा शोभली साळंकृतीं । स्वानुभवदिनकराचिया संवित्ति[10] । प्रगट जाली स्वयें ॥ ४१ ॥ तेथ दिनकरें निजभावेंकरून । केलें दशेंदेहेसीं[11] निंबलोण । ध्येय ध्याता ध्यान सारून । पूजा आरंभिली ॥ ४२ ॥ मग सहजस्थिति आवाहन । निश्चळतेचें आसन । निर्वासना अर्घ्य

---

१ सम+आसनीं. २ कंप, रोमांच, स्फुरण, प्रेमाश्रु, स्वेद, हास्य, लास्य व गायन असे आठ सात्विक भाव ते. ३ चवई, चौरंग. (आठ पायांचा) ४ विद्युल्लतेप्रमाणें चमकणारा. ५ कौशल्यानें. ६ एकेरी हार. ७ कटिसूत्र. ८ दंडावर बांधण्याचा एक अलंकार. ९ छत्र. १० दिनकरास ज्ञानदान करण्याचे निमित्तानें. ११ दशेंद्रियांसह असा अर्थ असावा.

देऊन । पाद्य निर्विषयस्थिति ॥ ४३ ॥ आयागमनाचें आचमन । अनुसंधानी मधुपर्क विधान । स्वात्मस्थिति पंचामृतस्नान । पुरुषसूक्तें-सीं ॥ ४४ ॥ निजऐक्यता वस्त्रपरिधान । अखंडता यज्ञोपवीतधारण । अव्यग्रता अळंकरण । सर्वांगशोभा ॥ ४५ ॥ अव्यंगवाणें गंधाक्षत । निजसमाधानपुष्पें शोभत । संदेहधूप जाळूनि सतंत । निःसंदेहदीप ॥ ४६ ॥ मग स्वानंदाचा खाद्य नैवेद्य । फळ तांबूळ समर्पूनि सद्य । दक्षिणा अनंत नाणीं स्वसंवेद्य । ठेविलीं पुढें ॥ ४७ ॥ तेथ येकात्मता नीरांजन । चौऱ्यासी लक्ष कर्पूरदीप उजळून । येके वेळे चि अनंत ब्रह्मांडें आकळून । प्रदक्षिणा सारिली ॥ ४८ ॥ स्वसंवेद्य मंत्र-पुष्पांजुळी । नित्यानंद मंत्रसमेळीं । स्वानंदें वोपिली भाळीं । निजरूपा-चिया ॥ ४९ ॥ मग देहेंविण दंडवत । निजपदीं दिनकर रुळत । तेथ रामदासकृपा वरदहस्त । शोभे निजमस्तकीं ॥ ५० ॥ तेथ हस्त-कमस्तकीं गांठी पडतां । जें सुखसौरभ्य जालें तत्वता । त्याचा येक स्वानुभववेता । आपला आपण ॥ ५१ ॥ असो यावरि श्रीगुरु संतो-षोन । दिनकरा दीजे पसायदान । केवळ स्वानुभवदिनकरीं पूर्ण । पाव-सी सुख ॥ ५२ ॥ आणिक हि तुज जें जें अपेक्षित । तें तें माग गा सुनिश्चित । कृतार्थ होतु कां मनोरथ । सर्वार्थसिद्धि ॥ ५३ ॥ ऐसिया लाधोनि वरदपसायासी । दिनकर सुखसंपन्न रामदासीं । मग संतोषोनियां निज मानसीं । पुढारला स्वानंदें ॥ ५४ ॥ जी जी स्वामी सर्वसमा । परब्रह्मा आत्मयारामा । स्वसंवेद्य स्वानुभवधामा । श्रीकृ-पामूर्ति ॥ ५५ ॥ जी माझिये हृदईं वसावें । मज आपणाऐसें करावें । निजकृपां सिद्धीसी न्यावें । स्वानुभवदिनकरासी ॥ ५६ ॥ तथास्तु ह्मणौनि श्रीगुरु । मस्तकीं ठेविला अभयंकरु । तुझें मनेप्सित तें चि करूं । आपण सर्व ॥ ५७ ॥ लाधोनि ऐसा वाक्याधार । रामदासीं अनन्य दिनकर । दिनकरीं रामदास दातार । स्वानुभवैक ॥५८॥ ग्रंथराज

---

१ आटोपून. २ सौंदर्य, सुवासित्व. ३ सर्व वस्तु समदृष्टीनें पाहणारा. ४ मनांत इच्छा आहे त्याप्रमाणें.

स्वानुभवदिनकर । रामदासकृपा वदत साचार । श्रोतीं होऊनियां सादर । श्रवण कीजे ॥ ५९ ॥ येथून उत्तरपूजा समाप्त जाली । पुढें गुरुपरंपरा सांगिजेल वहिली । रामदासकृपा पूर्ण बिंबली । स्वानुभवदिनकरीं ॥ ६० ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये षोडश कळापे श्रीगुरुउत्तरपूजा निरूपणं नाम तृतीय कीर्ण प्रकाशः ॥ ३ ॥ श्रीराम जयराम जयजयराम ॥

॥ श्रीराम ॥

शालिवाहन पंधरासें स्याहात्तरीं । फाल्गुनी पूर्णिमा जयसंवत्सरीं । रामदासकृपा स्वानुभवदिनकरीं । समाधिसुख प्राप्त ॥१॥ यापूर्वीं येक वर्षाआदि । फाल्गुनी पूर्णिमा निशिसंधीं । दिनकरीं स्वानुभव प्राप्त स्वप्नसिद्धि । मस्तकीं विराजे वाम कर ॥ २ ॥ त्याहिपूर्वीं दिनकरें यथाविधीं पूर्ण । येक संवत्सर केलें पुरश्चरण । समाप्तिसमई ध्यान संपूर्ण । तद्रूप देखिलें ॥ ३ ॥ तेथ वृद्धेश्वराख्य प्रसिद्ध लिंग । वृद्धगंगेचा उगम जेथूनि सांग । ज्याचा महिमा अतुळ अव्यंग । बोलिला पुराणीं ॥ ४ ॥ तिये स्थळीं दिनकरें । पूर्णप्राप्तीचिया अवसरें । मूर्तिदर्शन सगुणसाक्षात्कारें । देदिप्यमान ॥ ५ ॥ अवस्था जागरस्वप्ननिद्रांत । तुर्या केवळ इथंभूत । ते समई नेत्र होऊनि उन्मीळितें[2] । विनीत अष्टभावेंसीं ॥ ६ ॥ बैसला दिनकर जोडलां करीं । तवं अकस्मात देखत पुढें मूर्त्ति साजिरी । अनुग्रह करूनि दिनकराचे शिरीं । वाम हस्त[3] ठेविजे ॥ ७ ॥ इतुकें स्वप्नांतीं जवं हों न सरे । तवं स्वानुभवीं आनंदाचेनि भरें । ध्यान लक्षी चित्त चेईरें[4] । तत्काळ जालें ॥ ८ ॥ तेथ पुढें पाहातां कांहीं न दिसे । मग भयावलेनि प्रेमें मानसें । मूर्त्तिदर्शनालागौनि कैसें । दिनकरासी जालें ॥ ९ ॥ जेवि तान्हया माय न दिसतां । किं वत्सासी धेनु गृहा न येतां । कीं तें कृपणाचें निधान

---

१ शके १५७६ फाल्गुन शुद्ध १५ या दिवशीं श्रीसमर्थांचा दिनकरांना श्रीवृद्धेश्वराजवळ ( ज्या ठिकाणचें चित्र ग्रंथासोबत दिलें आहे ) अनुग्रह झाला. २ नेत्र किंचित् उघडून. ३ अभयंकर असा सव्य अगर दक्षिण हस्त कां ठेवला नाहीं याचें कारण पुढें ओवी ९७ ते १०१ यांत सांगितलें आहे. ४ जागृत.

चुकतां । होय जैसेनि पां ॥ १० ॥ तेवि सरतां सुषुप्तिस्वप्नसंधि । जागृतिअवस्थेचिया अवधीं । दिनकरीं प्राप्त तुर्यायुक्त समाधि । श्रीरामदासकृपां ॥ ११ ॥ तेणें समाधियोगें निश्चळ चित्त । विरमलें जेथील तेथ । चाकोटोनियां निवांत । तटस्त ठेलें ॥ १२ ॥ कांहीं स्वप्न कांहीं जागर । कांहीं सुषुप्तीचा हि गमे पडिभरं । परि तुर्यावस्था साचार । ठसावली दिसे ॥ १३ ॥ तुर्या परंतु अपक्क केवळ । अहंपणयोगें समाधि सबळ । नाहीं परिपक्कता प्रबळ । शुद्ध ज्ञानसंस्कार ॥ १४ ॥ जेवि कां तें अपाडाचें । अच्युत फळ पाहातां कांचें । पिकलें दिसे परि अंतरींचें । अंबीळत्वं न जाय ॥ १५ ॥ तें चि पूर्ण पाक लागतां । तृणसेजेसंगें मुरतां । अंतर्बाह्य मधुरता । आर्तलें जैसें ॥ १६ ॥ तेवि नाहीं जवं ज्ञानसिद्धि । न होतां प्रत्यक्ष गुरुवाक्यशुद्धि । प्राप्त जाली जन्हि पूर्णसमाधि । तन्हि अपक्क चि कीं ॥ १७ ॥ असो आतां ययावरि । दिनकरासी समाधीची उजरी । प्राप्त होतिये अवसरीं । कैसें जालें ॥ १८ ॥ स्वप्नावस्थेमाजीं चोखडें । जें देखिलें होतें श्रीगुरुरूपडें । तें न दिसे चि पाहातां पुढें । जागृतीसी येतां ॥ १९ ॥ मग भयावळेनि प्रेमें । सभंवतें पाहे अति संभ्रमें । मूर्ति न दिसे परि अंतरनियमें । दाटली वृत्ति ॥ २० ॥ सवें चि अंतर्वृत्ति जवं पाहे । तवं स्वप्नठसा देखताहे । बाह्याकारें जागृति दिसताहे । ब्रह्मारण्य वृद्धेश्वर ॥ २१ ॥ पारि जे स्वप्नीं देखिली होती । सगुणावयवें सुंदर मूर्ति । ते चि ध्यानयोगें अंतर्बाह्याकृति । ठसावली पूर्ण ॥ २२ ॥ मग आर्त्तीचिया पडिभरें । जिज्ञासा करूनि मोहेंरें । अर्थार्थीचया अनुकारें । ज्ञानईछा धरूनि ॥ २३ ॥ निश्चय केला दृढ मानसीं । मूर्ति न देखे जवं दृष्टीसी । तवं न घेणें अन्नपानासी । आणि नाना उपभोग ॥ २४ ॥ पाहात फिरत होऊनि सखेद । न वाटे पदार्थमात्र सुखद । ऐसियायोगें

---

१ चकित होऊन. २ अधिकपणा. ३ प्रत्यक्ष अनुग्रह होऊन शुद्धज्ञान न झाल्यामुळें तुर्यावस्था अपक्क राहिली. ४ कच्चें. ५ आंबटपणा. ६ स्पर्शलें. ७ स्वस्थता, उत्कर्ष. ८ सुंदर. ९ पुढें. १० स्वरूपानें. ११ याप्रमाणें चतुर्विध भक्ति करून.

येक पूर्णाब्द । होय ना जवं ॥ २५ ॥ तवं कौतुक जाहालें अति थोर। समागमें निस्पृह परिवार । करावया भक्तजनाचा उद्धार । समर्थागमन ॥२६॥ निज ग्राम जांब नगरी । गौतमीचां उत्तरतीरीं । तेथूनि निज-गणपरिवारीं । दक्षिणाभिगमन ॥ २७ ॥ गौतमीहूनि कृष्णातीरपर्यंत । समर्थागमन जालें त्वरित । मार्गीं उद्धरिले जड जीव अनंत । कृपादृष्टि-मात्रें ॥ २८ ॥ बद्ध मुमुक्ष आणि साधक । ते सिद्ध चि करूनि ठेविले संम्यक । ह्मणौनि शरणागतवत्सळ निष्टंक । आदिनारायण ॥२९॥ मुळींचें नाम नारायण । असोनि रामचंद्रीं आवडी गहन । ह्मणौनि रामदास हें नामाभिधान । स्वेछां धरिलें ॥ ३० ॥ त्यांस हि गुरुत्व श्रीरामजीचें । दर्शनसादृश्य श्रीराममूर्तीचें । यासी असत्य ह्मणतील तयांचें । नर्कीं पतन यावच्चंद्रार्क ॥ ३१ ॥ श्रीराम सीता लक्ष्मण । भरत शत्रुघ्न हनुमान । यां इतुकियांचें प्रत्यक्ष सगुण दर्शन । ह्मणौनि नाम रामदास ॥ ३२ ॥ येथ कोण्ही घेईल आशंका । जे शरीराभास लोपलीयां असकां[2] । पुन्हा दृष्टीं पडावयासी आवांका[3] । ब्रह्मादिकीं न घडे ॥ ३३ ॥ तथापि मेलिया मनुष्याचिया आकृति । भूतें तत्काळ स्वेछां धरिती । परि पुन्हां सवें चि गुप्त होती । क्षण-भंगुरत्वें ॥ ३४ ॥ यैसें तरि येथ बोलतां न ये । तरि यासी काय जी असे पैं आश्रये । तरि आतां ये हि गोष्टीचा प्रत्यये । सावध होऊनि आइका ॥ ३५ ॥ अहो पिंडें प्रचितशब्दें[4] विश्वासें । प्रश्निकीं[5] विचार आणूनियां मनास । केला पाहिजे गोष्टीचा कयास । सूक्ष्म दृष्टि करूनि ॥ ३६ ॥ श्रीरामचंद्रें अकरा सहस्र वर्षें । राज्य करूनि परम संतोषें । मग येणें चि देहें वैकुंठागमन समयवशें । अयोध्येचिया लोकांसहित ॥३७॥ वरकड अवतार मृत्यु पावले । अग्निसंगें कित्तेक भस्म जाले । देहाकारें अवयवेंसीं भंगले । तैसें नाहीं श्रीरामचंद्रासी ॥ ३८ ॥ श्रीरामचंद्र या

---

१ पूर्ण वर्ष. २ सर्व. ३ धैर्य. ४ आपल्या पूर्वजांचे जे प्रतीतीचे बोल आहेत त्यांवर मनुष्यानें विश्वास ठेवला पाहिजे. (दासबोध १०×४×८ वरील टीप पहा) ५ शंका घेणारानें.

चि देहें वैकुंठवासी । मां त्यासी विलंब काय भूतळा यावयासी । एवं त्यांचिया अनुग्रहें रामदासांसी । अनुभवसुख प्राप्त ॥ ३९ ॥ श्रीरामचंद्रासी अनुग्रह । वशिष्ठऋषीचा निःसंदेह । वशिष्ठासी ब्रह्मानुग्रह । चतुर्मुखब्रह्मयापासूनि ॥ ४० ॥ ब्रह्मयासी जगदीशें हंसरूपें । ब्रह्मकुमरांचिया निमित्यें साक्षपें । अनुग्रह केला ते हंसगीतानुरूपें । कथा भागवतीं प्रसिद्ध ॥ ४१ ॥ एवं प्रथम गुरु विष्णु आदिनारायण । त्यापासूनि ब्रह्मत्व पावला चतुरानन । पुढें ब्रह्मयानें वशिष्ठऋषीलागून । अनुग्रह केला ॥ ४२ ॥ वशिष्ठानुग्रह श्रीरामचंद्रासी । योगवाशिष्ठ निजसंवादेंसीं । पुढें श्रीरामदर्शन भूतळीं नारायणासी । जालें जन्मांतरसुकृतें ॥ ४३ ॥ नाना पुरश्चरणें अनुष्ठानें । जन्मांतरें कोट्यावधि आचरणें । ये हि जन्मीं नाना वैराग्यसाधनें । श्रीरामचंद्र आराधिला ॥ ४४ ॥ तिया जन्मांतरपुण्यें श्रीरामचंद्रें । नारायणासी गुणसमुद्रें । सगुणसाक्षात्कारें भक्तनरेंद्रें । दर्शन दिधलें निजग्रामीं ॥ ४५ ॥ गौतमीचा उत्तरतीरीं जांबेसी । ग्रामलेखनाधिकार पितयासी । पिता गोदेसी गेला स्नानासी । तवं नवल वर्त्तलें मागें ॥ ४६ ॥ निजगृहीं असतां नारायण । तवं दूतवेषें आला येक वानरगण । तेणें परम क्लेशी करून । बाह्य प्रदेशासी नेलें ॥ ४७ ॥ वय तरी वर्षां अकरांचे । परंतु पदरीं जन्मांतरपुण्य साचें । योगभ्रष्ट तेणें निजवृत्तीचें । चळण न घडे कदापि ॥४८॥ दूतें झोले[1] देत बाह्य प्रदेशीं । नेलें तेणें नारायण भयभीत मानसीं । होऊनि पाहे तवं दृष्टीसी । अपूर्व कौतुक देखिलें ॥ ४९ ॥ मेघःश्यामरूप क्षत्रीवेषें । सिबिकेमाजीं[2] बैसलीं स्त्रीपुरुषें । सभंवतें निजगण यथासंतोषें । उभे असती दोहीं भागीं ॥ ५० ॥ तवं यासी नेऊनि पुढें उभें केलें । पिता कोठें आहे ह्मणौनि पुसिलें । रचपुतिभाषा वाक्य बोलिलें । आणि वेष हि तैसा चि ॥ ५१ ॥ येणें पितृवर्त्तमान सांगितलें । तवं प्रभूनें जवळीं पाचारिलें । मस्तक कुरवाळूनि येक पत्र दिधलें । निजकरें नारायणासी ॥ ५२ ॥ निज-

१ हिसके देत, फरपटत. २ पालखीमध्यें.

मुद्रांकित पत्र करीं लाधतां चि । अवस्था पालटली नारायणाची । थरथरां कांपत तेणें सर्वांगाची । वेंगडी वळली ॥ ५३ ॥ वाचा जातसे बेंबळपणें[1] । हांसे रडे नाचे सत्राणें[2] । शब्द बोलवेना निर्बळपणें । उगा चि टकमकां पाहातसे ॥ ५४ ॥ आंग कांपतसे थरथरां । विस्मयें दाटलासे सैरां[3] । घामेजोनि अति घाबिरा । रडे पडे आक्रंदे ॥ ५५ ॥ क्षणें हांसे क्षणें रडे । उड्या मारी क्षणें पडे । इतुकियामाजीं निर्जें[4] निवाडें । कौतुक देखे निजदृष्टीं ॥ ५६ ॥ तवं मूर्ति देखिली घवघवीत । मेघःश्याम प्रभा लखलखित । वामांगीं जानकी शोभत । पाठीसीं सौमित्र भरत ॥ ५७ ॥ तया सेजीं उभा शत्रुघ्न । पुढें उभा वीर हनुमान । अकस्मात वांहोटुळी येऊन । इतुकें देखे तत्काळीं ॥५८॥ ऐसें देखेना जवं अकस्मात । तवं श्रीरामें मस्तकीं ठेऊनि कृपाहस्त । महावाक्य उपदेशूनि त्वरित । हनुमंतासी निरविलें ॥ ५९ ॥ ते समई दिग्मंडळ दणाणिलें । तेणें नारायणाचें सर्वांग थरारिलें । ह्मणे काय ब्रह्मांड कोसळलें । मजवरी ये काळीं ॥ ६० ॥ ह्मणौनि थरथरां असे कांपत । तेणें दांतखिळी बैसों पाहात । सभंवतें टकमकां अवलोकित । तवं धुधुकारं[6] देखिला ॥ ६१ ॥ इतुकियामाजीं अकस्मात । विजुसारिखें लखलखित । निजांगीं दिव्य वस्त्र वेष्टित । सीतनिवारणार्थ ॥ ६२ ॥ वस्त्र रंगाथिलें अति मनोहर । आरक्त शोभा मंडित सुंदर । द्रुमुंजीसरिखें[7] सपरिकर[8] । दिव्य तेजें विलसे ॥ ६३ ॥ सव्य करीं पत्र राममुद्रांकित । वाम करीं अर्द्धचंद्र बाण राम देत । इतुकियामाजीं तत्काळ जाली गुप्त । राममूर्ति निजांगें ॥६४॥ इतुकें जवं क्षणमात्रें हों न सरे । तवं नारायणासी पडलें अंधारें । वाचा स्तब्ध होऊनि येक संवत्सरें । निजसमाधीं तटस्त ॥६५॥ असो पिता आणि ज्येष्ठ बंधु गृहासी आले । गृहीं घाबिरेपणें वर्त्तमान ऐकिलें । जे येक दूत येऊनि नारायणासी नेलें । परम क्लेशी करूनि ॥ ६६ ॥ मग ऐकतक्षणीं ते धांविनले । बाह्य प्रदेशीं पाहात चालिले ।

---

१ ढिलेपणानें. २ वेगानें. ३ अतिशयपणानें. ४ निजस्वरूपभावानें. ५ वावटळ. ६ धुधु असा आवाज करणारा ह्म० मारुती. ७ तांबड्या मातीच्या रंगाचें. ८ चांगलें.

तवं अकस्मात येकायेकीं देखिलें । ब्रह्मारण्यांत नारायणा ॥ ६७ ॥ पाहाती तवं चकित मानसीं । वाचा कुंठित निश्चयेंसीं । बोलवितां नाना प्रयत्नेंसीं । पारि न बोले चि सर्वथा ॥ ६८ ॥ तवं नागरिक लोक पातले । कित्तेकीं कित्तेक तर्क केले । ह्मणती यासी निश्चयें झडपिलें । झाली असे भूतबाधा ॥ ६९ ॥ कोण्ही ह्मणती ब्रह्मराक्षस । कीं लागली झोटिंगाची टापस । कोण्ही ह्मणती अहो यास । मुंज्या लागला निश्चयेंसीं ॥ ७० ॥ येक ह्मणती लागली मायराणी । कीं ते असेल सटवीची झडपणी । यासी पंचाक्षरी आणूनि । रक्षा करा झडकरी ॥ ७१ ॥ ऐसे बहुतांचे बहु तर्क जाले । बहुतीं बहुत उपाय केले । परंतु तितुके हि व्यर्थ गेले । येक हि उपाय चालेना ॥ ७२ ॥ मग सर्व हि होऊनि निवांत । उचलूनि निजगृहासी आणित । तवं तें वस्त्र देखिलें अकस्मात । अर्द्धचंद्र आणि पत्र ॥ ७३ ॥ त्यावरी सकळ लोकांसी आज्ञा दिधली । पितयानें मूठ उकलूनि पाहिली । तवं पत्रावरी मुद्रा देखिली । श्रीरामनामांकित ॥ ७४ ॥ पुढें पत्रार्थासी जवं वाचिती । तवं दोघांस हि समाधि अवचिती । प्राप्त होऊनि तटस्त होतीं । स्वानुभवसुखें ॥ ७५ ॥ पिता निजसमाधिसुख लाधोनि । देह ठेऊनियां तत्क्षणीं । साम्राज्यपदसुखासनीं । निजवैकुंठीं वास्तव्य ॥ ७६ ॥ ज्येष्ठ बंधू जो कां गंगाधर । त्यासी पत्र वाचितां समाधि साचार । तेणें हि लेखनी[2] वाहोनि रघुवीर । प्रसन्न केला निजभावें ॥७७॥ असो यावरि नारायण मौन्यमुद्रेंत । येक संवत्सर असतां इथंभूत । त्यावरि बोलणें चालिलें अद्भुत । काव्यरचनेसीं ॥ ७८ ॥ मग त्यांचीं चरित्रें सांगतां असाधारण । वैराग्य परम अद्भुत गहन । विवाह होतेसमईं सावधान । ब्राह्मणवाक्य ऐकतां ॥ ७९ ॥ लाता हाणोनि नोवरीसी । पलायन केलें शंखनादेंसीं । तेथून सांगतां अद्भुत वैराग्यासी । सीमा न करवे सर्वथा ॥ ८० ॥ मग जें जें अवतार-

१ अतिशय घोर जंगलांत. २ ग्रामलेखनाचें काम सोडून.

चरित्र केलें । तें तें न जाय सहसा वर्णिलें । त्या चरित्राचे ग्रंथ अपार[1] जाले । ते वाचां न बोलवे ॥ ८१ ॥ रामाचें दास्य असमसाहास[2] । ह्मणौनि स्वेछा नाम रामदास । हनुमंतीं आवडी बहुवस । सेवा भजन्न पूजन ॥ ८२ ॥ केलें ज्या ज्या मार्गें गमन । त्या त्या मार्गींचे सकळ जन । दर्शनें स्पर्शनें केले पावन । तथा संभाषणें हि ॥ ८३ ॥ जेवि सूर्यें क्रमितां गगन । प्रकाशरूप कीजे त्रिभुवन । तेवि स्वामींचें जेथ होत आगमन । तेथ ज्ञानप्रकाश ॥८४॥ आंगीं वैराग्याचा भर । समागमें निस्पृह परिवार । मार्ग क्रमित चालिले अपार । यथेछा निजसुखें ॥८५॥ गौतमीतट टाकूनि मागें । वृद्धेश्वरदर्शन घेऊनि निजांगें । येइजे नृसिंहक्षेत्रानुयोगें । भातवटिकेसी[3] ॥८६॥ घेऊनि सामराजदर्शन[4] । वटग्रामामाजीं[5] आगमन । अनाथ पतित शरणागत जन । उद्धरावया अनेक ॥८७॥ तेथ ग्रामाधिकारी ब्राह्मण । असती पुण्यपरायण । तद्गृहीं स्वेछा निवासस्थान । स्वामीसमर्थांचें ॥ ८८ ॥ तव इकडे दिनकरासी । स्वप्नदर्शनाचिया साहसीं । परम क्लेशें निजमानसीं । विरहेंकरूनि संतप्त ॥८९॥ पंधरासें स्याहात्तरीमाझारीं । जयाब्द फाल्गुनी पूर्णिमा अवसरीं । श्रीरामदासकृपा दिनकरीं । स्वानुभवसुख प्राप्त ॥९०॥ एवं रामदासकृपा होतां चि प्रत्यक्ष । दिनकरीं तत्काळ चि प्राप्त निजमोक्ष । मस्तकीं ठेऊनियां अपरोक्ष[6] । अभयंकर दक्षण ॥९१॥ तेणें दिनकर अंतरीं सुखावोन । परि मनीं विस्मयें दाटला पूर्ण । मग अनन्यत्वें विनीत होऊन । वचन बोले निजवाणीं ॥९२॥ जी जी स्वामी कैवल्यपति । पूर्वीं स्वप्नावस्थेंत दावितां सुखसंविति । मस्तकीं वामकर ठेऊनि विश्रांति । दिधली मज ॥ ९३ ॥ त्यावरि आजि सद्यदर्शन । होऊन स्वानुभव प्राप्त पूर्ण । मम मस्तकीं हस्तक दक्षिण । अभयंकर ठेविला ॥ ९४ ॥ तरि ये गोष्टीची ऊणखूण[7] । हें

---

१ त्या अपार ग्रंथांपैकीं त्या वेळचा असा एखादा ग्रंथ जरी उपलब्ध होईल तरी काय मौज होईल ? २ अनिवार, अतिशय. ३ तिसगांवापासून ५।६ कोसावर भातवडी ह्मणून गांव आहे, तेथें श्रीनृसिंहाचें देवालय आहे. ४ तेथील देवास नृसिंहशामराज ह्मणतात. ५ तेथून जवळ च वडगांव नांवाचा गांव आहे तेथें. ६ प्रत्यक्ष. ७ वाटाघाट.

सांगावें जी मजलागून । ऐसें बोलोनि साष्टांग नमन । निजभावें घातलें ॥ ९५ ॥ तवं श्रीगुरु कृपाद्रवलेनि चित्तें । ह्मणती येथ आक्षेपाचें कायसें उजितें । येक वेळ विराजलीयां दक्षिण हस्तें । तो कामकाळासी अजिंक ॥९६॥ त्याहिवरि जागृतिपरिस अति नैश्वर । स्वप्नावस्था क्षणभंगुर । तयेमाजीं ठेवितां दक्षिण कर । पुन्हां ठेवितां न ये ॥९७॥ आणि निजसुखप्राप्तिलागून । तुझें उतावीळ अंतःकर्ण । ह्मणौनि तुवां केलें पुरश्चरण । तेणें श्रीराम आभारला[2] ॥ ९८ ॥ तेणें स्वप्नावस्थेमाजीं येऊन । आमुच्या रूपें अनुग्रहण । करूनि देहचतुष्टयनिरशन । महावाक्यउपदेश ॥ ९९ ॥ तेणें मस्तकीं ठेविला वामकर । कां जे स्वप्नावस्था क्षणभंगुर । आणि मस्तकीं ठेवागासी अभयंकर । सामर्थ्य येका श्रीगुरूस चि ॥ १०० ॥ विना श्रीगुरुवांचूनि अभयंकर । मस्तकीं ठेऊं न शके ईश्वर । मां तेथ वरकड जे कां इतर । त्यांसी सामर्थ्य न घडे ॥ १ ॥ जरि तो ईश्वर हि यद्यपि क्षोभला । तरि श्रीगुरु पाठीसी घालील वहिला । परंतु श्रीगुरु क्षोभतां प्राणी रक्षिला । नव जाय ईश्वराचेनि ॥ २ ॥ यदर्थीं अपार श्रुतिस्मृतिवचनें । ह्मणौनि ये गोष्टीचा संदेह धरिसी झणें[3] । प्रत्यक्ष श्रीगुरूसी अभयंकर होतें ठेवणें । ह्मणौनि ठेऊं न शके श्रीराम ॥ ३ ॥ इतुकें आयकोनि निजकृपाउत्तर । स्वसुखस्वानुभवीं निमग्न दिनकर । ब्रह्मानंदीं समाधिस्थ साचार । निजऐक्यत्वें समरसला ॥ ४ ॥ तो चि आद्यंत स्वानुभवदिनकरीं । लाधोनि गुरुशिष्यान्वय संवादकुंसरी । ब्रह्मानंदबोधें पूर्णता उद्गारीं । स्वानंदें वोसंडतें[4] ॥ ५ ॥ अहो रामदासकृपा ते चि पूर्णिमा पूर्ण । तेथ स्वानुभवचंद्राचें पूर्णपण । दिनकरसुखाब्धि[5] मर्यादा सांडून । अमर्याद उचंबळला ॥ ६ ॥ आतां असोतु कां इया उपपत्ति[6] । दिनकर रामदासकृपां संवित्ति[7] । लाधोनि

---

१ पेट. ( हंसकोश ) उद्भव या अर्थी असावें. २ आभारी झाला, त्यास ओझें वाटलें. ३ नकारार्थी, किंवा कदाचित् धरशील तर. ४ भरून वाहात. ५ दिनकराचा आनंद हा च कोणी समुद्र. ६ दृष्टांत. ७ स्वस्वरूपाचें ज्ञान.

स्वसुखोद्गार येती । तृप्तीचिया पूर्णपणें ॥ ७ ॥ मग दिनकरें प्रबोधूनि निजात्मज । रामचंद्र स्वरूपानुभवीं सहज । ठेऊनि गुरुपरंपरा वोजे । दाविली निजकृपा ॥ ८ ॥ श्रीविष्णूनें हंसरूपें ब्रह्मकुमरव्याजें[2] । चतुरानन ब्रह्मा प्रबोधिला सहजें । त्यापासूनि निजकृपा निजात्मजें । श्रीवसिष्ठें लाहिजे ॥ ९ ॥ वसिष्ठें दिनकरवंशी श्रीरामचंद्रा । निजकृपां बोधिलें गुणसमुद्रा । श्रीरामें नारायणासी दिधली निजमुद्रा । तेणें रामदास ह्मणिजे ॥ ११० ॥ त्यांच्या अनुग्रहें स्वानुभवदिनकरासी । निजसुख लाधलें रामींरामदासीं । दिनकरें बोधूनि केलें रामचंद्रासी । प्रपंचपरमार्थे निजात्मज ॥ ११ ॥ एवं रामचंद्र दिनकर रामदास । श्रीराम वसिष्ठ चतुर्मुख सर्वेश । परब्रह्म निरंजन स्वयंप्रकाश । स्वानुभवदिनकरीं परिपूर्ण ॥१२॥ श्रीशालिवाहन शकाभीतरीं । सोळा शतें षोडशोत्तरीं । भावानाम संवत्सरीं । चैत्र शुद्ध नवमी ॥ १३ ॥ पुनर्वसु नक्षत्र इंदुवासर । ग्रंथ जाला स्वानुभवदिनकरें[3] । त्रिंशत्ग्रामें स्थळ मनोहर । महोत्सव रामनवमी ॥१४॥ पाहातां स्वानुभवदिनकरीं फळादेश । स्वानुभव दिनकराऐसा स्वयंप्रकाश । दिनकर रामींरामदास निर्दोष । रामचंद्रवरदें ॥ १५ ॥ ग्रंथराज स्वानुभवदिनकर । गुरुशिष्यान्वयेंसीं आद्यंत विचार । कळापकीर्णप्रकाशेंसीं साचार । रामचंद्रवरद ॥ ११६ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये षोडश कळापे श्रीगुरुपरंपरा निरूपणं नाम चतुर्थ कीर्ण प्रकाशः ॥ ४ ॥

॥ श्रीराम ॥

जय जय देव आद्य । वेदवेदांतप्रतिपाद्य । आत्मरूप स्वसंवेद्य । श्रीआदिगुरो ॥ १ ॥ जय जय देव येक । मायोपाधिविहीन संम्यक । अद्वितीय सच्चिदानंदात्मक । परमगुरो ॥ २ ॥ जय जय देव

---

१ शुद्ध. २ ब्रह्मकुमर जो नारद त्याला ज्ञान देण्याच्या निमित्तानें. ३ शके १६१६ चैत्र शुद्ध ९ सोमवार पुनवर्सु नक्षत्र या दिवशीं स्वानुभवदिनकर ग्रंथ समाप्त झाला. ४ नगरापासून पूर्वेस १०।११ कोसावर तिसगांव आहे तेथें. ५. निजात्मज जो रामचंद्र त्याला वर देणारा.

पर । विवर्जितक्षराक्षर । निरुपाधि निर्विकार निरंतर । परात्परगुरो ॥ ३ ॥ जय जय देव परब्रह्म । निरसित निःशेष जगद्भ्रम । अनिर्वचनीय शब्दब्रह्म । अपरगुरो ॥ ४ ॥ जय जय देव परिपूर्ण । अनादि मायोत्तीर्ण । निरस्ताखिलें कार्यकारण । श्रीजगद्गुरो ॥ ५ ॥ जय जय देव निर्गुण । अजरामर संपूर्ण । नामरूपकर्मविहीन । श्रीपूर्णगुरो ॥ ६ ॥ जय जय देव अनंत । आदिमध्यांतरहित । जीवशिवादि भेद निरस्त । श्रीस्वामी गुरो ॥ ७ ॥ जय जय देव अनघें । नेति नेति श्रुतिसमौघें । अप्रमेय सौख्यामोघें । वरदगुरो ॥ ८ ॥ जय जय देव विशुद्ध । विश्वातीत विश्वोद्बुद्धें । विश्वव्यापक प्रसिद्ध । स्वानंदगुरो ॥ ९ ॥ जय जय देव परेश । जगदुद्भ्रम निराकरित निःशेष । ब्रह्मानंदैक स्वयंप्रकाश । स्वसंवेद्य गुरो ॥१०॥ जय जय देव निष्कळें । सद्भाव भजनीय सकळ । स्वानुभवदिनकरमय निर्मळ । सत्सेव्य गुरो ॥ ११ ॥ शोधितां स्त्रीपुन्नपुंसकलिंग । त्रिलिंगाविवर्जित अव्यंग । केवळ आद्यंत श्रीगुरुलिंग । मम आराध्यदैवत ॥ १२ ॥ सर्ववर्णादि सेव्य प्रणवँ । त्याचा जेथ पूर्वपक्षीं च लयोद्भव । तेथ सिद्धांतीं वर्णव्यक्तिगौरव । काइसेन वर्णूं ॥ १३ ॥ न कळे स्वरूपाचा अंत । न चले हेतु दृष्टांत । नाना कल्पनाविर्वर्त्त । न सरे जेथ ॥ १४ ॥ आधीं दृष्टीनें पाहावें । पाहूनि मनें कल्पावें । कल्पूनि शब्दें बोलावें । स्वरूप आद्यंत ॥१५॥ तरि स्वरूपाभास तेजास्तव । तें तेज जिये स्वरूपीं वावें । आतां वायुयोगें मनाची हवींव । चाले कल्पनारूप ॥ १६ ॥ तो वायु चि जेथ विरे । तेथ कल्पनेसहित मन सरे । आतां शब्दीं तन्हि बरें । बोलों प्रभूतें ॥ १७ ॥ ऐसें ह्मणौनि बोले जवं । तवं शब्दाची खुंटली रांणीवं । मग मी सोडूनि जाणीव । उगा चि ठेलों

---

१ निरस्त ह्म० निरास केला आहे ज्याचा असें अखिल ह्म० सर्व कार्यकारण. २ निष्पाप. ३ श्रुतिसम ओघ. ४ सौख्य अमोघ ह्म० पुष्कळ, सफल. ५ विश्व+उद्बुद्ध =फुललेला, जागृत झालेला. ६ शुद्ध. ७ ओमित्येकाक्षर ब्रह्म. ८ भोंवरा, नसून दिसतें तें. ९ खोटें. १० शोभा. ११ राजपण.

॥ १८ ॥ ऐसा मी नाहींपणें जवं विचारी । तवं प्रणवात्मक शब्द-उजेरी । देखिली स्वरवर्णउच्चारीं । आकाशीं तिये ॥ १९ ॥ तवं तें स्वकार्येंसीं आकाश । हारपे जेथ सावकाश । ऐसया अगम्य स्वरूपास । कैसें वर्णावें ॥ २० ॥ वाचेसी जें न बोलवे निःशेष । मनासी जाली जेथ निराश । येदर्थीं श्रुति हि वाक्यांश । सत्यत्वें बोलतसे ॥ २१ ॥ जेथ यतो वाचा निवर्त्तते । अप्राप्य मनसासह हें सत्य । येणें आश्रयें मी कृतकृत्य । सहजें जालों ॥ २२ ॥ असो ऐसें जें निजस्वरूप अगम्य । तयासी कैसें करावें गम्य । आतां उगें चि अनन्यत्वें कीजे प्रणम्य । हें चि भलें ॥ २३ ॥ पाहातां स्वरूपडें ठावें । आतां पाहातयासी तन्हि पाहावें । ह्मणौनि आवडी घेतली जीवें । आत्यंतिक ॥ २४ ॥ तवं दृश्याचें चि जेथ नास्तिक । तेथ द्रष्टेपणासी कैंचें बीक । सहजें दर्शन हि निष्टंक । किमात्मक पैं ॥ २५ ॥ ह्मणौनि दृश्य द्रष्टा दर्शन । हे त्रिपुटी हि जेथ अपूर्ण । ऐसें ज्ञप्तिमात्र जें संपूर्ण । सत्स्वरूप ॥ २६ ॥ एवं ज्ञप्तिमात्र केवळ अव्यय । निःसंग निरुपाधि अद्वितीय । जयातें श्रुतिसमुच्चय । ज्ञेयें ह्मणती ॥ २७ ॥ परि मी ज्ञेय ह्मणतां बिहें । कां जे ज्ञातेपण मज येवों पाहे । मग ज्ञान हिं पैसावों लाहे । मजमार्जीं क्षणें ॥ २८ ॥ तरी पहिलें चि मी आणि माझें । हें घेऊनि श्रीप्रभुराजें । सस्वरूप दाऊनि वोजें । ठेविलें निजीं ॥ २९ ॥ तें निजसुख चि भोगितां भलें । इया ज्ञातेपणावीण काय राहिलें । ह्मणौनि ज्ञाता ज्ञान ज्ञेय हें हि सरलें । त्रिपुटीभान ॥ ३० ॥ आतां श्रीगुरुमूर्त्तीचें संपूर्ण । धरूनि बैसों ध्येयात्मक ध्यान । तवं तेथ मोटी दिसे नागंवण । ध्यातेपणाची ॥ ३१ ॥ तरि ध्येय ध्याता ध्यान । हें हि दिसे अकारण । आतां सर्व सांडूनि मौन । धरितां चि

१ ॐ या शब्दाचा उद्भव. २ प्राप्त, जाणण्यास सोपें. ३ 'स्वरूप पडे' असे शब्द असावे. मूळच्या व चाफळच्या दोन्ही प्रतींत 'स्वरूपडें' असें च आहे. ४ नास्तित्व. ५ केवळ ज्ञानस्वरूप. ६ जाणण्याची वस्तु. ७ भितों. ८ प्रवेश करूं लागे, किंवा अवकाश; ज्ञानाला हि मजमध्यें अवकाश मिळाला. ९ तत्काळ. १० बुडणूक, अभाव.

भलें ॥३२॥ मग होऊनि क्षणेक निवांत । बैसला स्वरूपानुभव घेत । तवं वृत्ति संपूर्ण समरसत । जेथील तेथें ॥ ३३ ॥ तिये समई कैसें जालें । जेवि अंबुकण सागरा मिळाले । किंवा ते स्फुलिंग झगटले । महातेजीं ॥ ३४ ॥ कीं तें लवण मिसळलें जीवनीं । किंवा ते अळंकार सुवर्णीं । किं वायु समरसतां गगनीं । तद्रूप चि जेवि ॥ ३५ ॥ तेवि चि मज हि आतां । सर्वांगें श्रीगुरु अवलोकितां । जाली सस्वरूपीं ऐक्यता । येकसरीं चि ॥३६॥ तेथ मी मम सारूनि । सर्वांगाचां नयनीं। श्रीगुरुपद अवलोकूनि । ठेविलें जवळां ॥ ३७ ॥ तिये समईचिया आनंदा । न बोलवे चि पैं कदा । जया सुखा भोगितां वेदां । पडिलें मौन ॥३८॥ जिया सुखें आनंद हरिहरांसी । मां इतरांची गोष्टी काइसी । आजि मी हि तिया चि सुखासी । जालों येकायतन ॥ ३९ ॥ सीमा न करवे तया सुखाची । आद्यंत आवघा माझा मी चि । मजमाजीं हि श्रीगुरूची । प्रतिमा देखे ॥ ४० ॥ मग सर्वांगत्वचा येकवटून । श्रीगुरुपदीं तत्संत् करून । स्वामीसी देऊनि आळिंगन । पदीं समरसलों ॥ ४१ ॥ तैसे चि सर्वांगाचे करूनि कान । श्रीगुरुवाक्यासी दे अवधान । जें जें करिती आज्ञापन । तें तें कार्य करी ॥ ४२ ॥ रचूनि ऐक्यतेचें सिंहासन । आत्मत्वें समरसलें आसन । वरि स्वामीचें आरोहण । सहजस्थिति ॥४३॥ अनंत ब्रह्मांडें होतीं आंगावरी । तियें निर्माल्यें सारिलीं येकसरीं । तवं निर्मळपणाची देखे उजेरी । असंभवनीय ॥ ४४ ॥ अहो ऐसें हें शुद्धस्वरूप । जयाचें येवढें पडँप । अगण्य अवाच्य अमूप । आद्यंत अवघें ॥ ४५ ॥ एवं आद्यंतीं श्रीगुरुलिंग सोज्वळ । वारि स्वानुभवदिनकराऐसे निर्मळ । शुद्धोदकें सुस्नात सकळ । मजसकट आच्मन ॥ ४६ ॥ आकाशासह दशदिशा । सारूनि प्रावर्ण श्रीगुरुसर्वेशा । सच्चिदानंद स्वप्रकाशा- । त्मक गंधाक्षत ॥ ४७ ॥ महदाकाशरूप मकुळ । सुगंधा-

१ एकदेशी दृश्य नयनेंद्रियानें न पाहतां सर्वांगाचीं सर्व इंद्रियें यांनाच डोळे करून श्रीगुरुपद अवलोकिलें. २ एकरूप, अधिष्ठान. आयतन=घर, स्थान. ३ अर्पण. ४ एकाकारवृत्ति. ५ पिंडब्रह्मांडाची उपाधि. ६ उत्कर्ष. ७ शोभा, शृंगार, आवरण. ८ पुढें करून. ९ मुकुळ=कमल, पुष्प.

मोदें बहळ । तें आद्यंत आळुमाळें । मस्तकीं साजे ॥ ४८ ॥ होतीं निर्माल्यें उरलीं । तें धूपदीपासी सारिलीं । मग आरोगणा[2] जाली । सहजस्थिति ॥४९॥ कररहित आळुमाळीं । अनन्यतेचिया बद्धांजुळी । अनुर्वाच्य स्तवनमेळीं । आर्त्तिक्यें[3] उजळुं ॥ ५० ॥ पदविवर्जित प्रदक्षिणा । करितां अपार न करवे गणना । देहचतुष्टय समूळ दक्षणा । कुर्वंडी[4] करूनि टाकिलें ॥ ५१ ॥ आद्यंतीं प्रकाशमय येकात्मता । नीरांजनें वोवाळिलीं तत्वता । विवर्जित भज्य भजकता । सद्भावें नमन ॥ ५२ ॥ ऐसें केवळ उपाधिरहित । मूळान्वयें उपासनादैवत । श्रीगुरु आराध्यलिंग सतंत । निरुपाधि पूजिलें ॥ ५३ ॥ आतां मागावा वरदपसाय । तरि वेगळेंपणें[5] आहे काय । आद्यंत अवघा श्रीगुरुराय । संपूर्णपणें ॥ ५४ ॥ संपूर्णपणें अवघा व्यापक । षड्गुणेश्वर असोनि निरुपाधिक । हें पाहातां सांगतां वाटे कौतुक । माझें चि मजला ॥५५॥ अहो कर्तृत्व नियंतृत्व भोक्तृत्व । विभुत्व साक्षित्व आणि सर्वज्ञत्व । या षड्गुणांचें सर्व शोभे महत्व । येक श्रीगुरूचां चि ठाईं ॥ ५६ ॥ आतां कर्तृत्व ह्मणिजे सकळ करणें । नियंतृत्व तें कार्य अकार्य नियमणें । भोक्तृत्व जें सुखदुःखात्मक भोगणें । इहपरत्रादि भोग ॥ ५७ ॥ विभुत्व ह्मणिजे सर्वसभ्यता[6] । साक्षित्व तें सचराचर चाळकता । सर्वज्ञत्व ह्मणिजे जाणणें तत्वता । सकळ पदार्थमात्र ॥ ५८ ॥ यया साहि गुणांचें अधिष्ठान । येक सर्वेश्वरीं चि विलसे संपूर्ण । विना सर्वेश्वर षड्गुणेश्वर कोण । पृथ्वीमाजीं अन्य असे ॥ ५९ ॥ आतां त्या सर्वेश्वराची स्वरूपवोळखी । करावयासी येक श्रीगुरु पारखी । विनासद्गुरु शिष्यासी निजसुखीं । ठेवणार न दिसे ॥ ६० ॥ ह्मणौनि सर्वेश्वरापरिस अधिक । येक सद्गुरु चि बोलिजे संम्यक । सद्गुरुसा-

---

१ कांहींबाही. २ नैवेद्य. ३ आरती करूं. ४ ओवाळून. ५ प्रसाद कोणाजवळ मागावयाचा ? श्रीगुरूजवळ. कोणीं मागावयाचा ? मीं. परंतु आतां मी व गुरु हें द्वंद्व जाऊन, सर्व काय आहे तें श्रीगुरुस्वरूप आहे, त्याव्यतिरिक्त कांहीं नाहीं. ६ सर्वांपेक्षां उच्च मनोवृत्तीचा ह्मणून तो विभु ह्म० श्रेष्ठ, राजा.

रिखा समर्थ आणिक । न भूतो न भविष्यति ॥ ६१ ॥ असो या षड्गुणांचें सकळ सामर्थ्य । जेथें देखिजेल पैं यथातथ्य । तें चि श्रीगुरु-अधिष्ठान बोलिजे सत्य । यावेगळीं तें सर्व सोंगें ॥ ६२ ॥ तरि या साहि गुणांचें अधिष्ठान । रामदासीं सकळ विराजमान । असोनि सर्वां अतीतें पारिछिन्न । श्रीरामदास आद्यंत ॥ ६३ ॥ अहो सर्वां असोनि सर्वां अतीत । येक रामदास सद्गुरु इथंभूत । ह्मणौनि स्वानुभवदिनकरीं आद्यंत । दिनकररामदास बोलिजे ॥ ६४ ॥ ह्मणौनि रामदासीं दिनकर शरण । रिघोनि निरसिलें जन्ममरण । पिंडब्रह्मांडेंसीं देहचतुष्टय सारून । श्रीगुरुस्वरूप व्यापक ॥ ६५ ॥ तेथ अष्टदेह अवस्था अभिमानी । स्थानें भोग मात्रा शक्ति सगुणीं । प्रकृतिपुरुषेंसीं दशदेह निरसूनि । श्रीगुरुस्वरूप व्यापक ॥ ६६ ॥ स्थावर जंगम जड चंचळ निश्चळ । अनंत ब्रह्मांडेंसीं चराचर सकळ । खाणी योनी निरसूनि निर्मळ । श्रीगुरुस्वरूप व्यापक ॥ ६७ ॥ अहो पांच भूतें आणि तिन्ही गुण । प्रकृति पुरुष हें अष्टधा मिळोन । गुरुकृपां हें सकळ निरसून । श्रीगुरुस्वरूप व्यापक ॥ ६८ ॥ पिंडब्रह्मांडेंसीं अष्टदेह निर्सून । सारूनियां प्रकृतिपुरुषभान । आदिमध्यांतरहित संपूर्ण । श्रीगुरुस्वरूप व्यापक ॥६९॥ एवं सारूनियां मीममात्मक । जीवशिवउपाधिसहित संम्यक । भेदाभेद निर्सूनियां व्यापक । श्रीगुरु चि संपूर्ण ॥ ७० ॥ असो ऐसें श्रीगुरु-स्वरूप व्यापक । निर्गुण निःसंग निरुपाधिक । निर्विकार निरावयव निष्टंक । असंभवनीय निःसीम ॥ ७१ ॥ नित्य निराकार शुद्ध बुद्ध । स्वसंवेद्य सनातन प्रसिद्ध । अप्रमेय अनिर्वचनीय अगाध । श्रीगुरु ब्रह्म पूर्ण ॥ ७२ ॥ तेथ श्रीगुरु आणि परब्रह्म । हा पूर्वपक्षीं च नाम-संभ्रम । हें वाच्यांशयोगें नाम रूप सकर्म । त्रिपुटीसीं उभारे ॥७३॥ मग जोंवरि शब्द तोंपर्यंत वाच्यांश । शब्द सरलीयां केवळ लक्षांश ।

---

१ सद्गुरु कसा असावा तीं लक्षणें वरील ओव्यावरून कळणार आहेत. दास. ५×२×७३. जेथें दिसती विशेष गुण । तें सद्गुरूचें अधिष्ठान । दास. ४ × ६×९.
२ भिन्न.

तेथ पूर्वपक्ष हि सहजें निःशेष । समरसे सिद्धांतीं ॥ ७४ ॥ मग सिद्धांत ह्मणावया उरे कोण । आद्यंत आवघा आपला आपण । लक्षअलक्षीं सोहंपण समरसोन । नाहंपण सहजस्थिति ॥ ७५ ॥ एवं द्वंद्वतारहित श्रीगुरुस्वरूप । दिनकररामदासीं आपेंआप । स्वानुभवदिनकरीं स्वानंदपडप । सहजस्थितिसाम्राज्य ॥ ७६ ॥ असो सहजस्थितिसाम्राज्यपद । भोगूनि स्वानुभवदिनकरीं निर्व्यवाद । होऊनि दिनकररामदाससंवाद । रामचंद्रान्वयें पूर्णता ॥ ७७ ॥ स्वस्ति श्रीस्वानुभवदिनकरे गुरुशिष्यान्वये षोडश कळापे श्रीगुरुपूर्णत्वप्रतिपाद्य निरूपणं नाम पंचम पूर्णत्वकीर्ण प्रकाशः ॥ ५ ॥ कळापाची वोवीसंख्या ३३८ ॥

स्वानुभवदिनकर कळाप १६
दिनकररामदासकृत बायाजी
सोळोंखी यांचें पुस्तक संपूर्ण
रामचंद्र दिनकर रामदास



॥ श्री ॥

# ॥ आरती श्रीदिनकरांची ॥

१

ब्रह्मज्ञाना आगर सागर शांतीचा ।
कृपेचें माहेर उदधी करुणेचा ।
शरणागतवत्सल मेरु सत्वाचा ।
विवेकाचा नायक दायक मुक्तीचा ॥ १ ॥
जय देव जय देव जय जी गुरुदेवा ।
जय दिनकर देवा ।
निजभावें आरति तुज देईं निजठेवा ॥ ध्रु० ॥
नित्यानित्यविचारें निजसुख दावीसी ।
मी मम निरसुनि माझें आतमत्व देसी ।
जिव शिव भेदाभेद स्वरुपीं मुरवीसी ।
स्वानुभवें निजैक्य परब्रह्मेसी ॥ २ ॥
निजदासां देव स्वामी दीनांचा ।
ह्मणउनि दिनकरस्वामी आळविती वाचा ।
देवभक्तां ऐक्य करिता तूं साचा ।
दिनकरनंदन राम शरण त्रिवाचा ॥ ३ ॥

२

आरती दिनकरा । सद्गुरु दातारा ।
अखंडित आत्मबोधीं । ओवाळूं परात्परा ॥ ध्रु० ॥
दिनकर दिवाकर । दीनबंधु दिनेश ।
अपार नाममाळा । स्वयंज्योती स्वप्रकाश ॥ १ ॥
सगुणनिर्गुणाची । सीमा जेथ पुरली ।
तें चि रूप सद्गुरूचें । तेथें वृत्ति ठसावली ॥ २ ॥
नामरूपकर्मातीत । स्वसंवेद्य सनातन ।
स्वानुभवदिनकरीं । रामचंद्रा परिपूर्ण ॥ ३ ॥